# डॉक्टर शरच्चन्द्र

आंग्ल नवलकथाकार राबर्ट लुई स्टीव्हनसन
याच्या 'डॉ. जेकिल आणि मि. हाइड'
या नवलकथेचें रूपांतर


अनुवादक

नरहर लक्ष्मण आठवले



सुविचार प्रकाशन मंडळ लि०

शके १८५९ ]　　　नागपूर　　　[ इ. स. १९३७

श्रीयुत

काकासाहेब कालेलकर

यांस

सप्रेम व सादर

समर्पण

# अनुक्रमणिका

# रॉबर्ट लुई स्टीव्हनसन

इंग्रजी वाङ्मयाच्या अवलोकनाने व अभ्यासाने आमच्या सुशिक्षितांच्या मनाची घडण गेल्या पांच सहा पिढ्या बऱ्याच अंशांनी बनत गेली आहे. इंग्रजी वाङ्मयाचा कोणता अंश व कोणकोणचे विशिष्ट ग्रंथकार कोणकोणच्या काळीं आमच्या अध्ययनांत आले आणि त्यांनी आमच्यामधील सुशिक्षितांच्या मनावर काय परिणाम केला हें पाहणें मोठें मनोरंजक होईल. या संबन्धांत दोन तीन गोष्टी विशेष लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत. विद्यापीठांमधील अभ्यासक्रम आखणाऱ्या आणि तो विद्यालयांमधून शिकविणाऱ्या आमच्या पाश्चात्य विद्यागुरूंनी इंग्रजी वाङ्मयाचे जे आदर्श आमच्यापुढे ठेवले ते आम्ही शिकत गेलों. त्याच्या थोडेंसें आजूबाजूला आम्ही पाहिलें, परंतु नवीन वाटा कांही फारशा शोधल्या नाहीत. इंग्रजीचे (त्याचप्रमाणें इतिहास व तत्त्वज्ञान या विषयांचे) प्रोफेसर इंग्लंडांतून जे वेळोवेळीं इकडे येत गेले ते आपआपल्या विषयामध्ये मोठे पारगत व सर्वांगदर्शी असतच असें नाही. त्यांनी ज्या ग्रंथकारांचीं पुस्तकें नेमलीं असतील त्यांचें अध्ययन आमच्याकडून व्हावयाचें व त्या योगाने आमची मनोरचना बनत जावयाची. ही एक गोष्ट.

परावलंबी किंवा परानुकारी माणूस नेहमी मागे रेंगाळणारा असतो, त्याचें ज्ञान नेहमी मागासलेलें असतें. इंग्लंडांत जे ग्रंथ व जे विचार जुनाट होऊन माजी पडलेले असावे, त्यांचें नवीन म्हणून ग्रहण करून पीठ पाडण्यास आम्ही अगदी तयार असतों. युरोपांत—व इंग्लंडांतही—इब्सेन प्रभृतींचा अवतार होऊन नव नाट्ययुगाची प्राणप्रतिष्ठा होत होती, त्याचवेळेस आम्ही केवळ शेक्सपियरलाच धरून बसलों होतों व फार तर गोल्डस्मिथ, शेरिडनपर्यंत आमची नजर जात होती. खुद्द इंग्लंडांत वर्डस्वर्थ माजी होऊन टेनिसन, ब्राउनिंगही खपले तरी आमच्या कडील रसिक वर्डस्वर्थच्याच प्रभावांत दंग होते. मेरेडिथ, हार्डी, जार्ज मूर, हेनरी जेम्स प्रभृति धुरंधर कादंबरीकार ज्या वेळीं सपाटून कादंबऱ्या लिहीत होते, त्या वेळीं त्याची खबर आम्हांस मुळीच नसून

आम्ही स्कॉट आणि डिकन्स यांचें अनुकरण करण्याच्याच भरांत होतों. विद्यालयीन अभ्यासक्रमांतून वाङ्मयाचें जेवढें ज्ञान व्हावें, त्याच्या बाहेर फारसें पाहावयाचें नाही; आणि विद्यालयांत तर सुप्रतिष्ठित झालेल्या माजी ग्रंथकारांचेच ग्रंथ नेमण्याची प्रवृत्ति. विद्यालयांची ही प्रवृत्ति कांहीशी साहजिक व रास्तही आहे. परंतु विद्यालयांत झाला तेवढाच काय तो अभ्यास व त्याकरितां केलेलें तेवढेंच काय तें वाचन, असें आम्ही समजणार ! मग आज घटकेस जगांत काय चाललें आहे हें चौफेर नजर टाकून स्वतंत्र बुद्धीने न्याहाळण्याचें आम्हांस कसें जमावें ?

म्हणूनच मुख्य दोष द्यावासा वाटतो आमच्या प्रकृतिस्वभावाला. जिज्ञासा, चौकसबुद्धि, नवें संपादण्याची हाव, या वृत्ति आमच्यांत जणू मेल्या आहेत. मानसिक आनंदाकरिता, रसास्वादाकरितां, प्रबळ जिज्ञासेल खाद्य पुरविण्याकरितां वाचन करावयाचें ही कल्पना आमच्या गावीही नसते. जिज्ञासाभावामुळे आमचें अवलोकन कामापुरतें व तुटपुंजें तर होतेंच, परंतु जें होतें त्यांतही आमच्या संकुचित व एकदेशीय मनोवृत्तीमुळे एकांगीपणा फार येतो. इंग्रजी वाङ्मयांतील कांही विशिष्ट प्रवृत्ति व त्या प्रवृत्तीच्या ओघांत सामावलेले ग्रंथकारच तेवढे आम्ही आत्मसात् केले व करितों. पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्कामुळे आमच्या समाजांतील शिक्षित वर्गामध्ये समाजसुधारणेची चळवळ उत्पन्न झाली व आपल्या समाजस्थितीकडे सर्वांचें लक्ष वेधलें. या मनःप्रवृत्तींतूनच सामाजिक कादंबरीचा उदय झाला. अर्थात् सामाजिक कादंबऱ्या लिहिणाऱ्या डिकन्स, थॅकरे, जेन आस्टेन, मिसेस हेनरी वूड, मारी कारेली इत्यादि कादंबरीकारांकडेच आमचें लक्ष गेलें. म्हणजे स्थूल मानाने मध्यमवर्गीतील कुटुंबांच्या गृहस्थितीचें वर्णन करणारे ग्रंथकार व त्यांच्या कृति तेवढ्या आम्ही पाहिल्या. रेनाल्ड्ससारखा विचकट कथाकार तर आम्हीं पचवूनही टाकला. परंतु एकोणिसाव्या शतकांत इंग्लंडमध्ये निरनिराळ्या अभिनव दिशांनी जी कादंबरीची वाढ झाली तिची छाप आमच्या मनावर फारशी कांहीच उमटली नाही. जार्ज एलियट, किंग्सले, चार्लस रीड, डिझरायली, ट्रोलोप इत्यादिकांचा विशेषसा परिणाम झाल्याचें दृश्य आमचें वाङ्मय दाखवीत नाही. जी स्थिति कादंबऱ्यांची तीच वाङ्मयाच्या इतर शाखांचीही. काव्याच्य

बाबतींत तरी वर्डस्वर्थ, शेली, कीट्स पासून सुरुवात करून टेनिसन, ब्राउनिंग पर्यंत आम्ही जी मजल मारली तेवढीच; त्यानंतरच्या इंग्रजी काव्याच्या गाढ अध्ययनाच्या छटा आमच्या कविजनांच्या काव्योद्गारांमध्ये कितपत उमटलेल्या आढळतील याची शंकाच आहे.

वर उल्लेखिलेल्या त्रिदोषामुळे इंग्रजी वाङ्मयाच्या भांडारांतील जीं रत्नें आजवर आम्हांस पारखींच राहून गेलीं त्यापैकी स्टीव्हनसन हें एक होय इंग्लंडांत जो ग्रंथकार अतोनात लोकप्रिय होऊन जाव। त्याची आम्हांस इकडे पुष्कळ वेळां दादही नसावयाची. अलीकडील दहा वर्षांत ही स्थिति थोडीबहुत पालटून समकालीन इंग्रजी वाङमयाकडे व विचारप्रवाहांकडे आमचें लक्ष लागूं लागलें आहे. परंतु पूर्वी बहुतांशीं बेदाद कारभारच चालू होता. स्टीव्हनसनच्या वाङमयाचा ठसा आमच्या मनावर न उठण्याचीं कारणें फारशीं गूढ नाहीत. तीं वर उल्लेखिलेल्या परिस्थितींतच सापडतात. आमच्या मनोव्यापारांचें क्षेत्र संकुचित, आमची दृष्टि अपुरी व एकदेशी असल्याचें दिग्दर्शक जर कांही असेल, तर स्टीव्हनसनसारख्या ग्रंथकारांच्या कृतींकडे आपलें लक्ष आकृष्ट होत नाही हें होय.

इंग्रजींत ज्याला 'रोमान्स' म्हणतात तो भाव व ती वृत्ति आपणाला पारखी आहे. वास्तववाद किंवा Realism हा आपण समजूं शकतों व वाङमयांत आणूं शकतों; Idealism उर्फ ध्येयवाद, किंवा Symbolism उर्फ प्रतीकवाद, अथवा Mysticism उर्फ गूढवाद हेही आपल्याला अपरिचित नाहीत. परंतु इंग्रजी मनाला विशेष लोभविणारा 'रोमान्स' उर्फ 'अद्भुतवाद' आपणाला नीटसा ग्रहण करतां येत नाही, असेंच अनेक उदाहरणांवरून म्हणावेंसें वाटतें. रोमान्स उर्फ अद्भुतरम्यता पूर्वी आमच्याकडे नव्हती असें नाही. बाणाची कादंबरी हें प्रणयमिश्रित रोमान्सचेंच एक उदाहरण होय. परंतु अलीकडे आपल्या समाजाच्या मनोवृत्तीला रोमान्स रुचत नाही, पटत नाही, किंवा तो जाणून घेण्याची फारशी इच्छाही दिसत नाही. त्या शब्दाच्या अर्थाचा देखील विपर्यास होऊन रोमान्स म्हणजे प्रणय किंवा शृंगार असा अर्थ मराठींत रूढ होऊं लागला आहे, इतकी आपली अनास्था व अनभिज्ञता या प्रकरणीं दिसून येते.

बाणाच्या कादंबरीप्रमाणें रोमान्सचा प्रणयाशीं मिलाफ होऊं शकेल. परंतु रोमान्स म्हणजे प्रणय नव्हे किंवा साहित्यशास्त्रोक्त शृंगार रस तर नव्हेच नव्हे. रोमान्स ही एक वृत्ति किंवा मानसिक अवस्था आहे. आपल्या जुन्या साहित्यशास्त्रांत अद्‌भुतरसाचा विस्मय हा स्थायिभाव सांगितला आहे तें आपण येथे लक्षांत घेतलें पाहिजे. स्थायिभाव म्हणजे मनुष्याच्या मनामध्ये स्वयंसिद्ध व स्थिररूपाने असणारी वृत्ति. कांही उद्दीपक कारणांमुळे ही वृत्ति उद्दीपित झाली म्हणजे ती आस्वादनीय होते व अशा स्थितीलाच रस म्हणतात. विस्मय (wonder) ही एक अशाच प्रकारची वृत्ति आहे. ही वृत्ति मनुष्याच्या अंगी असणें हें मानवी मनाच्या कसदारपणाचें लक्षण आहे. ह्या वृत्तीचें पोषण करण्याने मनुष्याचें मन आशावादी व उत्साहयुक्त बनत जातें हेंही लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

पूर्वीच्या लोकांची विस्मयाची भावना प्राथमिक व ढोबळ स्वरूपाची असे. गंधर्वनगरी किंवा अस्मानांतील पऱ्या यांची आणि अशीच नाना तऱ्हांच्या कल्पनातीत गोष्टींचीं वर्णनें करण्यानेच ही भावना जागृत होईल, असें कवीस वाटत असे व वाचकांची भूकही अशाच वर्णनांनी भागत असे. दहा तोंडांचा व वीस हातांचा रावण, शंभर योजनें उडून जाणारा मारुती, पुष्पक विमानामधून रामाचा संचार (आता हा अगदी सत्यसृष्टींत आला आहे, हा भाग वेगळा), नारदाचें तीन्ही लोकांत भटकणें, तर बळीला एका बटूने स्वर्गांतून आरपार पाताळांत दडपणें, वगैरे अनेकानेक गोष्टी वाचकांची विस्मयभावना जागृत करण्याकरितां आपल्या जुन्या वाङ्मयांत वर्णिलेल्या आढळतील. परंतु विस्मयभावना केवळ अशा कल्पनातीत व सर्वथैव विलक्षण वर्णनांनीच जागृत होते असें नाही. स्थूलाबरोबरच तिचें सूक्ष्म व अधिक सुसंस्कृत स्वरूपही आपल्या मनास उद्दीपक होऊं शकतें. साध्याही विषयांत देखील चमत्कृतिजनकता असूं शकते व मनुष्याचें मन तितकें हळुवार व संस्कारक्षम असेल तर त्याला ती भासूं शकते. इन्द्रधनुष्य आकाशांत पसरलेलें सामान्य माणसें शेंकडो वेळां पाहतात, परंतु तेंच पाहून वर्डस्वर्थचें अंतःकरण नाचूं लागलें. रानांत फुलणारें फूलनफूल त्याला नवलपूर्ण वाटे. वस्तुजाताकडे

नवलपूर्णतेने, नवलाईने पाहण्याची वृत्ति म्हणजेच रोमान्स. ही नवलाईची भावना थोडी अधिक तीव्र व स्थूल असल्यास तिला 'विस्मय' असें म्हणता येईल. व हीच विस्मयाची भावना विभावानुभावादिकांनी व्यक्त झाली म्हणजे तो अद्भुत रस होय. तेव्हा आंग्ल वाङमयविवेचकांची रोमान्सची कल्पना आणि आमचा साहित्यशास्त्रोक्त अद्भुत रस यांमध्ये थोडा फार प्रमाणाचा व घनतेचा फरक आहे, बाकी दोन्ही एकच होत, असें मानिल्यास तें यथायोग्य होईल असें वाटतें.

प्रत्येक वस्तूकडे नवलाईने पाहण्याची वृत्ति मनुष्याच्या अगीं असूं शकेल, हें खरें. तथापि नवल किंवा चमत्कृति उत्पन्न करण्याची शक्ति भिन्न भिन्न वस्तूंत भिन्न प्रमाणांत असणार हें उघडच आहे. त्याचप्रमाणें सहवासाने वस्तूच्या नवलाईंत किंवा चमत्कृतिजनकतेंत फरक पडेल हीही गोष्ट सहज समजण्याजोगी आहे. जन्मापासून मुंबईच्या चाळींत राहून कंपनीच्या ऑफिसांत खर्डेघाशी करणाऱ्यास खेड्यांत पहिल्यांदाच जाण्याचा प्रसंग आल्यास प्रफुल्ल शेतांचा किंवा मोट हाकणाऱ्या शेतकऱ्याचा देखावा पाहून मोठें नवल वाटेल. याच्या उलट खेड्यांतला शेतकरी पहिल्यांदाच मुंबईस आल्यास त्याला तेथील उंच इमारती, गर्दी, ट्रामा, मोटारी वगैरे पाहून केवढा विस्मय वाटतो हें बहुधा सर्वांस माहीतच आहे. तेव्हा वस्तु जितकी नवीन, अपरिचित व विलक्षण तितकी तिजविषयी नवलाईची भावना अधिक उत्पन्न होईल हें उघड आहे.

नवलाईची किंवा विस्मयाची भावना वस्तुदर्शनाबरोबर निर्माण होते हें सहज समजण्याजोगें आहे. एखाद्या कोटीची खरी मजा ज्याप्रमाणें ती ऐकल्याबरोबर मनांत चमकून जाते, तिचें स्पष्टीकरण करून सांगण्याची पाळी आली की ती मजा गेली, त्याचप्रमाणें विस्मयाची भावना वस्तुदर्शनाबरोबर तात्काळ उत्पन्न होऊन मनास व्यापून टाकिते. चिकित्सा, कार्यकारणमीमांसा किंवा साधकबाधक विचार सुरू झाला की नवलाईची भावना गेली, अर्थात् रोमान्सही नाहीसा झाला. काल्पनिक अथवा वास्तव सृष्टींतील वस्तूंचें नवलपूर्ण रीतीने प्रदर्शन करून त्या नवलाईंतच स्वतः आनंद मानणें व रसिकांस आनंद वाटावयास लावणें, हीच रोमांटिक वृत्ति होय. व्यक्तींच्या साहसपूर्ण, चमत्कृतिजनक कृत्यांचें तन्मयतेने

वर्णन करणें हा खरा रोमान्स झाला; त्याच व्यक्तींच्या कृत्यांची चिकित्सा सुरू झाली, त्यांच्या मागे असलेल्या मनोव्यापारांचें विश्लेषण सुरू झालें, की त्यांतला रोमान्स गेला. अर्थात् मनोव्यापारांची सूक्ष्म चिकित्सा करीत बसणारे हेनरी जेम्स सारखे कादंबरीकार हे रोमान्सचे शत्रु होत.

वाङ्मयामध्ये विस्मयभावना सर्वत्र निर्भेळ स्वरूपांत आढळते असें नाही. अद्‌भुत रसाबरोबर इतर रसांचें मिश्रण होणें ही गोष्ट अस्वाभाविक किंवा रसापकर्षक तर नाहीच, उलट ती अनेक वाक्प्रभूंच्या कलाविलासामध्ये नेहमी आढळणारी आहे. विस्मयाबरोबर प्रणयाचें, वीरतेचें, कारुण्याचें मिश्रण झालें असतां तें खुलतें. समानधर्मी मित्रांप्रमाणें या भावनांचा एकत्र संनिवेश परस्परांची शोभा वाढविण्यासच कारणीभूत होतो, हें स्कॉटसारख्या वीरकवींच्या आणि कथाकारांच्या नायकाने आपल्या काव्यांमधून व कादंबऱ्यांमधून अप्रतिम रीतीने दाखविलें आहे. बहुधा रोमान्स हा असा मिश्र स्वरूपांत आढळतो, म्हणूनच रोमान्स म्हणजे काय याची खरी कल्पना व त्याच्या शुद्ध स्वरूपाचें यथार्थ आकलन होणें पुष्कळ वेळां कठीण पडतें. निर्मिश्र रोमान्सचीं उदाहरणें वाङ्मयांत क्वचित् आढळतात. अर्थात् रोमान्सचें स्वरूप अभिव्यक्त करण्याच्या दृष्टीने तीं विशेष महत्त्वाचीं होत. स्टीव्हनसनच्या वाङ्मयकृतीचें महत्त्व आहे तें याच दृष्टीने. रोमान्स विशुद्ध आणि सोज्वळ स्वरूपांत असा त्याच्याच ग्रंथांत आढळतो. आधुनिक आंग्ल वाङ्मयांत रोमान्सचा खराखुरा आचार्य असा तोच होऊन गेला. त्याची ही अपूर्वता जाणून आंग्ल जनतेने त्याला आपल्या हातांवर झेललें. त्याच्या लिहिण्याचें आणि त्यापेक्षाही त्याच्या व्यक्तित्वाचें जितकें कोडकौतुक इंग्रज लोकांनी केलें तितकें त्या काळांतल्या दुसऱ्या कोणत्याही ग्रंथकाराचें केलें नसेल.

आणि स्टीव्हनसन ही व्यक्ति होतीच तशी कोडकौतुक करण्याजोगी. रोमान्स म्हणजे नवलाईची भावना. प्रत्यक्ष दृष्टीने अनुभवलेल्या गोष्टीविषयीं नवलाईची भावना उत्पन्न होण्यास मनुष्याचें मन हलकें, निष्कपट, आनंदी व खुलें असलें पाहिजे. मुलांचीं मनें अशीं असतात. म्हणूनच त्यांना पाहावी ती गोष्ट नवलाईची वाटते. लहान मुलांना सर्व सृष्टि म्हणजे एक रोमान्सच असतो. त्यांचीं इंद्रियें नवनवे अनुभव घेण्यास

अत्यंत उत्सुक असतात. प्रत्येक नवा अनुभव मिळतांच त्याचें नवल करावें, आनंद मानावा, आनंदभराने बागडावें, हा मुलांचा क्रम चालू असतो. आणि वाङमयांत रोमान्स निर्माण करणाऱ्या कलाकारांचीं अंतःकरणेंही बालकांसारखींच असतात. स्कॉटचें अंतःकरण लहान मुलांप्रमाणें सरळ, निष्कपट व आनंदी होतें अशी साक्ष अनेकांनी दिली आहे. नुकताच निवर्तलेला नाटककार सर जेम्स बॅरी हाही असाच, 'देवदूतांबरोबर लपंडाव खेळणारा' आनंदी प्राणी होता. मुलें म्हणजे त्याच्या जिवाचा कलिजा. लहान मुलांबरोबर मूल होऊन खेळण्यांत त्याला जितका आनंद वाटावयाचा तितका इतर कशामध्येही वाटत नसे.

स्टीव्हनसनविषयीं तर काय सांगावें ? त्याचें अंतःकरण थेट लहान मुलासारखें. त्यावर पोक्तपणाची, निबरपणाची छटा कधी आलीच नाही. नाटककार बॅरीने पीटर पॅन हा एक 'कधीही मोठा न होणारा' (the boy who would not grow up) अद्भुत बालक आपल्या कल्पनेंतून निर्माण केला आहे, त्याचा स्टीव्हनसन हा वास्तव सृष्टींतील अवतार असावासा भासतो. स्टीव्हनसन शरीराने वाढला, त्याचप्रमाणे त्याच्या मनाच्या शक्तीही इतर मोठ्या माणसांप्रमाणें वाढल्या. परंतु त्याची वृत्ति मात्र बालकाप्रमाणेच राहिली. त्यामुळे बालसहज मोकळेपणा व निष्कपटपणा आणि नवलाईची भावना त्याच्या जीवनांत व वाङमयकृतींत भरून राहिलेली आढळते.

एका भाषेंतील विशिष्ट अर्थद्योतक शब्दांना दुसऱ्या भाषेंत चपखल प्रतिशब्द आढळणें कित्येक वेळां मुष्किलीचें होतें. Spirit of adventure हा एक शब्दप्रयोग असा आहे की ज्याचा अर्थ बरोबर व्यक्त करणारा शब्दप्रयोग आधुनिक मराठींत तरी निदान दृग्गोचर होत नाही. 'नवनवे अनुभव घेऊन पाहण्यास उत्सुक असलेली धाडशी वृत्ति' असें त्याचें स्पष्टीकरण मराठींत करतां येईल. ही वृत्तिच आपणांत फार कमी; अर्थात् तद्द्योतक समर्पक शब्द मराठीत न आढळावा यांत नवल नाही. परंतु ही वृत्ति इंग्रजी राष्ट्राच्या नसानसांतून भरलेली आहे. त्या राष्ट्राचा आजचा हा वैभवविस्तार बऱ्याच अंशीं या वृत्तीच्या प्राबल्याचें फळ आहे. अर्थात् इंग्रजी वाङमयामध्येंही ही वृत्ति अनेक ठिकाणीं प्रतिबिंबित झाली

असली पाहिजे हें सहज समजण्याजोगें आहे. नवीनासाठी धडपडणारी ही धाडशी वृत्ति म्हणजे रोमान्सची (सख्खी) बहीण होय. ही वृत्तीही स्टीव्हनसनच्या रक्तांत पूर्णपणें भिनलेली होती. त्याचें सर्व चरित्र म्हणजे या वृत्तीचा एक अखंड व अद्‌भुत विलास आहे. त्याचें लिखाण तर काय, नवनव्या देशांच्या पर्यटनांनी, धाडशी कृत्यांनी व विस्मयकारी अनुभवांनी तुडुम्ब भरलेलें आहे.

ही धाडशीपणाची वृत्ति एका विशिष्ट दिशेने प्रकट झालेली आंग्ल वाङ्मयांत दिसते, ती दिशाही दुर्दैवाने आपल्या वाङ्मयास पारखीच आहे. इंग्लंड व स्कॉटलंड हे दोन्ही देश मिळून एक बेट आहे, व आज तीन साडेतीनशें वर्षे तरी त्या राष्ट्राची दर्यावर्दीपणाबद्दल ख्याति आहे. अर्थात् आंग्ल वाङ्मयामध्येही आंग्ल राष्ट्राच्या दर्यावर्दीपणाचें यथाप्रमाण प्रतिबिंब पडलेलें आढळतें. समुद्रावरील सफरी, नवीन देशांवर स्वाऱ्या व त्यांचें संशोधन, धाडशी नावाड्यांचे प्रवास इत्यादिकांचीं वर्णनें, समुद्रप्रवासावर आधारलेल्या कादंबऱ्या, असें किती तरी राष्ट्राच्या धाडशी व प्रवासी वृत्तीचें पोषण करणारें वाङ्मय इंग्रजींत निर्माण झालेलें आहे. स्टीव्हनसनला तर समुद्रप्रवासाचा फारच नाद. पासिफिक महासागरांत अखंड पर्यटन करीत हिंडावें हें त्याच्या जिवाचें मनोराज्य. तें त्याने अखेरीस सफल करून घेतलें. त्याच्या लिखाणापैकी अनेक ग्रंथांत सागरीय वातावरण भरून राहिलें आहे. जहाजांचे कप्तान व नाखवे, चांचे व दर्यावर्दी डाकू यांचीं मनोहर व अद्‌भुत चित्रें रंगविण्यांत स्टीव्हनसन स्वतः कसा अगदीं रंगून जातो. नाना देशाचें पर्यटन करण्याची त्याला स्वतःला अतोनात आवड आणि ती आवड आपल्या लिखाणांत प्रतिबिंबित करण्यांत त्याने कधीही कसूर केली नाही. त्याने लिहिलेल्या बहुधा प्रत्येक कथेमध्ये धाडसीपणाचे प्रवास त्याने घातले आहेत. अशा रीतीने, मूर्तिमंत रोमान्स वाङ्मयामध्ये निर्माण करण्यास ज्या ज्या गुणांची व प्रवृत्तींची मदत हमखास होण्याजोगी, ते ते गुण व त्या त्या प्रवृत्ति स्टीव्हनसनमध्ये उपजत किंवा लहानपणापासून मुरलेल्या असल्यामुळे रोमांटिक रचनेचा आपल्या काळांत तो एकमेवाद्वितीय आचार्य बनला, असें दृश्य आपणास दिसून येतें.

ज्याचें मन इतकें आनंदी व बेफिकीर, ज्याला प्रवासाची, समुद्र-पर्यटनाची, चांचे, डाकू, दरवडेखोर यांच्या धाडशी कृत्यांची इतकी आवड, तो स्वतः प्रकृतीने चांगला धट्टाकट्टा, कणखर व दांडगा असावा असें कोणासही वाटेल. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती. एका परीने पाहतां त्याचें जीवन म्हणजे परस्परविरोधी गोष्टींचा एक अद्भुत संगमच होता. त्याचें चरित्र म्हणजे नवलाईची एक खाणच आहे. तो स्वतः व त्याचें चरित्र हाच सर्वांत मोठा व अत्यंत उज्ज्वल असा रोमान्स आहे! इ. स. १८५० च्या नोवेंबर महिन्यांत चांगल्या प्रसिद्धीस आलेल्या व भरभराटलेल्या कुलांत स्कॉटलंडची राजधानी एडिंबरो येथे रॉबर्टचा जन्म झाला. त्याचा आजा रॉबर्ट स्टीव्हनसन हा एक प्रख्यात इंजिनियर होऊन गेला. समुद्रांतील धोक्याच्या खडकांवर अनेक सुप्रसिद्ध दीपस्तंभ बांधण्याचें काम त्याने यशस्वी रीतीने केलें होतें. त्याचा सर्वांत धाकटा मुलगा टॉमस याच्याकडे त्याच्या एंजिनियरीच्या धंद्याचा वारसा आलेला होता व त्यानेही तो यशस्वी रीतीने पुढे चालविला. स्टीव्हनसन घराणें धर्मनिष्ठ, नीतीच्या कडक शिस्तीने वागणारें परंतु तितकेंच व्यवहारकुशल होतें. टॉमसचा विवाह बालफर घराण्यांतील एका साधारण नाजूक प्रकृतीच्या मुलीशीं घडून आला. तिचा बाप तर प्रत्यक्ष धर्माधिकारीच होता. हें सांगण्याचें कारण असें की आपल्या मातापितरांच्या कडक धार्मिक व नैतिक शिस्तीमुळे लहानग्या राबर्टची वृत्तिही धार्मिक व नैतिक बाबतींत पूर्ण निष्ठेची बनली. जरी पुढे धार्मिक बाबतींत त्याचा व त्याच्या पित्याचा कांहीसा बेबनाव झाला, तरी त्याची नीतिनिष्ठा व सदाचाराविषयींचा कटाक्ष कधीही कमी झाला नाही.

टॉमसचा रॉबर्ट हा एकुलता एक मुलगा. अर्थात् लहानपणापासून त्याचें कोडकौतुक पुष्कळच झालें असेल हें सांगण्याची जरूरी नाही. जन्मतः तो प्रकृतीने साधारण इतर मुलांसारखा निरोगी होता. परतु वयाच्या तिसऱ्या वर्षापासूनच त्याची प्रकृति बिघडली, त्याला छातीचा आजार जडून तो कायमचा दमेकरी व खोकलेकरी बनला. स्कॉटलंडची हवा अतिशय थंड व दमट. ती त्याला पुढे पुढे मानवेनाशी झाली व देशोदेशीं भटकण्याची जी आवड त्याच्या अंगीं उपजतच होती ती पुरविण्यास

तब्बेतीच्या नादुरुस्तीचें हें कारण सदाचें उपस्थित असल्यामुळे वयांत आल्यानंतरचें बहुतेक सर्व आयुष्य त्याने प्रवासांत व इकडून तिकडे स्थलांतरें करण्यांत घालविलें.

अशक्त प्रकृतीमुळे लहानपणीं नियमित रीतीने शाळेंत जाणें नाही. घरीं एकटें बसून वाचन करावें, व नाना तऱ्हेच्या अद्भुत कल्पनांमध्ये गुग असावें, अशा रीतीने त्याचें बालपण गेलें. बापाची फार इच्छा की त्याने आपला एंजिनियरीचा धंदाच अंगावर घेऊन पुढे चालवावा. त्या हेतूने, मुलाला धंद्याचा अनुभव मिळावा म्हणून, समुद्रकाठीं चाललेल्या आपल्या बांधकामांवर देखरेख करण्यासाठी त्याने रॉबर्टला कित्येक ठिकाणीं पाठवून पाहिलें. परंतु रॉबर्टच्या प्रकृतीला व अभिरुचीला तें जमेना. या कामावर असतांना कांही दिवस जहाजावर राहण्याचा व नावाड्यां-मध्ये मिळण्यामिसळण्याचा त्याला प्रसंग आला, तेवढ्यांत त्यांच्या जीव-नाचीं चित्रें त्याने आपल्या स्मृतिभांडारांत जमा करून ठेवलीं. परंतु धंद्याची माहिती करून घेण्याचें जें उद्दिष्ट त्याकडे त्याने अगदीच दुर्लक्ष केलें. तब्बेत बिघडून घेऊन व कंटाळून तो प्रत्येक ठिकाणाहून परत येऊं लागला. सरतेशेवटीं ती दिशा सोडून रॉबर्टने कायद्याचा अभ्यास करून ॲडव्होकेट व्हावें असें ठरलें. त्याप्रमाणे दोनतीन वर्षें अभ्यास करून १८७५ सालीं परीक्षा देऊन तो वकील झालाही.

परंतु ज्याने पिढीजाद चालत आलेला व भरभराटलेला बंदरी बांधकामाचा आयता धंदा धुडकावून लावला तो नव्यानेच प्रारंभ करा-वयाचा वकिलीचा धंदा कसचा करतो ? लिहिण्याची हौस त्याला मुळा-पासूनच होती. वकिली पास होण्याच्या पूर्वी कित्येक वर्षें लेखनाचा काळजीपूर्वक अभ्यास त्याने सुरू केला होता. त्याच्या अंगचे वाङ्मय-गुण त्या वेळच्या कांही सुप्रसिद्ध साहित्यसेवकांच्या नजरेस येऊन त्यांनी त्याला मनापासून प्रोत्साहनही दिलें होतें. मासिकांत त्याचे लेख बिनहरकत प्रसिद्ध होऊं लागले होते. शिवाय त्याची जन्मभूमि स्कॉटलंड त्याला कितीही प्रिय असली तरी त्याची अशक्त प्रकृति व भटकण्याची खुमखूम त्याला स्काटलंडांतच काळ कंठूं देण्याला तयार नव्हती. वकिलीची परीक्षा पास झाल्यानंतर दहा पंधरा दिवसांच्या आंतच तो घरून निसटून

फरान्सांत गेला. तेथें त्याने फांटेनेब्लूच्या सुंदर वनांत कांही काळ घालविला, व पुढच्या दोन तीन वर्षांत त्याने आपला मुख्य मुक्काम फरान्समध्येच ठेवून एक पाण्यावरची व एक जमिनीवरची अशा दोन मोठ्या सफरी केल्या. या सफरींचीं प्रवासवृत्तें त्याने लिहिलीं तीं लवकरच पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालीं. पैकी Travels with a Donkey in the Cevennes हें पुस्तक रोमांटिक प्रवासवृत्ताचा एक अप्रतिम नमुना म्हणून उल्लेख करण्याजोगें आहे.

फरान्समध्ये असतांना मिसेस ऑसबोर्न नांवाच्या एका अमेरिकन बाईशी स्टीव्हनसनचा परिचय झाला. नवऱ्याच्या दुराचरणामुळे त्याला सोडून ती फरान्समध्यें येऊन राहिली होती. तिची कलाप्रियता पाहून तिजशीं लग्न करण्याची स्टीव्हनसनच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली. ती फरान्समधून अमेरिकेंत कॅलिफोर्निया प्रांतांत जाऊन राहिली. तेव्हा हाही अनेक कष्ट सोसून कॅलिफोर्नियामध्ये तिजकडे गेला व तेथे तिच्याशीं त्याने लग्न लाविलें. आधीच अशक्त असलेली स्टीव्हनसनची प्रकृति या प्रवासांतील हालांनी इतकी बिघडली की तो मरणाच्या दारी जाऊन ठेपला. त्या कठीण आजारांतून तो वाचला हें खरें, तथापि त्याची प्रकृति यानंतर कधीच पूर्ववत् झाली नाही. व्याधिग्रस्त स्थितींतच त्याचें पुढील आयुष्य गेलें.

शारीरिक दृष्ट्या जरी तो खचला तरी त्याचा वचपा दुसऱ्या बाजूने कांहीसा भरून निघाला यांत शंका नाही. त्याची पत्नी सुविद्य, पतीची योग्यता जाणणारी व सेवापरायण होती. तिचा पूर्वसंबंधाचा मुलगा लॉइड ऑसबोर्न हा त्यांच्या लग्नाच्या वेळेस दहाबारा वर्षांचा होता. त्याची संगत स्टीव्हनसनला फारच प्रिय झाली व त्याच्याशीं खेळण्यांत काळ घालविणें हें मोठेंच आनंदाचें साधन त्याला उपलब्ध झालें. इ. स. १८८० सालींच तो आपल्या जन्मभूमीस परत आला. तेथील हवा मानवेनाशी झाली, तेव्हा तो स्वित्झर्लंडांत व फरान्सच्या दक्षिण विभागांत कांही दिवस जाऊन राहिला. पुढे १८८४ मध्ये इंग्लंडास परत येऊन इंग्लंडच्या दक्षिण किनाऱ्यावर बोर्नमथ येथे सुमारें तीन वर्षें त्याने घालविलीं. परंतु तेथेही प्रकृति फार खालावूं लागली, तेव्हा कांही दिवस दक्षिण अमेरिकेंत जाऊन पुढे दोन वर्षें त्याने निवळ

समुद्रप्रवासांत घालविलीं. पासिफिक महासागरांत अनिरुद्ध संचार करावा व त्या महासागरांत जीं असंख्य बेटें आहेत त्या बेटांमधून भटकावें, तेथेच वस्ती करून तेथील लोकांमध्ये मिसळावें, असें मनोराज्य त्याने फार दिवसांपासून मनामध्ये बाळगिलें होतें. त्याप्रमाणे एक लहानसें गलबत भाडेपट्ट्याने घेऊन दोन वर्षें पासिफिक महासागरांत तो मनसोक्त फिरला व नंतर सामोआ नांवाच्या बेटांत त्याने खरोखरीच वस्ती केली. इ. स. १८९० ते १८९४ पर्यंत चार वर्षे त्या बेटांत त्याने काढलीं. तेथे त्याची प्रकृति साधारण बरी असे, परंतु रोगबीज कधी नाहीसें झालेंच नाही. अशा स्थितींत १८९४ च्या अखेरीस कांहीसा एकाएकीच त्याला मृत्यु आला.

सर्व जगाच्या नवलाईचा विषय झालेलें असें हें स्टीव्हनसनचें चरित्र आहे. यावरून त्याचा प्रकृतिस्वभाव किती अद्‌भुतरसप्रिय होता, हें तर दिसून येतेंच, परंतु हा त्याचा स्वभाव शरीरप्रकृति अतिशय खराब व ढासळलेली असतांना देखोल कायम राहिला याचें सर्वांत मोठें आश्चर्य वाटतें. दुसरा एखादा असता तर आपल्या रोगट अवस्थेसंबंधाचें दुःख मनांतल्या मनांत उगाळून त्याने आपल्या आयुष्याची नासाडी करून घेतली असती. परंतु स्टीव्हनसनची वृत्ति शेवटपर्यंत आनंदी, आशावादी व खेळकर अशीच होती. आपली शारीरिक व्याधि विसरून मनोमय कल्पनाचित्रांच्या किंवा बाह्य सृष्टीच्या आस्वादांत गुंग होऊन राहणें, हा विस्मृतियोग त्याला उत्कृष्ट रीतीने साधला होता. हा त्याचा आनंदीपणा वरवरचा किंवा कष्टाने कसाबसा अंगीं आणलेला नसून तो त्याचा स्वभावधर्मच बनून गेला होता. आणि याचें कारण त्याची रोमांटिक प्रकृति होय. रोमान्स म्हणजे वस्तुजाताविषयीं नवलाईचा भाव. अर्थात् रोमांटिक मनुष्याची वृत्ति नेहमी वस्तुनिष्ठ ( objective ) असते. आत्मनिष्ठ ( Subjective ) वृत्तीचा मनुष्य स्वदुःखांचें स्तोम करून तीं वाढवितो व स्वतःस अधिकच त्रास करून घेतो. याच्या उलट वस्तुनिष्ठ वृत्तीच्या मनुष्यास शारीरिकवेदना अपरिहार्य म्हणून काय होतील तेवढ्याच, त्याचें मन वस्तुजातांतील रम्य, नवलाईचा, कुतूहलपूर्ण असा भाग शोधण्यांत गुंग असतें.

जें रम्य तें बघुनिया मज वेड लागे
गाणें मनांत मग होय सर्वेचि जागें ।

अशी वृत्ति केवळ बोलून दाखविण्यापुरती नसून खरीखुरीच स्टीव्हनसनची होती.

परंतु या विस्मृतियोगापेक्षाही कठिनतर व उदात्ततर असा कर्मयोग त्याने साधला ही त्याची खरी बहादुरी होय. प्रकृति इतकी अधू असूनही जन्मभर अनेक धाडसाच्या सफरी त्याने केल्या. तथापि त्याचा कर्मयोग म्हणावयाचा तो हा देखील नव्हे. आपल्या शारीरिक अस्वस्थतेची दरकार न करितां त्याने आजन्म जें लेखन केलें तोच त्याने साधलेला अत्यंत बिकट असा कर्मयोग होय. सुमारें वीस वर्षें, आपला आजार, कौटुंबिक अस्वास्थ्य, स्थलांतरें, प्रवास यांतून जितका वेळ काढतां येईल तितका काढून तो एकसारखें लिहीत होता. त्याच्या लेखनभांडाराच्या समग्र आवृत्त्या अनेक प्रसिद्ध झाल्या, त्या वीसपासून चाळीस खंडांच्या, इतक्या मोठ्या आहेत. इतकें प्रचंड लिखाण केलेला लेखक आमच्याकडे हरिभाऊ आपटे व श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याखेरीज बहुधा दुसरा कोणी नसेल. इतकें सर्व लिखाण आजन्म आजाराने पछाडलेल्या स्थितींत व फक्त चवेचाळीस वर्षांच्या आयुष्यांत त्याने केलें. कर्मयोगाचें तत्त्वज्ञान भगवद्गीतेने व टिळक गांधींसारख्या महात्म्यांनी स्वस्त करून ठेवलें असल्याने त्याची पोपटपंची आपल्या देशांत पुष्कळच चालते. परंतु कर्मयोगाचा उद्घोष कोण किती करतो यास महत्त्व नसून कर्मयोगाचें आचरण कोणच्या देशांतले लोक किती करतात यावर राष्ट्राचा उत्कर्ष अवलंबून असतो.

रोमान्स जसा स्टीव्हनसनच्या अंगीं उपजतच होता तशी लेखनकला मात्र त्यास उपजत साध्य नव्हती. त्याने व्यासंगपूर्वक प्रयत्न करून ती साध्य करून घेतली होती. चिकित्सक दृष्टीसाठी व भाषाशैलीसाठी हॅझ्लिट, मांटेन प्रभृति निबंधकार, अद्भुत कल्पनांसाठी स्कॉट, मॅरियट, डीफो, स्टर्न इत्यादि ग्रंथकार त्याने अभ्यासिले. विनीत, लाजाळू, भिडस्त, अशा या तरुणाच्या लेखनगुणांकडे व अंतर्हित प्रतिभेकडे सिडने कॉलव्हिन, लेस्ली स्टीफेनसारख्या विख्यात विवेचकांचें लक्ष वेधलें व त्यांनी त्याचा पुरस्कार केला. तरी देखील कित्येक वर्षें जनतेकडून त्याच्या

लिखाणाचें चीज होण्याचें चिन्ह दिसेना. लिखाणास कोठूनही मागणी नाही, त्यावर गुजारा करणें तर राहोच, परंतु वरखर्चापुरते चार पैसे मिळण्याचीही भ्रांत; अशा स्थितींत अनेक कादंबऱ्या, गोष्टी लिहिण्याचे बेत करावे, चार चिठोरीं लिहावीं, पुनः निराशेने गळाठून लिहिलेलीं चिठोरीं विस्तवांत फेकून द्यावीं, अशा निराशापूर्ण स्थितींत कित्येक वर्षे तो कालक्रमणा करीत होता. परंतु शेक्सपियरने म्हटल्याप्रमाणे मनुष्याच्या आयुष्यांत अशी एक भाग्याची लहर येऊन जाते की तिचा फायदा घेतला असतां मनुष्य उत्कर्षशिखरावर लोटला जातो. स्टीव्हनसन अमेरिकेंतून विवाहबद्ध होऊन परत १८८० सालीं आला त्यावेळीं त्याच्याबरोबर त्याचा सावत्र मुलगा लॉइड ऑसबोर्न हाही होता. रिकाम्या वेळची करमणूक म्हणून तो एक दिवस एका काल्पनिक बेटाचा नकाशा रंगवीत बसला असतां स्टीव्हनसनचें त्याच्याकडे लक्ष गेलें. झालें. तें बेट पाहून त्याच्या कल्पनाशक्तीला चालना मिळाली. त्या बेटांत पुरलेला खजिना त्याच्या दृष्टीला दिसूं लागला; डाके, खून, लूटमार करून खजिना मिळविणारे चांचे लोक त्याच्या डोळयांसमोर तरंगूं लागले. त्या नकाशांत एक एक जागा तो भरूं लागला व त्याचें स्पष्टीकरण करून लॉईडला सांगूं लागला. लॉइड इतका हरखला की त्याने सबंध गोष्टच लिहून काढण्याविषयीं आपल्या सावत्र बापाला आग्रह केला. याप्रमाणे 'निधिद्वीप' (Treasure Island) या अत्यद्‌भुत कादंबरीच्या रचनेस सुरवात झाली नवलकथा संपूर्ण लिहून होतांच एका मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध करण्यांत आली, तेव्हा तिने लोकांचें लक्ष ताबडतोब वेधून घेतलें. पुस्तकरूपाने प्रसिद्ध होतांच वाचकांच्या तिजवर उड्या पडल्या व साहित्यिकांच्या अखेरच्या रांगांमध्ये घोटाळणाऱ्या स्टीव्हनसनची एकदम पहिल्या रांगेंत बढती झाली.

'ट्रेझर आयलंड' ही अठराव्या शतकांत, ज्या वेळीं वाफेच्या बोटी नव्हत्या अशा काळीं, समुद्रावर वाटमार करीत हिंडणाऱ्या चांचे लोकां-संबंधींची एक अद्‌भुत कथा आहे. समुद्रतीरावर असलेल्या एका पथिक-गृहा (Inn) मध्ये एक म्हातारा दांडगेश्वर खलाशी येऊन उतरतो. त्याचे कांही सोबती चांचे त्याला येऊन भेटतात. पथिकगृहाच्या मालकाचा मुलगा जिम हॉकिन्स हा लहानच पण मोठा हुशार, प्रसंगावधानी व धूर्त होता.

दांडगेश्वर आपल्या आरोळ्यांनी व दणदणाटाने सर्वांना भिववून टाकतो व जिमचा खाणावळवाला बाप तर बिचारा त्याच्या धास्तीनेच राम म्हणतो. पुढे दारूच्या अतिरेकामुळे अपस्मार होऊन हा दांडगेश्वर तेथेच मरण पावतो. तेव्हां त्याचें सामान खोलून पाहतां त्यांत दूरवरच्या महासागरांतील एका बेटाचा नकाशा त्या मुलास आढळतो. त्या नकाशांत एका विशिष्ट जागी खजिना पुरलेला आहे असें दाखविलेलें असतें. जिमच्या ओळखीचे डॉक्टर लिव्हसे व स्क्वायर ट्रेलॉनी असे दोघे प्रतिष्ठित सद्गृहस्थ असतात, त्यांना तो हा नकाशा दाखवितो. लगेच ते स्वतःचें एक गलबत तयार करून त्या निधिद्वीपाकडे जाऊन तो निधि आणण्याचा निश्चय करितात. ट्रेलॉनी हा मोठा उत्साही परंतु तितकाच भोळसर. गलबताकरितां नाखवे व कप्तान मिळविण्याचें काम त्याच्यावर सोपविलेलें असतें. लाँग जॉन सिल्व्हर नांवाच्या एक पाय तुटलेल्या चांच्यांच्या प्रमुखाने त्याला तेव्हाच घेरलें व आपल्या वर्गाच्या सर्व बदमाष चांच्यांची त्याने नाखवे म्हणून नेमणूक करून घेतली. गलबताचा कप्तान स्मॉलेट हा मात्र अत्यंत प्रामाणिक व कर्तव्यदक्ष मिळाला.

या गलबतांतून पुढे निधिद्वीपाला सगळे लोक कसे जातात, लाँग जॉन सिल्व्हर नाखव्यांना कसा फितवितो व बेटावर गेल्यावर तेथे दोन्ही पक्षांमध्ये कसकशा झटापटी होतात, बेटावर आणखी काय काय चमत्कार घडतात व सरतेशेवटीं खजिना मुख्य मालकांच्या कसा हस्तगत होतो, वगैरे अद्भुतरसपूर्ण घटनांचें वर्णन करण्यास येथे अवकाश नाही. एका गुप्त बेटांत पुरून ठेवलेला खजिना काय, त्याच्या शोधाकरितां जाणारी नादी मंडळी काय, आणि त्या खजिन्याकरितां जीव टाकणारे बेहोष, घातकी व दांडगे चांचे काय, सर्वच वस्तु व व्यक्ति नवलाईच्या. सर्व व्यक्ति जितक्या नवलाईच्या तितक्या वैशिष्ट्यपूर्ण व जितक्या वैशिष्ट्यपूर्ण तितक्याच जोमदार व ठळकपणाने रेखाटलेल्या. धाडशी वृत्ति (Spirit of adventure) तर या नवलकथेंत अथपासून इतिपर्यंत भरलेली आहे. अशी ही मनाला गुंगवून सोडणारी विलक्षण नवलकथा आहे.

'ट्रेझर आयलंड' लोकांना अतिशय आवडल्यामुळे पुढें स्टीव्हनसन जें लिहील त्याच्याकडे लोक मोठ्या आस्थेने व कौतुकाने बघूं लागले. स्टीव्हन-

सननेही त्यांच्या या प्रेमाचा मोबदला वाङ्मयकृतींच्या रूपाने भरपूर दिला. इंग्लंडांत बोर्नमथ येथे जीं तीन वर्षें त्याने काढलीं त्या अवकाशांत त्याने सपाटून लेखन केलें. 'ट्रेझर आयलंड' इतकीच त्याची दुसरी विख्यात नवलकथा Kidnapped (पळवून नेलेला), Prince Otto (राजपुत्र ओटो) ही कादंबरी व Dr. Jekyll and Mr. Hyde (डॉ. जेकिल आणि मि. हाइड) ही मानसशास्त्रीय नवलकथा याच काळांत त्याने लिहिली. Kidnapped ही स्कॉटलंडच्या इतिहासांतील एका सुप्रसिद्ध खुनाच्या हकीकतीवर आधारलेली नवलकथा आहे. यानंतर पासिफिक महासागरांत प्रवास करीत असतां त्याने Master of Ballantrae (बॅलनट्रेचा मालक) या नांवाची विख्यात नवलकथा लिहिली. एका घराण्याच्या इस्टेटीबद्दल व एकाच स्त्रीबद्दल दोन सख्ख्या भावांमध्ये आजन्म चाललेल्या हाडवैराची विलक्षण व रोमांचकारी कथा यांत निवेदन केली आहे. अंतःकरण थरारून सोडणाऱ्या वर्णनांनी ही कादंबरी भरलेली आहे.

स्टीव्हनसनने लघुकथाही अनेक लिहिल्या व त्यांतील कित्येक परिणामकारक कलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. बहुतेक सर्व लघुकथांमध्ये रोमान्स भरपूर प्रमाणांत उतरला आहे. बऱ्याचशा लघुकथा स्कॉटलंडांतील परिस्थितीला धरून लिहिलेल्या आहेत. हेनले नांवाच्या एका मित्राच्या मदतीने त्याने अनेक नाटकेंही लिहिलीं. परंतु नाटककार या नात्याने त्याला यश लाभलें नाही. प्रवासवृत्तें व स्थलवर्णनें त्याने पुष्कळच लिहिलीं आहेत व त्यांत त्याच्या अद्भुतपर वृत्तीचा खेळ चालण्यास भरपूर वाव असल्यामुळे तीं अत्यंत हृद्य वठलीं आहेत. वाङ्मयविवेचक या नात्याने स्टीव्हनसनचें स्थान फार उच्च आहे असें नव्हे. आणि वाङ्मयविवेचन या सदरांत मोडतील असे त्याचे निबंधही थोडेच आहेत. परंतु जे आहेत त्यांत मार्मिक विचारांचे कण इतस्ततः विखुरलेले आढळतात. वाङ्मयाखेरीज इतर विविध विषयांवर लिहिलेले त्याचे निबंधच पुष्कळ आहेत. या निबंधांत त्याचे उदात्त विचार, नीतिपर दृष्टिकोन आणि विनयशील वृत्ति यांचा प्रत्यय येतो व लेखकाविषयींचा आपला प्रेमभाव वृद्धिंगत होतो. मुलांच्याकरितां व मुलांची मनःसृष्टि व्यक्त करणारी कविताही त्याने बरीच लिहिली आहे व ती अंतःकरणास वेध लावणारी आहे.

इतक्या भिन्न भिन्न शाखांमध्ये जरी स्टीव्हनसनने लेखन केलें असलें तरी रोमान्सचा आचार्य व अद्‌भुतरसपर कथांचा निर्माता म्हणूनच त्याला लोक ओळखतील. या क्षेत्रांत त्याचें स्थान अद्वितीय आहे व तें आंग्ल वाङ्मयांत अढळ राहील. त्याचा रोमान्स विशुद्ध स्वरूपाचा आहे. त्यांत कोठेच शृंगार, वीर किंवा करुण या रसाचें म्हणण्यासारखें मिश्रण नाही. या संबधांत ही एक गोष्ट लक्षांत घेण्याजोगी आहे, की त्याच्या सर्व वाङ्मयास प्रणयभावनेचा स्पर्श झालेला नाही. त्याच्या सर्व कादंबऱ्या स्त्रीचरित्रापासून जवळजवळ अलिप्त आहेत. स्त्रियांचीं जीं पात्रें कादंबऱ्यांमधून क्वचित् आणलेलीं आहेत, तीं बिनमहत्त्वाचीं आहेत व तीं अगदीच उपरीपणाने रेखाटलेलीं अशीं भासतात. यद्यपि स्टीव्हनसनने विवाह केलेला असला तरी तो आजन्म स्त्रीसंबंधापासून अलिप्त असावा असें वाटतें. स्त्रीहृदयाची पारख तर राहोच, परंतु त्याचें अवलोकनही त्याने सखोल दृष्टीने केलेलें नव्हतें, असें त्याच्या वाङ्मयावरून दिसून येतें. म्हणूनच त्याच्या संबंधाने एका विवेचकाने म्हटलें आहे–His heroines, where there are any, are mere boys in petticoats. (त्याच्या वाङ्मयांतील नायिका म्हणजे साडी नेसलेलीं मुलेंच होत.)

या कारणामुळेच त्याच्या कथाकादंबऱ्यांमध्ये शृंगारादि प्रमुख रसांचा प्रकर्ष, किंबहुना प्रादुर्भावही, फारसा झालेला दिसत नाही. शृंगाराविषयीं तर बोलावयासच नको, परंतु वीर आणि करुण हे रस देखील स्त्रीभूमिकांच्या आधाराने व त्यांच्यामुळेच वाङ्मयामध्ये प्रवृत्त होत असलेले नेहमी दिसतात. तेव्हा स्टीव्हनसनच्या लिखाणांत या रसांचा संनिवेश नसावा या गोष्टीची उपपत्ति स्टीव्हनसनच्या स्त्रीजीवनाविषयींच्या अनभिज्ञतेवरून लावितां येते.

आपल्या लिखाणांत स्त्रीजीवनाचा तो होतां होईतों संबंध आणीत नसे याचा दाखला त्याच्या 'डॉ जेकिल आणि मि. हाइड' या कथेमध्ये मिळतो. दुसरा एखादा कादंबरीकार असता तर त्याने मि. हाइड या पापी व दुष्ट व्यक्तीला स्त्रीसंबंधीं दुराचारांत व भ्रष्टाकारांत रमलेला असा दाखविलें असतें. परंतु स्टीव्हनसन असलें दुराचरण दुरून सूचित करण्यापलीकडे कांही करीत नाही. त्याने प्रत्यक्ष उदाहरणें दिलीं आहेत तीं हाइडच्या क्रूर-

पणाचींच आहेत. बदफैलीपणाचें उदाहरण देण्याचें तो टाळतो असें दिसतें.

परंतु यामुळे प्रस्तुत कथेच्या वाङ्मयसौंदर्यांत उणेपणा आला आहे, असें मुळीच नाही. प्रस्तुत कथेच्या निर्मितीचा वृत्तांत पुढे लॉइड ऑसबोर्न याने लिहिलेल्या हकीकतीत (पृ. ५–८) आलाच आहे, त्यावरून असें उघड दिसतें की गोष्टीतलें नैतिक तात्पर्य अगदी ठळक व स्फुट व्हावें हा हेतु मनांत बाळगून स्टीव्हनसनने ही गोष्ट मुद्दाम पुनः लिहून काढली. त्याने पहिल्या प्रथम जी गोष्ट लिहिली होती ती भावनापूर्ण कादंबरी या नात्याने सुंदर वठली होती, परंतु त्यांतील नैतिक रूपक आंत दबून गेलें होतें. त्या रूपकाची ठळक रीतीने उठावणी करून त्याचें नैतिक पर्यवसान वाचकांच्या डोळ्यांत भरेल अशा रीतीने पुढे मांडणें हें केवळ नीतिबोधाच्या दृष्टीनेच नव्हे तर कलादृष्ट्याही आवश्यक होतें, हें स्टीव्हनसनने ओळखलें व त्याप्रमाणे गोष्टीची पुनर्रचना केली.

या ठिकाणीं स्टीव्हनसनने दाखविलेला समंजसपणा व संयम लक्षांत ठेवण्याजोगा आहे. कोत्या दृष्टीचा कलाकार या ठिकाणीं चकला असता. कथेचें सौंदर्य व भावनात्मकता यांतच गुंगून जाऊन त्याने त्याच अंगांना महत्त्व दिलें असतें. परंतु कलाकृतीचें जें वैशिष्टय असेल त्याचा ठळकपणें उठाव झाला पाहिजे; त्यांतच कलेची सार्थकता आहे, हें स्टीव्हनसनच्या अभिजात कलादृष्टीने तेव्हाच हेरलें. केवळ गमतीदाखल, खेळाकरितां असद्वृत्तींना थोडासा वाव दिला तर त्याचें पर्यवसान अखेरीस असद्वृत्तींच्या पूर्णपणें आहारीं जाण्यांत होतें, मानवी मनाचा ताबा त्या वृत्तीवर राहत नाही, हा नैतिक सिद्धान्त वाचकाच्या मनावर ठसविणें, हा या कथेचा हेतु होय. कथानकाच्या गुंतागुंतींत किंवा भावनांच्या प्रवाहांत हा हेतु जर गडप झाला तर कथेचें वैशिष्टय नाहीसें होऊन ती इतर शेंकडो, हजारों मामुली कादंबऱ्यांप्रमाणे होईल, हें लक्षांत घेऊन बाह्य सौंदर्यास वश न होतां स्टीव्हनसनने वैशिष्टयाचा नीट उठाव होईल, अशी अंतरंग रचना केली.

'डॉ. जेकिल आणि मि. हाइड' ही मनोव्यापारदर्शक नवलकथा–रोमान्स–आहे. यांतील पात्रें सर्वसामान्य समाजांतल्यासारखींच दिसत

असूनही ही कथा रोमान्समध्येच गणली जाते, याचें कारण असें आहे की यांतील पात्रें जरी सर्वसाधारण आहेत तरी त्यांतील मनोव्यापारांचें पृथक्करण जें केलें आहे तें अद्भुत व नवलपूर्ण आहे. निर्भेळ दुष्ट वृत्ति पृथक्कृत स्वरूपांत सृष्टींत कोठेंही आढळत नाहीत. एका सामान्यत: सद्वर्तनी मनुष्याच्या मनांतील दुष्ट वृत्ति तेवढयाच निराळया होऊन त्यांनी स्वतंत्र व्यक्तीचें रूप धारण करणें, ही घटना जी या कादंबरींत वर्णन केली आहे ती अत्यंत अद्भुत व आश्चर्यकारक आहे. स्टीव्हनसनच्या अघटितघटनापटु कल्पनाशक्तीचा हा विलक्षण विलास होय.

कथानकाच्या उभारणीस कारणीभूत झालेल्या या कल्पनाविलासाइतकाच पुढे कथानकाच्या पर्यवसानास कारणीभूत झालेला कल्पनाविलासही महत्त्वाचा व बहारीचा आहे. डॉ. जेकिल (शरच्चंद्र) याच्या दुष्ट वृत्ति वेगळया होऊन त्यांचा पुतळा मिस्टर हाइड (कृष्णराव) याच्या रूपाने वावरूं लागतो हें खरें; परंतु प्रारंभीं ही गोष्ट ऐच्छिक असते. स्वतःस वाटेल तेव्हा डॉ. शरच्चन्द्राचें रूप तो पुन: धारण करूं शकतो. कृष्णरावावर ताबा गाजविण्याचें हें सामर्थ्य संपुष्टांत येऊं लागून अनिच्छया कृष्णरावाची कृष्णच्छाया डॉ. शरच्चन्द्रावर जेव्हा पडूं लागते, तेव्हा अध:पाताच्या मार्गांतून परत फिरण्याच्या दाराचीं कवाडें कायमचीं बंद होतात व शरच्चन्द्राच्या भविष्याचा सीलबन्द लखोटा तयार होतो. डॉ. शरच्चन्द्राच्या सद्वृत्तीपेक्षा त्याच्या दुर्वृत्ति वापरामुळे अधिक प्रबळ बनून त्या त्याच्या व्यक्तित्वाचा कबजा मिळवितात, ही नैतिक घटना दर्शविण्याकरितांच इच्छा नसतांना व औषध न वापरतां देखील शरच्चन्द्राचा कृष्णराव बनूं लागतो अशी कल्पना केली आहे व मूळ कल्पनेइतकीच हीही अत्यंत समर्पक व परिणामकारक आहे.

मनुष्याच्या दुष्ट वृत्तिच तेवढया पिंडीभूत होऊन स्वतंत्र व्यक्तीच्या स्वरूपांत वावरूं शकतात ही कल्पना अर्थातच अद्भुत व नवलाईची आहे. पुराणकालीन दैत्यांच्या कल्पनेचा हा अवतारच म्हणावयाचा ! वास्तवतेचा हिच्यांत मागमूसही नाही. म्हणूनच डॉ. शरच्चंद्र, मनोहरपंत इत्यादि पात्रें जगांत वावरणाऱ्या सामान्य व्यक्तींसारखीं दिसलीं तरी कथानकांतली मुख्य कल्पना विस्मयजनक व अद्भुत असल्यामुळे ही कथा

'रोमान्स'च्याच सदरांत पडते हें उघड आहे. मामुली तऱ्हेचें स्वभाव-वर्णन व मनोव्यापारांची चिकित्सा या कथेंत आढळणार नाही. कथाभागा-मध्ये कृतीचें व घटनांचें (incident) बाहुल्य नाही व घटनेंत भाग घेणाऱ्या व्यक्तीच्या मनोव्यापारांचें विवरण नाही. नैतिक प्रमेयाच्या उद्‌घाटनाकरितां अगदी जरूर तेवढींच पात्रे, अवश्य तेवढ्याच घटना व त्या घटनांचें अपरिहार्य तितकेंच वर्णन या कथेंत दिसून येतें. यांतच स्टीव्हनसनच्या कलेचें रहस्य सामावलें आहे.

नैतिक हेतु सोडल्या, तर स्टीव्हनसनची रचनापद्धति इतरत्रही याच मासल्याची दिसून येते. त्याच्या कथांमधील वातावरण व परिस्थिति अद्‌भुत असते; तथापि पात्रें मानवी असतात. त्यामुळे त्याच्या कथांची पकड वाचकांच्या मनावर बसते. व्यक्तीच्या स्वभावविशेषांचें सखोल विश्लेषण, समाजस्थितीचें उद्‌घाटन, सामाजिक प्रश्नांचें विवरण, इत्यादि ज्या गोष्टींचा पिच्छा ललितवाङ्मयाचे लेखक नेहमी पुरवीत असतात त्यांच्या वाटेस स्टीव्हनसन बहुधा गेला नाही. नवलपरीचीं दृश्यें निर्माण करून त्यामुळे होणाऱ्या अद्‌भुतरसाच्या आनंदांत मनास निमज्जित करून त्यास विगलितवेद्यान्तर असें करून सोडणें, हें रोमान्सचें कार्य. अर्थात् त्याच्या मागे कांही हेतु नसतो व त्याच्यापुढे परिणामाचें भविष्यही उभें नसतें. खराखुरा निर्हेतुक कलाकार जर कोणी असेल तर तो रोमांटिक रचना करणाराच होय. स्टीव्हनसन बहुतांशीं याही कसोटीस उतरला होता. तो कांही शॉप्रमाणें सामाजिक बंडखोर नव्हता. परंपरागत नीतिनिय-मांवर व समाजरचनेवर सामान्यत्वेंकरून त्याची निष्ठा होती. पुढे पुढे टॉल-स्टॉयच्या तत्त्वज्ञानाचाही त्याला छन्द लागलेला होता. परंतु तो केवळ छन्दच ! त्याचें वाङ्मय कोणच्याही बोधाकरितां, तत्त्वप्रतिपादनाकरितां लिहिलेलें नाही. आनंदी व आशावादी मनाने सृष्टींतील अपार वैचित्र्याचा व विलक्षण घटनांचा अनुभव घ्या, हाच संदेश त्याच्या जीवनांतून व वाङ्मयांतून, काढावयाचाच झाला तर, काढतां येईल असें वाटतें.

**श्रीनिवास नारायण बनहट्टी**

*

# मिसेस स्टीव्हन्सनने लिहिलेला मजकूर

माझ्या पतींना नेहमी हुकुमी झोप घेतां येत असे. "मला अर्ध्या तासाने उठव" असें म्हणून उशीवर डोकें टेकलें की एका क्षणांत शांत झोपेंत ते निमग्न होऊन जात. अलीकडे, त्यांच्या आयुष्यांत पहिल्या प्रथमच, त्यांची झोप अस्वस्थ व अनियमित होऊं लागली होती.

नाटकाच्या बाबतींत ते करीत असलेल्या सहकार्यांत (प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे) सक्तीने खंड पाडणें भाग पडलें असतांना "डॉ. जेकिल आणि मि. हाइड यांचा विलक्षण वृत्तांत" हें पुस्तक लिहिण्याची त्यांना स्फूर्ति झाली ती अशी. एक दिवस, झोपेंत भिऊन ते ओरडूं लागल्यामुळे मला त्यांना उठविणें भाग पडलें. पण त्यामुळे त्यांना उलट रागच आला. झोपमोड केल्याबद्दल मला दोष देऊन ते म्हणाले, "मला बागुलबोवाच्या एका सुंदर गोष्टीचें स्वप्न पडत होतें." आणि लागलीच जेकिल आणि हाइडचा, रूपांतराच्या हकीकतीपर्यंतचा, सारांश त्यांनी झटदिशीं सांगून टाकला. स्वप्न येथपर्यंत आलें असतांनाच मी त्यांची झोपमोड केली होती.

उजाडतांच, अंगांत वारें भरल्याप्रमाणे, ह्या नवीन पुस्तकाच्या उद्योगाला ते लागले. तीन दिवसांत सुमारें तीस हजार शब्दांचा पहिला खर्डा लिहून तयार झाला, पण लागलीच तो सर्वच्या सर्व नाहीसा करून निराळ्या दृष्टिकोनाने, रूपकाच्या दृष्टीने, तो त्यांनी संपूर्ण पुन: लिहून काढला. रूपकाची ही दृष्टि त्या गोष्टींत प्रथमपासूनच उघड दिसत होती; पण घाईने म्हणा, किंवा स्वप्नाचा एक अपरिहार्य परिणाम म्हणा, ही आतापर्यंत त्यांच्या लक्षांत आली नव्हती. दुसऱ्या तीन दिवसांत, मागाहून केलेल्या थोड्या किरकोळ दुरुस्त्या वगळल्या, तर पुस्तक छापण्यास तयार

झालें ह्याकरितां करावे लागलेले श्रम खरोखरच भयंकर होते. माझ्या पतींची शरीरप्रकृति इतकी नाजूक असतांना सहा दिवसांत साठ हजार शब्द कागदावर उतरण्याचे नुसते शारीरिक श्रम सुद्धा ते करूं शकतील या गोष्टीवर सहसा विश्वास बसत नाही. अखंड रक्तस्रावाने ते आजारी होते, त्यांना बोलण्याची सुद्धा परवानगी क्वचितच दिली जाई. पाटीपेन्सिल-द्वाराच त्यांच्याशीं संभाषण करण्याची मोकळीक असे. दोन व्यक्तींना एकाच वेळीं त्यांच्या खोलींत जाऊं दिलें जात नसे. आणि डाक्टराने एखाद्याला भेटण्याची सवलत दिलीच, तर पंधरा मिनिटांच्या अवधीत मुलाखत संपवावी लागे. हातांत घड्याळ घेऊन आलेल्या पाहुण्याला सूचना देण्याकरितां दारावर पाहरा देण्याचें कटु कर्तव्य माझ्या वाट-णीस येई.

इंग्लंड आणि अमेरिका या दोन्ही ठिकाणीं, अमेरिकेंत तर परवानगी-वाचूनच, डॉ. जेकिल आणि हाइड या पुस्तकाचा सररहा प्रसार झाला. या पुस्तकाला तात्काळ आणि आश्चर्यकारक यश मिळालें. त्याच्या कथा-नकाच्या आख्यानावर चर्चमधील उपदेशक प्रवचन करीत, आणि निदान तीन तरी निरनिराळ्या वेषाने तें नाटकाच्या रूपाने रंगभूमीवरही करून दाखविण्यांत आलें. त्यांपैकी मि. टी. आर. सुलिव्हान यांनी त्याचें जें रूपांतर केलें होतें, आणि ज्याचें हस्तलिखित सूचना व दुरुस्तीकरितां त्यांनी माझ्या पतीकडे पाठविलें होतें, तेंच रूपांतर खरोखर चांगलें वठलें होतें.

एखाद्या विशिष्ट पुस्तकांत ग्रंथकाराने निर्माण केलेल्या भूमिकेंत त्याचें स्वतःचें प्रतिबिंब पाहण्याची लोकांची प्रवृत्ति आश्चर्यकारक आहे. माझ्या पतीच्या शारीरिक रूपांत डॉ. जेकिल आणि मि. हाइड यांचें विचित्र मिश्रण आहे असेंही वर्णन करण्यांत आलें आहे. एक टीकाकार म्हणतो, "जणूं काय पाण्यांत अर्धवट बुडवून आतांच त्यांना बाहेर ओढून काढलें आहे, त्यांचे लांब केस अद्याप ओले व डोक्याला चिकटलेले आहेत असे ते दिसतात." ज्या चित्रकारांनी त्यांचीं चित्रें काढलीं त्यांनी सुद्धा 'जेकिल आणि हाइड'च्या लेखकाच्या चित्रांत कांही तरी विलक्षण, भयानक भाव ओढून ताणून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांचें खरोखरी प्रिन्स

ऑटोशीं पुष्कळ साम्य होतें, या गोष्टीची मात्र कोणालाच कल्पना आलेली दिसत नाही.

माझ्या पतींना पुष्कळ विलक्षण पत्रें, विशेषतः अध्यात्मवादी व थिऑसॉफिस्ट लोकांकडून आलीं. त्यांची अशी कल्पना होती की या द्विविध जीवनाचें चित्रण करण्यांत कांही तरी दैविक, अतिमानुष शक्तीची मदत माझ्या पतींना मिळाली असावी. एका जर्मन कौन्टेसने आपल्या पत्रांत विचारलें होतें की, "खरोखरीच ही गोष्ट स्वप्नांत दिसली आहे काय ? तसेंच जर असेल तर माझी खात्री आहे की तुमची स्थिति मोठी धोक्याची आहे. कारण सुष्ट आणि दुष्ट या दोन्ही गूढ शक्ति तुमच्या आत्म्यावर स्वामित्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत आहेत. माझी तुम्हांला अशी विनंती आहे की आता तुम्ही थिऑसॉफीच्या सिद्धांतांचा स्वीकार करा, नाहीतर दुष्ट गूढ शक्ति तुमच्यावर स्वामित्व प्रस्थापित करतील आणि मी खात्रीने सांगतें की मग मात्र परिणाम भयंकर होईल."



# मि. लॉयड ऑस्बोर्न यांनी लिहिलेला मजकूर

त्यांची प्रकृति कमालीची खालावलेली होती. आजच्या इतकी भयानक व सुकून गेलेली, इतकी विरूप व दुःखी चर्या त्यांची कधीच दिसत नव्हती. त्यांचे लांब केस, त्यांच्या सुकलेल्या चेहऱ्यांत इतके असामान्य तेजस्वी दिसणारे त्यांचे डोळे, कसा तरी अव्यवस्थित चढविलेला व बिलकुल लक्ष न दिला गेलेला त्यांचा आजाऱ्याचा पोशाख, हें सर्व चि माझ्या मनश्चक्षूंपुढे कायमचें स्थिर व अचल रेखाटलेलें आहे; आणि त्या चित्राबरोबरच अनिर्वचनीय अशी करुणेची भावनाही निगडित झालेली आहे.

अर्थात त्यांच्या प्रकृतींत फेरबदल होत असे. मधून मधून कांही वेळां त्यांची प्रकृति तुलनेने सुधारलेली दिसे व लंडनला जाऊन ते थोडे दिवस राहत. एकदा तर ते पॅरिसपर्यंतही गेले; एकदा टॉमस हार्डींना भेटण्यास डॉर्चेस्टरला ते गेले आणि तसेंच पुढे एक्झेटरला जाऊन तेथे आजारी पडले. त्या दुखण्याने ते तीन आठवडे आजारी होते व जवळ जवळ मृत्यूच्या दारींच जाऊन पोचले होते. पण हे अपवाद सोडले तर सामान्यतः ते आपल्या घरांतच अडकून पडलेले असत आणि स्वतःच्या छोट्याशा बागेशिवाय बोर्नमथच्या इतर भागांतही ते कधी गेले नाहीत.

अशा असहाय स्थितींतही त्यांनी आपलीं पुस्तकें कशीं लिहिलीं हें एक वाङ्मयसृष्टींतील आश्चर्यच आहे. आणि तीं पुस्तकेंही इतकीं तेजस्वी आणि प्राणवान् की आजाऱ्याच्या खोलींत त्यांचा जन्म झाला आहे हें कोणाला खरें सुद्धा वाटणार नाही; इतकीं ओजस्वी की त्यांचा मूळचा जोम व स्फूर्ति कधी कमी झालेली दिसणार नाही किंवा लेखक मरणाच्या दारीं गेल्यामुळे त्यांत मधून मधून पडलेल्या खंडाची सूचक चिन्हेंही त्यांत मुळीच आढळणार नाहीत. 'स्केरीव्होर' मधील ह्या वर्षामध्ये ग्रंथसंपत्ति

विपुल निर्माण झाली. 'डॉ. जेकिल आणि मि. हाइड यांचा विलक्षण वृत्तांत'ही येथे लिहिला गेला. तसेंच 'किडनॅप्ड', तसेंच 'मार्खाइम', आणि तशाच त्यांच्या असंख्य लघुकथा आणि फ्लेमिंग फेंकिनचें चरित्र सुद्धा याच वेळीं लिहिलें गेलें.

एक दिवस ते दुपारीं भोजनास आले तों त्यांच्या मनांत कांही तरी विषय घोळत असलेला दिसला. जेवण घाईंतच त्यांनी उरकलें—त्यांच्या बाबतींत ही अश्रुतपूर्व गोष्ट—आणि जातांना म्हणाले की स्वप्नांत दिसलेली एक नवीन गोष्ट मी तयार करीत आहें व त्यांत मला असामान्य यशही येत आहे. अगदी घराला आग लागली तरी मला कोणी त्रास द्यावयाचा नाही की माझ्या कामांत व्यत्यय आणावयाचा नाही.

तीन दिवस 'स्केरीव्होर' वर शांततेचें साम्राज्य पसरलें. आम्ही सर्व, नोकरचाकर आणि प्रत्येक जण अगदी चोरपावलांनी, बिलकुल आवाज न करितां, हिंडत असूं. स्टीव्हन्सनच्या खोलीवरून जातांना, अंथरुणावर उठून बसलेले, एका क्षणाची सुद्धा विश्रांति घेतल्याशिवाय पानांमागून पानें भरून काढीत असलेले ते मला दिसत. अखेर तीन दिवसांनी हें रहस्यमय कार्य पूर्ण झालें; आणि 'डॉ. जेकिल आणि मि. हाइड' यांच्या विलक्षण वृत्तांता'चा पहिला खर्डा त्यांनी माझ्या आईला व मला वाचून दाखविला.

तो ऐकत असतांना मी तर जादूनें भारल्यासारखा मुग्ध होऊन गेलों. त्यांचा आवाज एखाद्या निष्णात नटालाही हेवा वाटेल असा होता, आणि त्यांनी वाचलें तेंही इतक्या तन्मयतेने, की माझें सर्वांग थरारून गेलें. त्यांनी वाचन संपविलें. विजयी वीराच्या आशेने, आणि अवर्णनीय आत्मसंतोषाच्या तीव्र उत्सुकतेने त्यांनी आमचेकडे पाहिलें, आणि ते व मी सुद्धा आता आई कशा उत्सुकतेनें स्तुतीचा वर्षाव करते याची आतुरतेने वाट पाहूं लागलों. पण तिने हात आखडलेला पाहून माझ्यावर तर वज्राघातच झाला. तिने स्तुति बेताचीच केली, शब्दही मोठ्या कष्टाने येत होते असें दिसलें. आणि मग एकाएकीं टीकेचा हल्ला चढविला. ती म्हणाली, "मुख्य मुद्दाच तुमच्या लक्षांत आला नाही. त्यांतील रूपक तुम्ही गमावून बसलां आहांत. तुम्ही ही एक साधी कादंबरी केली आहे—

भावना चेतविणारें सुंदर लिखाण आहे तें—पण वास्तविक ती एक उच्चतम कलाकृति व्हावयास पाहिजे.

स्टीव्हन्सन रागाने बेफाम होऊन गेले, ते थरथर कांपूं लागले, हस्तलिखितावर असलेला त्यांचा हातही कंप पावूं लागला, त्यांचा उद्वेग त्यांना असह्य झाला; त्यांच्या आवाजांत कटुता आणि त्वेष स्पष्ट दिसून येत होते. आणि रागाच्या भरांत तो माझ्या आईच्या आवाजापेक्षा किती तरी मोठा झाला. इतके विकारवश झालेले, इतके रागावलेले मी त्यांना पूर्वी कधीच पाहिलें नव्हतें. तें दृश्य इतकें क्लेशकारक होऊं लागलें की मी तेथून उठून बाहेर गेलों, मला तें अधिक सहन करवेना. कांहीतरी भयंकर प्रसंग ओढवणार अशा धाकधुकींतच शेजारच्या खोलींतून मी त्यांचे आवाज ऐकत होतों. त्यांचे शब्द स्पष्ट ऐकूं येत नव्हते तरीही त्यांतील विकारांचा वेग मला भासत होता आणि त्यामुळे माझ्या हृदयावर तीव्र आघात होत होते.

मी जेव्हा परत आलों तेव्हा माझी आई एकटी होती. शेगडीच्या समोर तिकडेच टक लावून पाहत, उदास व हताश होऊन उद्विग्न चित्ताने तेथे ती बसली होती. आमच्यापैकी कोणीही बोलेना. मी जर बोललोंच असतों तर मी तिला दोषच दिला असता. कारण मला वाटत होतें की तिने निर्दयपणाने फार मोठी चूक केली होती. इतक्यांत जिन्या-वरून लुई (स्टीव्हन्सन) खाली उतरतांना आम्ही ऐकले. जणूं काय पूर्वीचाच वाद पूर्वीपेक्षाही अधिक त्वेषाने पुढे चालविण्याच्या हेतूनेच ते एकदम आत येत आहेत, असें पाहून मी तर खचूनच गेलों. पण ते फक्त इतकेंच म्हणाले, "तुझें म्हणणें खरें आहे. वास्तविक रूपकात्मक भावच त्या गोष्टींत महत्त्वाचा आहे—त्याचें मुख्य रहस्यच आहे तें—पण माझें तिकडे बिलकुल लक्षच गेलें नव्हतें." आणि असें म्हणून माझ्या आईच्या या चुकलेल्या अपेक्षेचा व तिने त्यांना थांबविण्याकरितां केलेल्या निष्फळ प्रयत्नांचाच जणूं आनंद मानीत, त्यांनी तें हस्तलिखित शेगडींत फेकून दिलें. आगींत त्याचा भडका झालेला आम्ही पाहिला, तीं अमोलिक पानें त्या जाळांत सुरकतून, काळीं आणि वाकडींतिकडीं होत असतांना

जेव्हा आम्ही पाहिलीं, त्या वेळीं माझ्या आईला व मला मनांत काय वाटलें असेल याची कल्पनाच करावी.

माझी प्रथम समजूत झाली की त्यांनी चिडून जाऊनच असें केलें. पण तसें नव्हतें. आपली योजना चुकल्याबद्दल त्यांची खरोखरच खात्री पटली होती आणि आपल्या चुकीची दुरुस्ती त्यांनी अशा विस्मयकारक रीतीने केली. हस्तलिखित जाळून टाकण्याच्या ह्या मूर्खपणाबद्दल जेव्हा माझ्या आईने व मी दोघांनी मिळन ओरडून एकच गिल्ला केला तेव्हा त्यांनी स्वतःचें समर्थनही मोठ्या आवेशाने केलें. ते म्हणाले, "तें सर्वच चुकलेलें होतें. त्यांतील कांही भाग शिल्लक राखण्याचा प्रयत्न करतांना मी वाट चुकून इतका भलतीकडे गेलों असतों की नीट येण्याची आशाच नव्हती. मोहाला आटोक्याच्या पलीकडे राखणें हा एकच त्याला उपाय होता."

त्यानंतर तीन दिवसपर्यंत पुनः एकदा त्यांचा अविश्रांत उद्योग चालला. आणि आम्ही, चूपचाप, आतुरतेने, पाऊल सुद्धा न वाजवितां, काय होणार याची अपेक्षा करूं लागलों. जेवतांनाही ते क्वचितच बोलत, संध्याकाळीं सुद्धा त्यांच्या गैरहजेरीमुळे वातावरण उदास भासूं लागलें; आणि आपल्या अंथरुणावर उठून बसलेले, लेखन, लेखन आणि लेखन करीत असलेले, बिछान्यावर चोहोकडे लिहिलेले कागद पसरून टाकलेले अशा स्थितींत त्यांना पाहून चित्त दडपून जाऊं लागलें. ह्या सर्वाचें पर्यवसान म्हणजे आज सर्वश्रुत असलेलें, युरोपांतील प्रत्येक भाषेंत आणि पूर्वेकडील पुष्कळशा भाषांमधून भाषांतरित झालेलें आणि जगाच्या वाङ्मयांत ज्याच्यामुळे नवीन वाक्प्रचार रूढ झाला आहे, असें 'जेकिल आणि हाइड,' हें होय.

कोणत्याही दृष्टीने विचार केला तरी हें पुस्तक लिहिणें हें एक अचाट कृत्य होतें. सहा दिवसांत चौसष्ट हजार शब्द, दररोजचे दहा हजारांपेक्षाही अधिक ! अशा गोष्टीची ज्यांना फारशी कल्पना नसते त्यांच्याकरितां मी खुलासा करतों की, कोणत्याही ललितकलेच्या लेखकाची सामान्य सरासरी रोजचे एक हजार शब्द पडते. अँन्टनी ट्रोलोपने स्वतःकरितां हीच मर्यादा ठरविली होती. जॅक लंडनची तीच होती.

## अद्भुत कथेच्या निर्मितीचा अद्भुत वृत्तांत

एका दिवसाच्या वाङ्मयीन कार्याचें तें एक प्रकारचें मापच ठरून गेलें आहे. स्टिव्हन्सनने त्याची दसपट केली, आणि त्याच्यावर कडी म्हणजे ह्या सर्वांची दुसऱ्या दोन दिवसांत नक्कल केली आणि तिसऱ्या दिवशीं तें पोस्टांतही टाकलें.

हें एक महान् अचाट कार्य होतें. आणि आश्चर्याची गोष्ट अशी की म:गाहून थकवा वाटण्याऐवजी, त्यांना खात्रीने अधिक हुशारी वाटूं लागली; नवा जोम प्राप्त झाल्यासारखें दिसलें, समाधानाच्या मुद्रेने ते वावरूं लागले. एखादें निधान सापडल्यासारखा त्यांना आनंद झाला. कित्येक महिन्यांत नव्हती इतकी त्यांची प्रकृति सुधारलेली दिसूं लागली.

---

# डॉक्टर शरच्चंद्र



### प्रकरण पहिलें

## गल्लींतील दरवाजा

मनोहरपंत वकिलांच्या मुद्रेवर आनंदाचें स्मित क्वचितच कोणी पाहिलें असेल. त्यांच्या चेहऱ्याची ठेवण ओबडधोबड होती. स्वभाव धीमा, अबोल आणि थोडासा एकांतप्रियच दिसे; त्यांची उंच, सडपातळ अंगकाठी आणि मुद्रेवरील प्रशांत विरक्तीचें तेज पाहून कोणालाही त्यांच्याबद्दल आदरच उत्पन्न होई. प्रसंगविशेषीं, चार मित्रमंडळी एकत्र जमली म्हणजे त्यांच्या डोळ्यांत मधुर प्रेमलतेचें तेज चमकूं लागे; त्यांच्या संभाषणांतून ही मधुरता क्वचितच व्यक्त होई, पण त्यांच्या सहवासांत चार घटका घालविणाऱ्याला आत्मीयतेच्या प्रेमळ लहरी त्यांच्या चेहेऱ्या-वर खेळतांना दिसत आणि त्यांच्या जीवनांत व्यापून राहिलेली त्यांची सहानुभूति व हृदयाचें मार्दव, शब्दांपेक्षाही अधिक स्पष्टपणें त्यांच्या अनेक कृत्यांतून उठून दिसे.

त्यांच्या स्वतःच्या बाबतींत तर ते तपस्व्याइतके खडतर असत. क्वचित्प्रसंगीं घेत असलेल्या चहाखेरीज त्यांना दुसरें व्यसन माहीत नव्हतें, आणि नाटकसिनेमांतील कलाकृति त्यांना प्रिय असल्या तरी गेल्या वीस वर्षांत ते नाटकाला गेले नव्हते. स्वतःच्या बाबतींत वज्रा-पेक्षा कठोर आणि इतरांच्या बाबतींत कुसुमापेक्षाही मृदु असें त्यांचें

धोरण होतें. अनेक तऱ्हेचीं दुष्कृत्यें करणारे विकारांनी इतके अंध होतात कसे, कड्यावरून उडी घेणाऱ्या धबधब्याप्रमाणे डोळे मिटून पापें करतात कशीं, याचें त्यांना केव्हा केव्हा आश्चर्य वाटे. पण कोणावरही कांही प्रसंग आल्यास मात्र, त्याला दुरुत्तरें करून दोष देत बसण्यापेक्षा त्याला हात देऊन मदत करण्याचाच ते प्रयत्न करीत. "मला आपला हा बंधुद्रोह पुरवतो," ते मिस्किलपणें म्हणत. " मी माझ्या दोस्तांना आपल्या लहरीप्रमाणे खुशाल खड्ड्यांत पडूं देतों." आणि होई पण असें की रोज रोज करीत असलेल्या दुष्कृत्यांच्या ओझ्याखाली दडपला जाऊन मनुष्य पापगर्तेंत खाली खाली जाऊं लागला असतांना अशा मनुष्याला मनोहरपंत सहसा सोडीत नसत; त्याच्या मनावर सुसंस्कार घडवून आणणारी मनोहरपंत ही एकटीच व्यक्ति केव्हा केव्हा अखेर उरे. आणि अशीं माणसें त्यांच्याकडे आलीं तर त्यांच्याशीं वागतांना मनोहरपंतांच्या मुद्रेवरील मधुर भावांत रतिमात्रही फरक पडलेला कोणाला दिसावयाचा नाही.

असें वागणें हें एक दिव्यच होतें. पण तें मनोहरपंतांच्या अंगवळणीं पडून गेलें होतें. त्याचें एक कारण असें होतें की, बोलबाला करून स्वतःची प्रतिष्ठा वाढविणें त्यांना बिलकूल आवडत नसे. सर्वच मनुष्यें त्यांना देवमाणसें वाटत, निदान सर्वांचे गुणच त्यांना दिसत आणि सर्वांशीं त्यांची मैत्री जमे. जीवनाच्या प्रवाहांत वाहतां वाहतां दैवयोगाने ज्यांच्याशीं सहवास घडेल त्यांनाच आपलें मित्र म्हणावें हें मनुष्याच्या नम्रतेचें एक लक्षण मानतात. मनोहरपंतांचीही रीत अशीच असे. त्यांची मित्रमंडळी त्यांच्या नात्यागोत्यांतीलच असत, किंवा एखाद्याशीं पुष्कळ दिवस परिचय झाला की त्याचें रूपांतर मैत्रींत होई. दीर्घकालीन परिचयावरच त्यांचें मित्रप्रेम पोसलेलें असे. त्यांत मित्रांच्या योग्यायोग्यतेचा प्रश्न नसे. त्यांचे दूरचे आप्त, आणि मुंबईंतील एक प्रसिद्ध व्यक्ति, श्यामकांत हेही त्यांच्या अशाच मित्रांपैकी एक होते. त्या दोघांचें सख्य जमण्याइतका समानधर्म तरी त्यांच्यांत कोणता आहे, याचें पुष्कळांना कोडें पडे. हे एकत्र जमले म्हणजे बोलतात तरी कोणत्या विषयावर हेंही पुष्कळांना समजत नसे. दर रविवारीं ही जोडी नियमाने फिरावयास निघावयाची ! पण फिरतांना एखाद्या विषयावर उत्साहाने चर्चा करतांना ते कधी कोणाला

दिसत नसत. जवळ जवळ मौनव्रतच धारण करीत आणि त्यांना मौन-व्रतांतून सोडविणारा तिसरा एखादा मित्र भेटला तर दोघांनाही समाधान झाल्याचें उघड दिसे. पण तरीही रविवारचें फिरणें त्यांचें चुकलें नाही. रविवारच्या पर्वणीची ते मोठ्या उत्कंठेने वाट पाहत, त्या दिवशीं दुसरा कोणताही कार्यक्रम ते ठरवीत नसत; व धंद्याचें एखादें महत्त्वाचें काम असलें तरीही तें बाजूला सारून आपल्या मूक अटनाचा आनंद लुटण्याची एकही संधि ते सोडीत नसत.

अशाच एका रविवारीं गिरगावाकडील एका आडवळणांत असलेल्या गल्लींतून ते जात होते. गल्ली लहानशीच होती आणि मुंबईच्या मानाने शांतही होती, पण रविवारखेरीज इतर दिवशीं बरीच गजबजलेली असे. तेथे राहणारे लोक खाऊन पिऊन सुखी दिसत, सुखाचीं साधनें संपादन करून अधिक सुखी होण्याची त्यांची चढाओढ लागलेली दिसे; आणि या धडपडीं-तून उत्पन्न होणारा पैसा व मिळणारा वेळ ते नटण्यामुरडण्यांत उधळून टाकीत. तेथील दुकानें सुद्धा आपल्या नयनमनोहर मालाचें प्रदर्शन करीत एखाद्या नवयुवतीप्रमाणे स्मित मुखाने गिऱ्हाइकाचें स्वागत करण्यास सज्ज होऊन बसल्यासारखीं दिसत. रविवारच्या सुटीच्या दिवशीं तेथील भपका बराच कमी होई व रहदारीही बेताचीच असे; पण तरीही शेजारच्या गल्ल्यांतील कंगाल वातावरणांत ही गल्ली रानांत पेटविलेल्या शेकोटीप्रमाणे शोभत असे. झगमगणारीं दुकानें, चकाकणारीं तावदानें, आणि तेथे विलसणारें ख्यालीखुशालीचें वातावरण, कोणाचेंही चित्त सहज वेधून घेई.

कोपऱ्यावरून वळून गल्लींत शिरलें की डाव्या हातालाच पहिलीं दोन दुकानें सोडून एक छोटेसें अंगण लागे; आणि त्याच्याच पुढे एका दुमजली घराचा हिडिस दिसणारा लहानसा कमानदार दरवाजा दिसे. तळमजल्याला खिडकीच नव्हती आणि वरच्या मजल्याची भिंत सुद्धा अपशकुनी आणि रंगरूपहीन दिसत होती. घरच्या डागडुजीकडे वर्षानु-वर्षें कोणाचें लक्ष गेलेलें दिसत नव्हतें. दरवाजावर रंगीबेरंगी डाग आणि रेघोटया उठल्यामुळे देवीच्या व्रणांनी विद्रूप झालेल्या चेहऱ्यासारखा तो

दिसे. येणारे जाणारे भटके लोक त्यावर काड्या पेटवून आपली विडीची तल्लफ भागवीत, दरवाजाच्या पायऱ्यांवर मुलें आपलें काड्यामोड्यांचें दुकान थाटीत, आणि शाळेंतील उनाड पोरें आपल्या हातांतील चाकूची धारही येतां जातां त्यावर चालवून पाहात. निदान गेल्या पाचपंचवीस वर्षांत तरी या भटक्या लोकांचे चाळे बंद करण्याचा आणि दरवाजाची डागडुजी करण्याचा कोणी प्रयत्न केलेला दिसत नव्हता.

श्यामकांत आणि मनोहरपंत त्या गल्लीच्या समोरच्या बाजूने चालले होते. चालतां चालतां या दरवाजाच्या समोर येतांच हातांतील काठी दरवाजाकडे रोखीत श्यामकांत म्हणाले,

" तें दार कधी लक्षांत आलें आहे का तुमच्या?"

" होय, का बरें ?"

" तें पाहिलें की मला एका चमत्कारिक गोष्टीची आठवण होते."

" अस्सें ! कोणती ती ?" मनोहरपंतांचा आवाज थोडा बदलला होता.

" त्याचें असें झालें. एक दिवस पहाटे असाच कोठूनसा त्या तिकडच्या रस्त्याने मी येत होतों. पहाटेचे पांच वाजले असतील आणि थंडी म्हणजे मी म्हणत होती अगदी. आणि मी येत होतों त्या रस्त्यानें तर दिव्यांशिवाय अक्षरशः कोणी दिसत नव्हतें. गल्ल्यांमागून गल्ल्या ओलांडीत मी चाललों होतों, रस्त्यावर चिटपांखरूंही नव्हतें, फक्त हे कंदिलाचे खांब एखाद्या मिरवणुकीकरितां सजल्यासारखे दिसत होते. स्मशानासारखी ही शांतता मला इतकी भयाण वाटली की गस्त घालणारा शिपाई सुद्धा या बाजूला अजून का भेटत नाही असें मला होऊन गेलें. इतक्यांत मला दोन व्यक्ति दिसल्या. एक अगदी बुटका मनुष्य अंगाला हिसके देत देत झपाट्यानें चालला होता; आणि आडव्या जाणाऱ्या गल्लीने एक आठदहा वर्षांची कोवळी पोर दुड दुड धावत येत होती. आता असें पहा, रस्त्याच्या आणि गल्लीच्या कोपऱ्यावर अगदी स्वाभाविकच या दोघांची टक्कर झाली आणि सगळ्यांत चीड आणणारा

प्रकार झाला तो असा, की तो पुरुष अगदी शांतपणें त्या पोरीच्या अंगा-वरून तिला तुडवीत गेला आणि त्या बिचारीला रडत विव्हळत तशीच तेथे टाकून दिलीन्. हें ऐकतांना तुम्हाला कांही इतकें वाटणार नाही. पण माझ्या डोळ्यांनी मी पाहिलें तेव्हा शहारे आले माझ्या अंगावर. इतकीसुद्धा माणुसकी त्यच्या अंगीं नव्हती. जसा कांही एखादा वाफेचा रूळच. मी एकदम आरोळी ठोकली आणि त्याच्यामागे धावून त्याची मानगूट पकडली आणि त्याला खेचून ती मुलगी पडली होती तेथे घेऊन आलों. तेथेही मुलीचा आरडाओरडा ऐकून लोक गोळा झाले होतेच, पण आमचा हा दोस्त हातपाय हालविल्याशिवाय अगदी शांत उभा होता. माझ्याकडे त्याने अशा नजरेने पाहिलेंन् की मी तर अगदी थिजूनच गेलों. तेथे जमलेल्या घोळक्यांत त्या मुलीचे नातलगच होते आणि थोड्याच वेळांत एक वैद्यराजही येऊन थडकले. ती मुलगी त्या वैद्याला घरीं बोलावण्या-करितांच जात होती असें दिसलें. आमच्या धन्वंतरी महाराजांनी आपला ठराविक अभिप्राय दिला, तिला कांही फारशी दुखापत झालेली नाही थोडीशी घाबरली आहे इतकेंच, वगैरे. वास्तविक हें प्रकरण येथेच संपा-वयाचें, पण खरा चमत्कार तर पुढेच झाला. मला तर आमच्या त्या गृहस्थाचा अगदी पाहिल्याबरोबरच तिटकारा आला होता. त्या मुलीच्या नातलगांनाही त्याचा तिटकारा वाटावा यांतही कांही विशेष नाही. पण मला आश्चर्य वाटलें तें त्या वैद्याचें. तसें पाहिलें तर तो होता अगदी साधासुधा वैद्य, ठराविक वयाचा आणि ठरलेल्या स्वरूपाचा, कोकणी पद्धतीने नाकांतून हेल काढून बोलणारा आणि भावनांच्या बाबतींत तर दगडाशींच तुलना करावी त्याची. पण तो सुद्धा आमच्यासारखाच चिडला होता. ज्या ज्या वेळीं ह्या हाडकाप्या वैदूची नजर त्याच्याकडे वळे त्या त्या वेळीं त्याला ठार करण्याच्या इच्छेने तो अगदी बेफाम होऊन जाई. त्याच्या मनांत काय चाललें आहे त्याची कल्पना मला आली आणि माझ्या मनांत काय होतें हेंही त्याला समजलें असावें. त्याचा खून पाडणें शक्य थोडेंच होतें; तेव्हा दुसरें जें करणें शक्य होतें तें आम्ही केलें. आम्ही त्या दुष्टाला स्पष्ट बजावलें, की आम्ही तुझी साऱ्या मुंबईभर नालस्ती करूं, सोडणार नाही. त्याचा परिणाम इतका होईल की एक सुद्धा मित्र

तुला जवळ करणार नाही. आम्ही त्याच्याशीं तावातावानें बोलत होतों, आणि तेथे जमलेल्या बायका तर इतक्या चिडल्या होत्या की गांधील-माशांसारख्या त्याच्यावर तुटून पडत होत्या. त्यांना वारतां वारतांच आम्हाला पुरेवाट झाली. लोक इतके चिडलेले मी कधी पाहिले नव्हते. परंतु त्यांच्यामध्ये तो गृहस्थ आपला शुंभ—मनांतून भेदरला होता, हें माझ्या लक्षांत आलें होतें—पण वरून अगदी एखाद्या बेरडासारखा शांत व बेफिकीर होता. तो म्हणाला, "हें पहा तुम्हाला हें अपघाताचें प्रकरण वाढवावयाचें असलें तर अर्थातच माझा इलाज नाही पण कोणाचीही काय, शोभा करून घ्यावयाची इच्छा नसते. तुम्हाला किती पाहिजेत बोला." नाही होय करतां करतां आम्ही एकहजार रुपये कबूल करवून घेतले. तो निसटून जायला पाहत होताच. पण आमच्यांतील कांही लोक फारच खवळलेले पाहिले त्याने, आणि झाला एकदाचा कबूल. आता आला त्याच्याकडून पैसे वसूल करण्याचा प्रश्न. अन् तो आम्हाला कोठे घेऊन गेला असेल असें तुम्हाला वाटतें ? अगदी नेमका ह्या दारापाशीं ! खिशांतून झटकन किल्ली काढून कुलूप उघडलें आणि आंत जाऊन पांच पन्नास रुपये रोख आणि बाकीच्या रकमेचा सेंट्रल बँकेवरचा चेक घेऊन आला. चेकवर सही कोणाची होती, हा तर या हकीकतींतील महत्त्वाचा मुद्दा आहे. परंतु तें नांव मी तुम्हांला सांगूं शकत नाही. पण इतकें सांगतों की तें नांव एका फार प्रसिद्ध व्यक्तीचें आहे. चेकवरचा आकडा चांगला गरगरीत होता, पण खालची सही जर खरी असली तर त्या व्यक्तीची तितकी पत होती यांत शंका नाही. मी आमच्या दोस्ताला सरळ सांगितलें, की हा सगळाच प्रकार मला मोठा विलक्षण दिसतो. एखादा मनुष्य आपला पहाटे पांच वाजतां एखाद्या तळघरांत शिरतो काय आणि दुसऱ्याच्या सहीचा हजारभर रुपयांचा चेक आम्हांला आणून देतो काय ? ही कांही सत्य सृष्टींतील गोष्ट दिसत नाही. पण तो अगदी शांत होता आणि वर हंसत होता. तो म्हणाला, "हें पहा, माझी तुम्हाला खात्री वाटत नाही तर असें करा. मी तुमच्याबरोबर बँकेंत येतो आणि चेक वटवून देतों, मग तर झालें !" मग आम्ही सगळे अर्थात तेथून निघालों. त्या मुलीचा बाप, मी,

तो आमचा दोस्त आणि ते वैद्यराज; आणि माझ्या घरीं उजाडेपर्यंत राहिलों. उजाडतांच चहापाणी करून बँक गाठली. मी स्वतः तो चेक बँकेंत दिला आणि कॅशरला बजावलें की चेक बनावट आहे अशी माझी खात्री आहे. पण काय ! बिलकुल नाही. तो चेक खरा होता.

"काय म्हणतोस?" मनोहरपंत उद्‌गारले.

"माझ्यासारखेंच तुम्हाला वाटेल हें मला माहीत आहे." श्यामकांत पुढे सांगूं लागले. "मोठें खराब प्रकरण आहे हें. कारण आमचा हा दोस्त म्हणजे असा हलकट मनुष्य आहे, की कोणी त्याच्या वाऱ्याला सुद्धा उभें राहणार नाही. आणि चेकवर ज्याची सही होती तो तर अगदी धुतल्या तांदुळासारखा सभ्य आणि सुप्रसिद्ध मनुष्य. शिवाय आजकाल त्याची चलतीही किती तरी आहे. मला वाटलें तेथे तोंड दाबण्याचा प्रकार असावा. तारुण्याच्या भरांत एखादी चूक झाली, की साळसूद माणसाला सुद्धा नाक मुठींत धरून ती निस्तरावी लागते. तेव्हापासून मी या घराला तंटया भिल्लाची खिड असें म्हणतों. पण त्याने सुद्धा कांही सर्व गोष्टींचा उलगडा होत नाहीच." अखेरचें वाक्य आपल्याशींच म्हणून श्यामकांत विचारांत गढून गेले.

इतक्यांत मनोहरपंतांच्या अचानक प्रश्नाने त्यांची ही विचार-तंद्री भंगली. "पण ज्यानं त्या चेकवर सही केली तो तेथेच रहात नसेल कशावरून ? "

"अगदी योग्य स्थानच की नाही त्याच्या करितां हें." श्यामकांताने उत्तर दिलें. "पण शंका कशाला ? मला त्याचा पत्ता मिळाला. तो दुसरीकडे कोणत्याशा स्क्वेअरमध्ये राहतो".

"आणि तूं कधी ह्या घराबद्दल अधिक चौकशी केली नाहीस?"

"छे बुवा, आपण नाही त्या भानगडींत कधी पडत. नसते प्रश्न विचारण्याचा मला फार तिटकारा वाटतो. चित्रगुप्ताच्या उलट तपासणी-चेंच स्वरूप येतें त्याला. एखादा प्रश्न विचारला म्हणजे त्याचा धागा कोठपर्यंत जातो कोण जाणे. आपण टेकडीच्या शिखरावर शांतपणें बसतों आणि सहज लीलेने एखादा धोंडा खाली ढकलून देतों. त्याच्या

धक्क्याने दुसरेही दगड खाली उड्या घेऊं लागतात आणि अखेर आपल्या ध्यानींमनीं सुद्धा नसेल अशा एखाद्या वाटेच्या वाटसरूचा कपाळमोक्ष होऊन जातो आणि त्याच्या साऱ्या कुटुंबाची दैना उडून जाते. छे, छे, रिकामे प्रश्न विचारावयाचे नाहीत हा मी आपला नियमच करून टाकला आहे. एखाद्या प्रकरणांत जितक्या भानगडी जास्त तितकी चौकशी कमी करावयाची हें आपलें माझें धोरण."

"बाकी हा तुझा नियम फार चांगला आहे," वकील साहेबांनी उत्तर दिलें.

"पण मी स्वत: ह्या घराकडे बारकाईने लक्ष ठेवलें आहे." श्यामकांत आपली गोष्ट पुढे सांगूं लागले. "घर कसलें तें ! हें एकच दार आहे त्याला आणि त्यांतूनही आमच्या या भुताशिवाय कोणीही जातां-येतांना दिसत नाही; आणि तोही फारच क्वचित्. तळमजल्याला तर खिडकीच नाही, दुसऱ्या मजल्यावर तीन खिडक्या दिसतात, आणि त्याही नेहमीं बंदच असतात. पण त्या स्वच्छ दिसतात आणि त्यांतून केव्हा केव्हा उजेडही दिसतो, तेव्हा आंत कोणी तरी राहत असलें पाहिजे. पण त्याचा काय नेमसांगावा ! घराला घर इतकें लागून आहे येथ, की कोणतें घर कोठे संपतें हें सांगणें फार कठीण आहे.

कांही वेळ दोघेही स्तब्ध राहिले. इतक्यांत मनोहरपंत एकदम म्हणाले, "खरेंच श्याम, तुझा तो नियम फारच चांगला आहे."

"होय, मलाही तसेंच वाटतें."

"तरीही" मनोहरपंत पुढे म्हणाले, "मला एक प्रश्न विचारावासा वाटतो, त्या पोरीला तुडविणारा तो मनुष्य—त्याचें नांव काय ? "

"त्याचें नांव तुम्हाला सांगावयाला मला कांहीच हरकत दिसत नाही. त्याचें नांव कृष्णराव गुप्ते."

"अस्सें, कसा काय दिसत होता हा मनुष्य ?"

"त्याचें वर्णन करणें कांही सोपें नाही. त्याच्या मुद्रेंत कांही तरी दोष आहे. पाहतांच चीड येते. अगदी तिटकारा येतो. एखाद्याला नुसतें

पाहूनच इतका तिरस्कार उत्पन्न झाल्याचें उदाहरण माझ्या पाहण्यांत नाही. आणि तरीही त्याचें कारण मला सांगतां येत नाही. त्याच्यांत कांही तरी विद्रूपता आहे. अमुक भागांत दोष आहे असें निश्चित दाखवितां येत नाही, तरीही त्याला पाहतांच अगदी किळस येते. खरेंच तो एक चमत्कारिक प्राणी आहे. असें असूनही इतरांच्यापेक्षा त्याच्यांत निराळे-पणा काय आहे हें दाखवितां येत नाही. छे! नाहीच. वर्णन करून सांगणें शक्यच नाही. मला आठवत नाही म्हणून नाही मी असें म्हणत; अगदी या घटकेला सुद्धा डोळ्यासमोर रेखल्यासारखी त्याची मूर्ति दिसते."

मनोहरपंत पुनः अगदी मूक वृत्तीने चालूं लागले. त्यांचें डोकें विचारांच्या भाराखाली दडपून गेलेले दिसत होतें. अखेर त्यांनी प्रश्न केला, " तुझी खात्री आहे त्यानें किल्ली लावून कुलूप काढलें ? "

"आता काय सांगूं ?...." श्यामकांत त्यांच्या ह्या प्रश्नाने थक्कच होऊन गेले.

" होय. माझा प्रश्न चमत्कारिक वाटेल हें मला माहीत आहे. खरी गोष्ट अशी आहे की त्या दुसऱ्या गृहस्थाचें नांव मी विचारीत नाही याचें कारण, तें मला माहीत आहे. हें पहा श्याम, तुझी गोळी बरोबर लागू पडली आहे. आठवण करून पहा आणि एखादा महत्त्वाचा तपशील सांगावयाचा राहिला असेल तर सांगून टाक."

"तुमची सूचना योग्य आहे." श्यामकांत उदासपणें म्हणाले. "पण मी अगदी कोर्टांत म्हणतात तसें अक्षरशः सत्य सांगितलें आहे. त्याच्या जवळ किल्ली होती. आणि विशेष हें ती त्याच्या जवळ अजूनही आहे. गेल्या आठवड्यांतच मी त्याला कुलूप काढतांना पाहिला आहे."

मनोहरपंतांनी एक दीर्घ निश्वास सोडला पण एक शब्दही उच्चारला नाही. श्यामकांत पुढे सांगूं लागले, "न बोलण्याचा हा आणखी एक नवीन धडा आहे. माझी जीभ किती तरी लांब आहे याचीच मला लाज वाटते. आजपासून या विषयाच्या वाटेस जाणार नाही. बस ठरला माझा निश्चय."

"आणि मी सुद्धा—" मनोहरपंत म्हणाले, "मी सुद्धा तो निश्चय मनापासून पाळीन."



## प्रकरण दुसरें

# कृष्णरावाचा शोध

त्या दिवशीं संध्याकाळीं घरीं आल्यावरही मनोहरपंतांच्या मनावर उद्विग्नतेची छाया कायम होती. जेवण सुद्धा त्यांना गोड लागलें नाही. रात्रीं जेवण झाल्यावर आपल्या खोलींत जाऊन वेदांतावरचा एखादा लठ्ठसा ग्रंथ काढून वाचीत बसावयाचें आणि दहाचा ठोका पडतांच भक्ति-भावाने थोडीशी प्रार्थना करून शांतपणे जाऊन निजावयाचें असा त्यांचा नित्यक्रम असे. पण आज रात्रीं जेवण संपतांच दिवा घेऊन ते तडक आपल्या कचेरींत गेले. तेथे जाऊन त्यांनी आपली तिजोरी उघडली व त्याच्या अगदी तळाशीं असलेल्या चोरकप्प्यांतून एक लठ्ठसा लिफाफा बाहेर काढला. त्यावर स्पष्ट लिहिलेलीं 'डॉ. शरच्चंद्र यांचें मृत्युपत्र' हीं अक्षरें वाचून पाहिलीं व आंतील कागद बाहेर काढून खिन्न व उदास मुद्रेने तो ते वाचूं लागले. तें मृत्युपत्र डॉ. शरच्चंद्र यांनी स्वतःच लिहून काढलें होतें. तें तयार झाल्यावर वकील या नात्याने मनोहरपंतांनी आपल्या ताब्यांत घेतलें होतें हें खरें, तरी पण तें तयार करण्यांत काडी इतकीही मदत आपण करणार नाही असें त्यांनी स्वच्छ सांगितलें होतें. त्या मृत्युपत्राप्रमाणे डॉ. शरच्चंद्र, एम्. डी , डी. सी. एल्., एल्एल्. डी., एफ्. आर. एस्., इत्यादि इत्यादि, यांनी आपल्या मृत्यूनंतर आपली सर्व मालमत्ता 'आपला स्नेही व उपकारकर्ता कृष्णराव गुप्ते' यास बक्षीस दिली होती. इतकेंच नव्हे तर त्यांत असेंही लिहिलें होतें की, "मी (डॉ. शरच्चंद्र) कधी काळीं नाहीसा झालों व त्याचें कारणही जरी कोणाला समजलें नाही आणि तीन महिनेपर्यंत माझा तपास लागला नाही तर सदर कृष्णराव गुप्ते यास माझी सर्व मिळकत बिनतक्रार बिनहरकत मिळावी." डॉक्टर साहेबांच्या कुटुंबांतील मंडळींना कांही लहान लहान रकमा देण्याचा त्या मृत्युपत्रांत उल्लेख होता. त्या थोड्याशा रकमा वगळल्या

तर कर्ज किंवा देणगीच्या स्वरूपाचा दुसरा कोणताही बोजा त्या इस्टेटी-वर ठेवण्यांत आला नव्हता. हें विचित्र मृत्युपत्र मनोहरपंतांच्या डोळ्यांत शल्यासारखें सलत होतें. वकील या नात्याने असें मृत्युपत्र त्यांना गैरशिस्त वाटत होतेंच; पण त्यांच्या अनुभवी व व्यवहारकुशल मनाला असला लहरीपणा दाखविणें म्हणजे सभ्यपणा सोडल्यासारखेंच वाटे. हा कृष्णराव कोण हें त्यांना माहीत नव्हतें त्यामुळें तर त्यांना त्या मृत्युपत्राची अधि-कच चीड येई. पण आज अचानक त्यांना कृष्णरावाचा सुगावा लागला. आजपर्यंत कृष्णरावाच्या नांवापलीकडे त्यांना कांहीही माहीत नव्हतें आणि याचाही त्यांना कांही कमी विषाद वाटत नव्हता. पण आज त्या नांवाच्या पाठीमागे अत्यंत हिडिस असे दुर्गुण उमटूं लागले आणि त्यांचा विषाद वाढूं लागला. आजपर्यंत त्यांच्या दृष्टीने कृष्णराव ही व्यक्ति धुक्याने झाकून गेल्यासारखी अस्थिर व अस्पष्ट होती; पण आज त्यांच्या संशयाचें धुकें वितळूं लागून त्यांतून त्या मनुष्यरूपी राक्षसाचें स्वरूप स्पष्ट होऊं लागलें होतें.

मृत्युपत्राचे ते कागद तिजोरींत परत ठेवीत ते आपल्याशींच म्हणाले, "मी समजत होतों की हा एक खुळेपणा आहे झालें. पण असलें मृत्युपत्र हें एक लांछनच आहे, असें आता मला वाटूं लागलें आहे."

लागलीच ते तेथून उठले, दिवा मालवून त्यांनी कपडे चढविले आणि तडक चौपाटीचा रस्ता धरला. चौपाटीवरच त्यांचे मित्र डॉ. कमलाकांत यांचा बंगला होता आणि तेथे ते आपली प्रॅक्टिस जोराने चालवीत होते. 'याची माहिती कोणाला असलीच तर ती कमला-कांतालाच असेल" त्यांच्या मनांत एक विचार चमकून गेला.

तेथे पोचतांच भय्याने त्यांचें नम्रपणें स्वागत केलें व ताबडतोब डॉक्टरसाहेबांच्या दिवाणखान्यांत तो त्यांना घेऊन गेला. डॉ. कमलाकांत शरीराने जसे सुदृढ व आरोग्यपूर्ण होते तसेच मनानेही आनंदी व उत्साही होते. वयाच्या मानाने त्यांचे केस जरा लवकर पांढरे झाले होते पण त्यांचा उत्साह तरुणांनाही लाजविणारा होता. मनोहरपंतांना पाहतांच खुर्चीवरून ताबडतोब उठून ते पुढे आले आणि त्यांचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन मोकळ्या मनाने त्यांनी त्यांचें स्वागत केलें. त्यांचा

ह्या स्वागताचा आविर्भाव तिऱ्हाइताला नाटकी थाटाचा वाटण्याचा संभव होता. पण वास्तविक त्यांच्या प्रेमळ मोकळया वृत्तीचाच तो निदर्शक होता. कारण त्या दोघांची मैत्री कांही आजकालची नव्हती. हायस्कूल मध्येच त्यांची गट्टी जमली होती आणि कॉलेजांतही ती कायम राहिली होती. दोघेही स्वाभिमानी होते तसाच परस्परांविषयीं त्यांना आदरही पुष्कळ होता, आणि अशा मनुष्यांत सहसा न आढळून येणारी गोष्ट म्हणजे त्या दोघांनाही परस्परांच्या सहवासांत निरतिशय आनंद वाटे.

थोडया इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर मनोहरपंतांनी त्यांच्या मनांत घोळत असलेला अप्रिय विषय काढला.

"मला वाटतें कमलाकांत" ते म्हणाले, "शरश्चंद्राचे अगदी बाळपणीचे मित्र म्हणजे आपण दोघेच, नाही का ?"

"आणि आपण अजूनही तसे बाळपणांतच असतों तर किती छान झालें असतें !" कमलाकांतांनी हसत हसत उत्तर दिलें. "पण आज काय त्याचें. आपण जुने दोस्त आहोंत खरे, पण अलीकडे शरद् मला फारसा भेटत नाही."

"खरें! मला वाटलें तुम्ही व्यवसायबंधु पडलांत, तेव्हा तुमच्या रोज गाठी पडत असतील."

"व्यवसायबंधु तर खरेंच. पण आज सुमारें दहा वर्षें शरदच्या कल्पनांची भरारी माझ्या डोक्यावरून जाऊं लागली, मला वाटतें त्याचें डोकें बिघडूं लागलें. अर्थात् कितीही झालें तरी आपला जुना दोस्त, अजूनही माझें मन त्याच्याकडे ओढतें. पण अलीकडे त्याने कोठें दडी मारली आहे कोण जाणे. गाठच पडत नाही. बाकी त्याच्या अशा निराधार अशास्त्रीय वल्गनांनी रामलक्ष्मणाची जोडीसुद्धा फुटली असती." बोलतां बोलतां डॉक्टर साहेबांचें तोंड आवेशाने लाल झाल्यासारखें दिसलें.

कमलाकांताचा हा रागाचा आविर्भाव पाहून मनोहरपंतांना थोडेसें समाधानच झालें. एखाद्या शास्त्रीय प्रश्नावर दोघांचा खटका उडालेला दिसतो, ते आपल्याशींच म्हणाले. शास्त्रीय संशोधनाच्या भानगडींत पडण्याचा त्यांचा स्वभावच नव्हता. म्हणून ते शांतपणाने म्हणाले, "इतकेंच ! यापेक्षा तर कांही जास्त नाही ना !"

कमलाकांताचें मन पूर्ववत् शांत होईपर्यंत दोनचार क्षण त्यांनी जाऊं दिले आणि मग जो प्रश्न मुद्दाम विचारण्याकरितां ते आज आले होते, तो त्यांनी काढला.

"पण काय रे त्याचा एक पिस्त्या—कोणी एक गुप्ते—कृष्णराव गुप्ते तुला माहीत आहे काय ?"

"गुप्ते ? छे बुवा, कधी नांव सुद्धा नाही ऐकलें त्याचें, माझ्या हयातींत तरी नाही."

मनोहरपंतांनी जी माहिती संपादन केली ती इतकीच. ही माहिती संपादन करून ते निघाले व घरीं जाऊन आपल्या बिछान्यावर त्यांनीं आंग टाकलें; साऱ्या रात्रींत त्यांचा डोळ्याला डोळा लागला नाही. पहाटेचा प्रकाश पडूं लागेपर्यंत ते आपल्या बिछान्यांत तळमळतच पडून होते. त्यांचें मन अस्वस्थ होतें, नाना प्रकारच्या संशयांनी घेरलें गेलें होतें, आणि संशयनिवृत्तीकरितां अंधारांतच धडपड करीत होतें. अशा स्थितींत रात्र-भर त्यांना विश्रांति कोठली मिळणार ?

त्यांच्या बंगल्याजवळच्या टॉवरमधील घड्याळांत पांचाचे ठोके पडले आणि तरीही त्यांच्या मनांतील प्रश्नमालिका सुटली नव्हती. इतका वेळ केवळ बुद्धीने, तर्काने हा प्रश्न उलगडण्याचा ते प्रयत्न करीत होते. पण आता त्यांनी कल्पनेचे घोडे भरधाव सोडले, किंबहुना ते उधळले; पहाटेच्या शांत समयीं आपल्या पलंगावर निजल्यानिजल्या श्यामकांताने वर्णन केलेला प्रसंग एखाद्या चित्रपटासारखा त्यांच्या डोळ्या-समोर प्रत्यक्ष घडत असलेला दिसूं लागला. रात्रीचे ते ओसाड रस्ते आणि ती दिव्याची लांबच लांब रांग त्यांना प्रत्यक्ष दिसूं लागली. झपाट्याने चालणारी एक मनुष्याकृति एकीकडून व वैद्याच्या घरांतून बाहेर पडून पळत जाणारी मुलगी दुसरीकडून—त्या दोघांची होणारी भेट—आणि तो मनुष्यदेहधारी वाफेचा रूळ त्या कोवळ्या अर्भकाला तुडवून जात अस-लेला प्रसंग—त्या पोरीच्या हृदयद्रावक किंकाळ्या—आणि त्या व्यक्तीची बेपर्वाई—हें सर्व दृश्य त्यांच्या डोळ्यापुढून जाऊं लागलें. मध्येच त्यांच्या डोळ्यांपुढे आपल्या मित्राचा—डॉ. शरच्चंद्रांचा—सुंदर सुशोभित बंगला दिसूं लागे. आपला मित्र शांत झोपला आहे, सुखमयस्वप्नें अनुभवीत आहे,

इतक्यांत खोलीचें दार धाडकन् उघडतें, पलंगावरची मच्छरदाणी ताडकन् बाजूला सारली जाते, त्याची झोपमोड होते आणि त्याच्या पलंगाजवळ एक आकृति उभी राहते. जणू काय या रात्रीच्या शांत वेळीं सुद्धा शरच्चंद्राला उठविण्याचें व त्याच्याकडून वाटेल तें काम करवून घेण्याचें सामर्थ्य त्या व्यक्तीच्या अंगीं आहे. ह्या दोनही चित्रांत दिसणाऱ्या आकृतीने त्यांना सारी रात्र सतावून सोडलें होतें. त्यांना जराशी गुंगी आली की लागलीच त्यांच्या डोळ्यांपुढे ते शांत व निर्जन रस्ते आणि त्यांतून चोर पावलांनी फिरणारी ती आकृति उभी राही. विजेच्या दिव्यांच्या रांगांमधून ती आकृति खूप वेगाने पळूं लागे, रस्त्याच्या वळणावळणावर एकेक मूल चेंगरून, त्याला तसेंच रडत विव्हळत टाकून पळून जात असल्याचा त्यांना भास होई. आणि इतकें असूनही त्या आकृतीची त्यांना ओळख पटत नव्हती. स्वप्नांत सुद्धा तिचा चेहरा त्यांना स्पष्ट दिसत नसे, दिसला तरी अंधुक दिसे आणि त्याच्याकडे निरखून पाहतांच तो दिसेनासा होई. अर्थात कृष्णराव गुप्ते ही कोण व्यक्ति आहे, तिचा चेहरा आहे तरी कसा, हें पाहण्याची मनोहरपंतांना उत्कट इच्छा वाटूं लागली आणि त्यांची ही जिज्ञासा क्षणाक्षणाने अधिकाधिक तीव्र होऊं लागली. गुप्त गोष्टींचीं रहस्यें काळजीपूर्वक निरखून पाहिलीं की कायमचीं उलगडतात; त्याचप्रमाणे ह्या कृष्णरावाचा तोंडवळा एकदा जरी पाहावयास मिळाला तरी ह्या प्रकरणाचें रहस्य उलगडेल, त्यांतील न समजणारे सर्व दुवे स्पष्ट दिसूं लागतील, असा त्यांचा दृढ ग्रह होऊं लागला. आपला मित्र त्या कृष्णरावावर इतका का भाळला, त्याच्या इतका मुठींत कसा गेला, याचेंही कारण आपल्याला समजेल, मृत्युपत्रांत तीं चमत्कारिक कलमें का घातलीं हेंही उघड होईल, असें त्यांना वाटूं लागलें. निदान कृष्णराव ही व्यक्ति एकदा तरी पाहण्यासारखी आहे खास; ज्याच्या पोटांत दयेचा लवलेश नाही, ज्याचा चेहरा पाहतांच श्यामकांतासारख्या भावनाशून्य मनुष्याच्याही मनांत त्याचेविषयीं कायमचा तिरस्कार उत्पन्न होतो तो मनुष्य आहे तरी कसा हें एकदा तरी पाहून घ्यावेंच.

त्या दिवसापासून त्या लहानशा गल्लींतील दारावर पाळत राखण्याचें काम मनोहरपंतांनी सुरू केलें. सकाळीं कोर्टांत जाण्यापूर्वी, दुपारीं

कामाच्या गर्दीत थोडीशीही सवड काढणें कठीण असतांही ते तेथे हजर राहूं लागले; चंद्राच्या अंधुक चांदण्यांत किंवा विजेच्या दिव्यांच्या प्रकाशांत, रात्रीच्या एकांत वेळीं किंवा दिवसाच्या धावपळीच्या गडबडींत, आपल्या ठराविक ठिकाणीं ते हजर असावयाचेच.

"तो जर गुप्ते असला तर मी चित्रगुप्त होईन" ते आपल्याशींच म्हणत.

अखेर त्यांची ही चिकाटी फळाला आली. रात्रीची वेळ होती. आकाश स्वच्छ, निरभ्र होतें. विजेच्या दिव्यांच्या स्वच्छ, शांत प्रकाशांत मुंबईचे डांबरी गुळगळीत रस्ते फरशीसारखे चकाकत होते व त्यावर खांबांच्या सावल्यांचे समांतर पट्टे उठून सुंदर डिझाईन तयार झालें होतें. दहा वाजण्याची वेळ असेल. दुकानें बंद झालीं होतीं. गल्लींत तर चिट-पाखरूंही दिसत नव्हतें. लांबून येणाऱ्या अस्पष्ट व नीरस गुणगुणाटा-खेरीज सर्वत्र शांतता नांदत होती. त्या गंभीर शांततेंत थोडासाही आवाज अधिकच उठून दिसे. रस्त्याच्या दुतर्फा असलेल्या घरांतून येणारे सामान्य आवाजही अधिक स्पष्टपणें चित्त वेधून घेत; आणि येणाऱ्या जाणाऱ्यांच्या पावलांचे प्रतिध्वनि किती तरी लांबून त्यांच्या आगमनाची पूर्व सूचना देत. मनोहरपंत आपल्या पाहाऱ्यावर हजर होऊन थोडीशींच मिनिटें झालीं असतील तोंच निष्काळजीपणें आपल्याच धुंदींत चालत असलेल्या मनुष्याच्या पावलांचा आवाज त्यांच्या कानीं आला. रात्रीं अपरात्रीं तेथे येऊन पाळत ठेवण्याचा त्यांना आता बराच सराव झाला होता; लांबून येणाऱ्या मनुष्याच्या पावलांचा आवाज त्या निःस्तब्ध शांततेंत कसा भेसूर भासतो, मोठ्या शहरांतून रात्रींसुद्धा अखंड चालू असलेल्या सूक्ष्म निनादांतून तो कसा उठून दिसतो, हें आता त्यांच्या चांगलें परिचयाचें झालें होतें. पण त्यांचें लक्ष इतक्या तीव्रतेने व स्पष्टपणे कधीच वेधलें गेलें नव्हतें. आपल्या कष्टाचें फळ आज मिळणार अशी जणूं काय जबर-दस्त आशा, निश्चित खात्रीच, वाटूं लागली होती आणि त्या शुभ शकुनाच्या प्रेरणेनेच शेजारच्या घराच्या भिंतीशीं जरा सावलींत जाऊन ते उभे राहिले.

पावलांचा आवाज अधिकाधिक जवळ येऊं लागला आणि येणारी व्यक्ति हमरस्त्यावरून वळण घेऊन गल्लींत शिरल्याबरोबर तो आवाज

एकदम मोठा होऊन त्याचे प्रतिध्वनि कानांवर आदळूं लागले. आपली आज कोणत्या प्रकारच्या मनुष्याशीं गांठ आहे हें सावलींत उभ्या उभ्याच मनोहरपंतांनी पाहून घेतलें. येणारा गृहस्थ थोडा ठेंगणा होता, त्याचा पोषाक अगदी साधा होता; पण तितक्या लांबूनही त्याला पाहतांच पाहणाऱ्याच्या मनांत तिरस्काराने खळबळ उत्पन्न झाल्याशिवाय राहत नसे. तो सरळ नेमका त्या दारापाशीं आला व खिशांतून किल्ली काढून आपल्या स्वतःच्या घरीं येणाऱ्या घरमालकाप्रमाणे अगदी स्वाभाविक वृत्तीने कुलूप काढूं लागला.

तो पुढे जाऊं लागतांच मनोहरपंत जरा पुढे झाले आणि त्याच्या खांद्याला स्पर्श करून त्यांनी त्याला हटकला, "मला वाटतें कृष्णराव गुप्ते आपणच."

या अचानक आलेल्या प्रश्नामुळे कृष्णराव थोडा चपापला, मागे सरला. पण त्याची भीति क्षणभरच टिकली. मनोहरपंतांकडे समोर दृष्टि भिडवून पाहण्याची कांही त्याची छाती झाली नाही. तरी त्याने शांतपणे उत्तर दिलें. "होय मीच तो, काय काम आहे तुमचें."

"तुम्ही ह्या येथेच जात आहां हें दिसतेंच आहे. डॉ. शरश्चंद्रांची व माझी दोस्ती फार जुनी आहे. मी मनोहरपंत वकील, तुम्ही माझें नांव कदाचित ऐकलें असेल. सहज तुमची येथे गाठ पडली तेव्हा म्हटलें ओळख करून घेऊं."

"डॉ. शरश्चंद्र तुम्हाला भेटणार नाहीत, ते बाहेर गेले आहेत." कृष्णरावाने किल्ली चाळवीत उत्तर दिलें. पण इतक्यांत एकाएकीं वर न पाहतांच त्याने विचारलें, "पण तुम्ही मला ओळखलेंत कसें ?"

"तुम्हालाच मी विचारतों—तुम्ही माझ्याकरितां एक गोष्ट करतां का ?"

"आनंदाने. काय पाहिजे तुम्हाला?" कृष्णरावाने उत्तर दिलें.

"मला जरा तुमचा चेहरा नीट पाहूं द्याल का ?"

कृष्णराव जरा घोटाळ्यांत पडल्यासारखा दिसला. पण लागलीच कांही नवाच विचार त्याच्या डोक्यांत आला असावा. मनोहरपंतांकडे वळून पाहून 'घे तुला काय पहावयाचें आहे तें' अशा वृत्तीने समोर तोंड

करून तो उभा राहिला. कांही वेळ दोघेही एकमेकांकडे टक लावून पाहत होते. मनोहरपंत म्हणाले, "आता मी तुम्हाला सहज ओळखूं शकेन. अन् त्याचा उपयोगही होईल."

"होय", कृष्णराव म्हणाला, "आपली गाठ पडली हें एका अर्थी बरेंच झालें. आणि–हो बरी आठवण झाली–माझा पत्ताही तुमच्याजवळ असूं द्या." असें म्हणून परळवरील एका घराचा पत्ता त्याने सांगितला.

"अरे राम!" मनोहरपंतांच्या मनांत विचार आला, "त्याच्या डोक्यांत सुद्धा मृत्युपत्राचेच विचार चालले असतील का?" पण आपल्या भावना त्यांनी उघड व्यक्त केल्या नाहीत. नुसतें "हुं" म्हणून तो पत्ता त्यांनी आपल्या स्मरणवहींत टिपून घेतला.

"आणि आता एक सांगा" कृष्णराव म्हणाला, "मला तुम्ही ओळखलेंत कसें?"

"तुमच्या वर्णनावरून."

"कोणी दिलें तुम्हाला माझें वर्णन?"

"कां? आपल्या दोघांशींही दोस्ती असलेल्या कांही व्यक्ति आहेतच."

"दोघांशींही दोस्ती?" कृष्णराव म्हणाला. त्याचा आवाज थोडा बदलला होता. "कोण बरें तें?"

"उदाहरणार्थ, शरश्चंद्र."

"त्याने मुळीच तुम्हाला सांगितलें नाही." कृष्णराव जरा चिडून म्हणाला, "तूं खोटें बोलशील ही मला कल्पना नव्हती."

"हें पहा, ही कांही सभ्यपणाची भाषा नाही."

हें उत्तर ऐकतांच कृष्णरावाने विकट हास्य केलें. दुसऱ्याच क्षणीं झटक्याने त्याने कुलुप काढलें आणि चालता झाला.

कृष्णराव घरांत गेल्यानंतर मनोहरपंत वकील थोडा वेळ तेथेच उभे राहिले. त्यांचें चित्त अगदी अस्वस्थ होऊन गेलें होतें. हळूहळू ते

भानावर आले आणि शांतपणें एक एक पाऊल टाकीत चालण्यास सुरुवात केली. दर दोनचार पावलांनी ते थांबत, कपाळावर हात फिरवीत, कसल्या तरी गहन विचारांत गढून गेल्यासारखे दिसत. ज्या प्रश्नाचा ते इतक्या एकाग्रतेने विचार करीत होते, तो प्रश्न कांही सहज सुटणाऱ्यांपैकी नव्हता. कृष्णरावाचा चेहरा अगदी निस्तेज दिसे, शरीराने तो ठेंगणाच होता. स्पष्ट निर्देश करतां येण्यासारखा कोणताही दोष त्याच्यांत नसतांही तो अतिशय विद्रूप दिसे. त्याचें विकट हास्य चीड आणणारें होतें. मनोहरपंतांशी वागतांना त्याच्या वर्तनांत घाबरेपणा व धीटपणा यांचें भयंकर मिश्रण झाल्याचें दिसत होतें. तसेंच त्याचा आवाज घोगरा, अस्पष्ट होता व तो मधून मधून अडखळत असे. या सर्व गोष्टी त्याच्या विरुद्धच जात होत्या. पण या सर्व जमेस धरल्या तरीही, त्याला पाहतांच मनोहरपंतांना त्याच्याविषयीं जो एक प्रकारचा द्वेष, तिरस्कार व उद्वेग उत्पन्न झाला होता त्याची नीटशी संगति सांगतां येईना. "त्याच्यांत आणखी कांही तरी विशेष आहे" ते पुनः पुनः विचार करूं लागले. "काय आहे तें मला सांगतां येत नाही, पण कांही तरी विशेष आहे खास. देव भलें करो—त्याच्या अंगीं माणुसकीच दिसत नाही. एखादा नरमांसभक्षक राक्षसच जसा—किंवा असें तर नसेल—त्याच्या अंतःकरणांतील सगळ्या दुष्ट विचारांची दुर्गंधि त्याच्या भोवतालच्या वातावरणांत पसरली असावी आणि त्याच्या ह्या जड शरीरावर सुद्धा त्याचा परिणाम घडलेला असावा. अगदी असेंच. दुर्दैव त्या बिचाऱ्या शरच्चंद्राचें—केवळ निर्भेळ पापाचा पुनळा जर कधी पाहणें शक्य असेल तर—शरद तुझा हा नवा दोस्त पाहावा."

त्या गल्लींतून बाहेर पडून कोपऱ्यावर वळण घेतलें म्हणजे एक भव्य चौक लागतो. एके काळीं भव्य व सुंदर असणाऱ्या पण आता मोडकळीस आलेल्या तेथील इमारतींत अनेक प्रकारचे लोक राहत असलेले दिसतात. चित्रकार, कॉंट्रॅक्टर, बेकार वकील, व लहानसहान कंपन्यांचे एजंट या सर्वांचें वास्तव्य तेथे दिसतें. पण दुसरेंच घर अगदी निराळ्या प्रकारचें उठून दिसतें. मालकाने तें सबंच आपल्याकडे राखून ठेवलेलें दिसत

होतें. रात्रीची वेळ असल्याने सर्व दिवे मालविले होते. फक्त दरवाज्यां वरचा एकच मोठा दिवा जळत होता. तरीही त्याच्याकडे नजर टाकतांच त्याच्या मालकाचें वैभव व खानदानीपणा दिसून येत होता. मनोहरपंत तेथे थांबले आणि बटन दाबून आपण आल्याची वर्दी दिली. एका म्हाताऱ्या, रुबाबदार नोकराने दार उघडलें.

"विठोजी, डॉक्टरसाहेब आहेत का रे ?" मनोहरपंतांनी त्याला विचारलें.

मनोहरपंतांना आत घेऊन जात विठोजी म्हणाला, "मी पाहून येतों." तळमजल्यावरील भव्य व सुसज्जित दिवाणखान्यांत त्यांना घेऊन जाऊन तो म्हणाला. "आपण जरा येथे बसतां का ? का वरच चलतां साहेबांच्या खोलींत ?"

"कांही नको, मी बसतों येथेच." असें म्हणून मनोहरपंत तेथीलच एका खुर्चीवर जरा टेकले. हा दिवाणखाना डॉ. शरच्चंद्रांचा फार आवडता होता. साऱ्या मुंबईंत याच्यासारखा मनोहर दिवाणखाना दुसरा नाही असे मनोहरपंतही नेहमी म्हणत—पण आज त्यांच्या चित्तावर उद्विग्नता पसरली होती. कृष्णरावाची मूर्ति त्यांच्या डोळ्यापुढे सारखी उभी होती, त्यांचे मन उदास झालें होतें, सहसा कधीही न वाटणारा उद्वेग व जीवनाचा कंटाळा त्यांना आज वाटूं लागला होता. दिव्यांच्या लखलखाटांत पॉलिश केलेलीं कपाटें चकाकत होतीं, चित्रविचित्र सावल्या छतावर पडल्या होत्या. पण या छायाप्रकाशांतही संकटाचें प्रतिबिंब त्यांना दिसत होतें. डॉक्टर शरच्चंद्र बाहेर गेले आहेत असें सांगत विठोजी परत आला तेव्हा त्यांना समाधान वाटलें आणि त्याचीही त्यांना लाज वाटूं लागली.

"कायरे मी आता त्या कृष्णराव गुप्तेला त्या प्रयोगशाळेच्या मागील दाराने आत जातांना पाहिलें—डॉक्टरसाहेब घरीं नसतांना तो येतो हें कसें काय ?"

"त्यांत कांही विशेष नाही साहेब" विठोजीने उत्तर दिलें, "त्याच्या जवळ किल्ली आहेच."

"तुमच्या मालकांचा त्याच्यावर बराच विश्वास दिसतो एकूण ?" मनोहरपंत विचारांत गढून जाऊन थोडें स्वतःशींच पण मोठ्याने म्हणाले.

"होय साहेब, असें आहे खरें—ते सांगतील तें ऐकण्याबद्दल आम्हा सर्वांना ताकीद देऊन ठेविली आहे साहेबांनी."

"पण मी त्याला कधीच येथे पाहिला नाही हें कसें ?" मनोहरपंतांनी प्रश्न केला.

"आपण कोठून पाहाल त्यांना ? ते इकडे कधीच येत नाहीत. पुढच्या दाराने सुद्धा ते फारच क्वचित् येतात. बहुशः त्या प्रयोगशाळेच्या मागल्या दारानेंच ते येतात जातात."

"अस्सें, मी जातों तर."

उदास अंतःकरणाने व जड पावलांनी मनोहरपंत घरीं जाण्यास निघाले. "गरीब बिचारा शरच्चंद्र !" ते आपल्याशींच विचार करूं लागले. "मला भीति वाटते की तो चांगलाच गोत्यांत आलेला दिसतो. तरुणपणीं त्याने थोडासा उच्छृंखलपणा केला होता, अर्थात् त्याला आता किती तरी दिवस झाले. पण देवाच्या घरीं मुदतीचा कायदा थोडाच आहे ! अगदी बरोबर असेंच असलें पाहिजे. तें तारुण्यांतील एखाद्या पातकाचें, लपवून ठेविलेल्या अपकीर्तीच्या कलंकाचें भूत त्याच्या मानगुटीस बसलें असलें पाहिजे. स्वार्थी पक्षपाती वृत्तीला स्वतःची चूक क्षम्य भासली किंवा काळाच्या ओघांत ती स्मरणांतूनही गेली म्हणून काय झालें, शिक्षा व्हावयाची ती कांही चुकत नाही." ह्या विचाराने त्यांना स्वतःलाही थोडीशी भीति वाटली. आपलें स्वतःचेंही पूर्ववृत्त ते तपासून पाहूं लागले. स्मरणशक्तीला ताण देऊन आपल्या भूतकाळांतील जीवनाचा कोपरान् कोपरा त्यांनी धुंडाळून पाहिला. न जाणों, तेथन एखादें भूत, प्राचीनकाळीं घडलेल्या अपराधाची सव्याज वसुली करण्याकरितां टुणदिशीं उडी मारून पुढे यावयाचें. त्यांचें भूतकाळांतील जीवन बरेंचसें निष्कलंक होतें. आपल्या आयुष्यांत केलेल्या कृत्यांचा पाढा त्यांच्या इतक्या निर्भयतेने ऐकण्याची फारच थोड्यांची हिंमत असेल. पण तरीही ज्या कित्येक

चुका त्यांनी केल्या होत्या त्यांच्या ओझ्याखाली ते दडपले गेले. त्याच-प्रमाणे कितीतरी पापें अगदी हातून घडण्याच्या बेतांत आलीं असतांही त्यांनी तीं घडूं दिलीं नव्हतीं, त्याबद्दल कृतज्ञतेने त्यांचें अंतःकरण गंभीर व शांत झालें. पुनः पहिला विचार मनांत येतांच त्यांना एक आशेचा किरण दिसूं लागला. "आता ह्याच कृष्णराव गुप्ते घ्याना, ह्याचेंच जर पूर्वचरित्र पाहिलें तर किती तरी गुप्त रहस्यें उघडकीस येतील. त्याचें तोंडच सांगत आहे मुळी—त्याच्या कृष्णकृत्यांशीं तुलना करून पाहिली तर बिचाऱ्या शरदचीं गंभीर पापें सुद्धा पुण्यकृत्येंच भासतील. आहे ही स्थिति चालू देतां कामा नयेच. ह्या दुष्टाला माझ्या शरदच्या घरांत चोरासारखा शिरतांना पाहिलें की अंगावर काटा उभा राहतो. गरीब बिचारा शरद् ! कसली अद्दल घडली आहे त्याला ही ! आणि त्याचे परिणाम तरी किती भयंकर ! कारण ह्या गुप्त्याला त्या मृत्युपत्राचा सुगावा जर का लागला असला तर ही संपत्ति लुबाडण्याला तो अगदी आतुर होईल. छे, छे. आपल्याला कंबर कसून कामाला लागलेंच पाहिजे. पण शरद करूं देईल तर—शरदने करूं मात्र दिलें पाहिजे." त्यांच्या मनश्चक्षूंपुढे त्या मृत्युपत्रांतील तीं विचित्र कलमें पुनः एकदा सूर्यप्रकाशा-सारखीं स्पष्ट दिसूं लागलीं.

---

## प्रकरण तिसरें

# डॉ. शरच्चंद्रांची निश्चितता

सुमारें पंधरा दिवसांनंतर डॉ. शरच्चंद्रांच्या घरीं एक थाटाची चहापार्टी झाली. समारंभाला अगदी थोडया पांचसहा निकटच्या स्नेह्यां नाच आमंत्रण होतें. पण तीं सर्व विद्वान, कुलीन व सन्माननीय मंडळी होतं व बहुतेक डॉ. शरच्चंद्राचे जुने दोस्त होते. पार्टी संपून इतर मंडळी निघून गेल्यावर मनोहरपंत मुद्दामच मागे राहिले. यांत विशेष असें कांही नव्हतें पूर्वीही किती तरी अशाच प्रसंगीं मनोहरपंत असेच मागे राहत असत मनोहरपंतांचे जे कांही स्नेही होते त्यांची त्यांचेवर भक्तीही तशीच होती. कोणत्याही समारंभाचे वेळीं फुलपाखरासारख्या आनंदी वृत्तीचे चैनी व बोलके गडी निघून गेल्यावरही या शांत व निर्व्यसनी स्नेह्याला आग्रहाने थांबवून घरण्यांत त्याच्या स्नेह्यांना समाधान वाटत असे. खाणें पिणें, हसणें, खिदळणें इत्यादि गडबडींत मन थकून गेल्याने त्यांच्या प्रसन्न सहवासांत कांही काळ घालविणें व त्यांच्या नम्रपणाचा व गंभीरपणाचा सुसंस्कृत आनंद अनुभविणें यांत त्यांच्या स्नेह्यांना शांति मिळत असे डॉ. शरच्चंद्रही या नियमाला कांही अपवाद नव्हते. मनोहरपंतांशेजारींच दुसरी खुर्ची ओढून घेऊन डॉ. शरच्चंद्र येऊन बसले. पन्नाशीच्या जवळ गेलेल्या त्यांच्या वयाला शोभेशी त्यांची तेजस्वी मुखमुद्रा, त्यांचा भरदार बांधा व त्यांच्या डोळ्यांत थोडी धूर्तपणाची छटा दिसली, तरी त्यांच्या चर्येवर विलसणारें एकंदरींत हुशारीचें व प्रेमळतेचें तेज यामुळे त्यांना पाहतांच एकप्रकारचा आदर वाटू लागे. त्यांची प्रसन्न मुद्रा पाहतांच मनोहरपंतांविषयीं त्यांना अगदी अंतःकरणपासून प्रेम वाटत होतें हें दिसून येई

"शरद मला तुझ्याशीं थोडें बोलावयाचें आहे." मनोहरपंतांनी सुरुवात केली. "तुझें तें मृत्युपत्र तुला आठवतें ना ?"

अप्रिय होता तोच विषय निघाला असें डॉक्टर साहेबांच्या मुद्रेचे सूक्ष्म अवलोकन करणाऱ्याच्या तेव्हाच लक्षांत आलें असतें, पण त्यांनी

हसण्यावारी गोष्ट घालवून टाकली. "अरेरे, मनोहर, दुर्दैव तुझें की तुला माझ्यासारखा अशील मिळाला. तो कमलाकांत तुझाच जोडीदार आहे या बाबतींत. शास्त्रीय शोधांतील माझी बंडखोरी पाहिली की त्याच्या सनातनी मनाला मोठा धक्का बसतो आणि माझें मृत्युपत्र पाहिलें की तुझें चित्त ठिकाणावर राहात नाही. अरे असा रागावूं नकोस–कमलाकांत आपला आनंदी प्राणी आहे, मी कांही त्याला दोष नाही देत, आणि त्याला पुनःपुनः भेटावें असेंही मला वाटतें, पण कांही झालें तरी अखेर सनातनीच. अगदी कट्टर सनातनी. छे, कमलाकांताने माझी फार निराशा केली.

" मला तें पसंत नव्हतें हें तुला माहीत आहेच." गोष्ट बदलण्याचा शरश्चंद्रांचा प्रयत्न मनोहरपंतांनी निर्दयपणें हाणून पाडला.

" माझें मृत्युपत्र म्हणतोस होय ! होय मला माहीत आहे तूं त्याच वेळीं तसें सांगितलें होतेंस." जरा झटक्यानेच डॉक्टरांनी उत्तर दिलें.

" होय. पुनःही मी तेंच सांगतों. तुझ्या त्या गुह्याची थोडीशी माहिती मला मिळाली आहे.

डॉक्टर शरश्चंद्रांची भव्य व तेजस्वी मुद्रा एकदम फिक्की पडली. त्यांच्या डोळ्यांभोवतीही थोडी काळवंडलेली झाक दिसूं लागली. " जाऊं दे, मला नाही तें ऐकायचें " ते म्हणाले, " मला वाटतें याची अधिक चर्चा करावयाची नाही असें आपलें ठरलें होतें ना ? "

" पण मी जें कांही ऐकलें आहे तें अगदी भयंकर आहे."

" म्हणून काय झालें ? माझें मन बदलणार नाही. तुला माझ्या परिस्थितीची कल्पना नाही". डॉक्टर साहेबांनी उत्तर दिलें. त्यांच्या बोलण्यांत थोडी विसंगति दिसत होती. "मनोहर माझी परिथिति मोठी कठीण आहे. फारच–अगदी फारच विचित्र आहे ती. चर्चा करून दुरुस्त होण्यासारखी कांही ती गोष्ट नाही."

" पण शरद, तुझी माझी ओळख कांही आजकालची नाही. माझ्यावर विश्वास टाकण्यास कांही हरकत नाही. अगदी विश्वासाने–in confidence–काय असेल तें मला मोकळेपणीं सांग. मी त्यांतून खास कांही तरी मार्ग काढीन."

" खरेंच मनोहर. तूं किती–किती तरी चांगला आहेस. तुझें कसें उतराई व्हावें हेंच मला कळत नाही. तुझ्यावर माझा अधिक विश्वास

आहे. दुसऱ्या कोणापेक्षाही तुझ्यावर माझा अधिक विश्वास आहे. फार काय, निवडच करावयाची असेल तर माझ्या स्वतःपेक्षाही तुझ्यावर मी अधिक विश्वास ठेवीन. पण खरोखर तुझी कल्पना आहे तसें नाही तें. तुला वाटतें इतकी कांही माझी परिस्थिति बिकट नाही. आणि एक गोष्ट तुला सांगतों म्हणजे तुझें चित्त जरा स्थिर होईल. मला वाटेल त्या वेळीं अगदी एका क्षणांत मी कृष्णरावाचा संबंध सोडूं शकेन. अगदी वचन देतों या बाबतींत तुला मी. तुझ्या कळकळीबद्दल मात्र मी तुझा ऋणी आहें. पण मनोहर माझा एक शब्द तूं ऐक. गैरसमज करून घेऊं नको. पण ही एक खासगी बाब आहे असें जमजून तूं ती सोडून दे."

मनोहरपंत थोडा वेळ खोल विचारांत गढून गेले. अखेर ते म्हणाले, "तुझें म्हणणें अगदी बरोबर आहे यांत मला शंका नाही !" इतकें बोलून ते जाण्याकरितां उभे राहिले.

"ठीक आहे, पण आता हा विषय निघालाच आहे—आणि मला वाटतें, ही शेवटचीच खेप समजावी या विषयाची चर्चा करण्याची—तर आणखीही एक गोष्ट तुला सांगावीशी वाटते. खरोखरच त्या बिचाऱ्या कृष्णरावाकडे माझें पुष्कळच लक्ष आहे. तुझी व त्याची गाठ पडली हें मला समजलें. त्यांनीच सांगितलें मला. आणि तो थोडासा उद्धटपणानेच वागला तुझ्याशीं म्हणूनही समजलें; पण त्या पोराकडे माझें अगदी मनापासून अगदी पूर्ण लक्ष आहे. आणि मनोहर, माझ्या पश्चात् तूंही त्याच्याकडे लक्ष ठेव आणि त्याचे कायदेशीर हक्क त्याला मिळवून दे. इतकें मला वचन देशील ? तुला जर सर्व परिस्थिति समजली तर तूं तावडतोब कबूल करशील अशी मला खात्री आहे. इतकें जर तूं वचन दिलेंस तर माझ्या मनावरचा एक मोठा बोजा उतरला असें मला वाटेल."

"पुढे कधी काळी तरी त्याचा माझा स्नेह जमेल अशी खोटी आशा मी कशाला दाखवूं ?" मनोहरपंतांनी सरळपणें उत्तर दिलें.

"मी तरी कोठे तसें म्हणत आहें ?" डॉक्टर शरच्चंद्र त्यांच्या खांद्यावर हात ठेवून त्यांची समजूत काढूं लागले. "त्याला न्याय मिळावा इतकीच माझी मागणी. मी नाहीसा झाल्यानंतर माझ्याच खातर तूं याला मदत कर इतकेंच माझें मागणें."

मनोहरपंतांनी एक दीर्घ निःश्वास टाकला. "ठीक आहे, मी वचन देतों." त्यांनी अखेर उत्तर दिलें.

---

### प्रकरण चवथें

# सरदार खंडेराव यांचा खून

सुमारें एक वर्षानंतर इ. स. १९...च्या आक्टोबर महिन्यांत एका भयंकर खुनाच्या अंगावर शहारे आणणाऱ्या हकीकतीने सारी मुम्बई हादरून गेली. खुनाला बळी पडलेली व्यक्ति एका थोर सन्माननीय घराण्यांतील असल्याने तर ह्या खुनाला अधिकच महत्त्व प्राप्त झालें. खुनाची हकीकत अगदी सरळ पण आश्चर्यकारक होती. एका चाळींत दुसऱ्या मजल्यावर राहणारी एक मोलकरीण रात्रीं अकरा वाजतां आपल्या खोलींत निजण्याच्या तयारींत होती. आकाश निरभ्र होतें, आणि तिच्या खोलीच्या खिडकींतून दिसणाऱ्या बाहेरच्या गल्लींत पौर्णिमेचें पिठासारखें पांढरें शुभ्र चांदणें पडलें होतें. ह्या मनोहर चंद्रप्रकाश पाहून तिचें चित्त रमलें आणि खिडकीपाशीं क्षणभर उभी राहून बाहेरचा सुन्दर देखावा ती पाहूं लागली. सर्व जगांत आजच्याइतकें सुख, शांति व आनंद यांचें वातावरण पसरलेलें तिला पूर्वी कधींच भासलें नव्हतें. मागाहून ह्या अनुभवाचें वर्णन करतांनाही तिचे डोळे आसवांनी भरून येत असत. ती अशी उभी असतांना पांढरे शुभ्र केस असलेला एक वृद्ध, उमदा गृहस्थ गल्लीच्या पलीकडच्या बाजूने येतांना दिसला. त्याच्या समोरच्याच बाजूने दुसरा एक ठेंगणासा गृहस्थ त्याचेकडे येत असलेला दिसला, पण त्याचेकडे तिचें प्रथम लक्ष गेलें नव्हतें. ते दोघे परस्परांच्या अगदी जवळ आले तेव्हा, बरोबर त्या मोलकरणीच्या खिडकीच्या खालीच, त्या म्हाताऱ्या गृहस्थाने अदबीने व सभ्यपणाने त्या दुसऱ्या गृहस्थाला कांही प्रश्न विचारला. तो प्रश्न विशेष महत्त्वाचा असावा असें कांही दिसलें नाही. फार काय पण त्याने जे हातवारे केले त्यावरून त्यांनी फक्त रस्ताच विचारला असावा, असेंच तिला भासलें. त्या म्हाताऱ्या गृहस्थाच्या चेहऱ्यावर स्वच्छ चंद्रप्रकाश पडला होता आणि त्या

प्रकाशांत शोभून दिसणारी त्याची निष्पाप मुद्रा व त्याच्या मुखावर दिसणारी ऋषितुल्य शांतीची व समाधानाची छटा पाहून तिला अतिशय आल्हाद वाटला. इतक्यांत तिची नजर त्या दुसऱ्या व्यक्तीकडे गेली. आपल्या मालकाकडे एकदा आलेला तिने त्याला पाहिला होता. आणि पाहतांक्षणींच तिरस्कार उत्पन्न करणारा कृष्णराव तो हाच हें पाहून तिला आश्चर्य वाटलें. त्याच्या हातांत एक जाड घणसर अशी काठी होती, आणि ती तो लीलेने चाळवीत होता. त्या वृद्ध गृहस्थाच्या एकाही प्रश्नाचें त्याने उत्तर दिलें नाही; इतकेंच नव्हे तर ऐकतांनाही आपली अधीरता तो आवरूं शकला नाही. इतक्यांत एकाएकीं त्याच्या रागाचा भडका झाला, जमिनीवर जोराजोराने पाय आपटून हातांतली काठी तो परजूं लागला; आणि एखाद्या वेड्याप्रमाणें त्या सद्गृहस्थाच्या अंगावर धावून गेला. त्याच्या या आविर्भावाने तो वृद्ध तर चकितच झाला, आणि दोन पावलें मागे सरला. ह्या असभ्य वर्तनाची त्याला चीडही आल्यासारखें दिसलें. हें पाहतांच कृष्णरावाने भीडमर्यादा सर्व झुगारून दिली, आणि काठीच्या तडाक्यासरसा त्याला जमीनदोस्त केला. दुसऱ्याच क्षणीं चिडलेल्या माकडाप्रमाणें त्याला पायाखाली तुडवून तो त्याच्या अंगावर उभा राहिला आणि जोरजोराने उसळून त्याच्यावर काठीचे प्रहार करूं लागला. ह्या तडाख्याखाली त्या वृद्धाच्या हाडकांचा चुरा होत असल्याचा आवाज स्पष्ट ऐकूं येत होता आणि तें निष्प्राण कलेवर प्रत्येक प्रहारागणिक रस्त्यावर इकडून तिकडे लोटलें जात होतें. हें भयंकर दृश्य पाहणें आणि ते रोमांच उभे करणारे आवाज ऐकणें त्या मोलकरणीला सहन झालें नाही. ती तत्काळ बेशुद्ध झाली.

ती शुद्धीवर आलीं त्या वेळीं दोन वाजण्याचा सुमार होता. तिने ताबडतोब पोलिसला वर्दी दिली. खुनी मनुष्य तर केव्हाच पळून गेला होता, पण त्याच्या रागाला बळी पडलेल्या दुर्दैवी गृहस्थाचें प्रेत कल्पनातीत छिन्नविच्छिन्न झालेलें तसेंच तेथे पडलेलें होतें. ज्या काठीने हें काम केलें होतें, ती फार मजबूत व जड होती. पण तिचेही त्या पिसाटाच्या निर्दयपणाच्या लहरींत दोन तुकडे झाले होते आणि पिजून गेलेला एक तुकडा जवळच्या गटारांत गडबडत गेला होता—दुसरा अर्थातच त्या खुनी

इसमाच्या हातांत राहून गेला असावा. प्रेताच्या अंगावर एक सोन्याचें घड्याळ व पैशाचें पाकीट सापडलें. पण भेटपत्र ( व्हिजिटिंग कार्ड ) किंवा दुसरेंही कागदपत्र कांही आढळले नाहीत. आंतल्या खिशांत एक सीलबंद केलेला व तिकिट चिकटविलेला लखोटा होता व त्यावर मनोहरपंत वकिलांचा पत्ता लिहिलेला होता. हा लखोटा पोस्टांत टाकण्याकरितांच तो गृहस्थ बहुतेक निघाला असावा.

दुसरे दिवशीं सकाळींच मनोहरपंत उठतात न उठतात तोंच हा लखोटा घेऊन पोलिस त्यांचे घरीं हजर झाले. हा लखोटा त्यांनी पाहिला आणि कोणत्या परिस्थितींत तो पोलीसच्या हातीं लागला हें त्यांना कळण्याचाच अवकाश, त्यांनी ताबडतोब तोंडाला कुलूप घातलें व त्यांची मुद्रा गंभीर झाली. "प्रत्यक्ष प्रेत पाहिल्याशिवाय मी कांही सांगू शकत नाही." त्यांनी उत्तर दिलें, "हें प्रकरण बरेंच गंभीर दिसतें. कृपा करून जरा थांबा, मी कपडे करून तुमच्याबरोबर येतोंच." ते आंत गेले, घाईघाईने सकाळची न्याहारी उरकली आणि पूर्वीइतक्याच गंभीर मुद्रेने पोलिसांबरोबर चौकीवर गेले. प्रेत तेथे पूर्वीच आणून ठेवलें होतें. प्रेताकडे पाहतांच त्यांनी मान हलवून उत्तर दिलें,

"होय, मी ह्या गृहस्थांना ओळखतों. दुःखाची गोष्ट आहे की हे गृहस्थ सरदार खंडेराव थोरात आहेत."

"काय म्हणतां साहेब ! " फौजदार आश्चर्याने उद्गारला. "हें शक्य तरी आहे काय ? " दुसऱ्याच क्षणीं खात्यांतील बढतीची महत्वाकांक्षा त्याच्या डोळ्यांत चमकली. "हें प्रकरण चांगलेंच रंगणार," ते पुढे म्हणाले, "आणि कदाचित खुनी आरोपीस पकडण्याच्या बाबतींतही आपण आम्हाला कांही मदत करूं शकाल." असें म्हणून मोलकरणीने सांगितलेली सर्व हकीगत त्यांनी थोडक्यांत सांगितली आणि तुटलेल्या काठीचा तो तुकडाही दाखविला.

कृष्णरावाचें नांव ऐकतांच—मनोहरपंतांचें चित्त अर्धे अधिक खचलें होतें. पण जेव्हा त्यांनी तो काठीचा तुकडा पाहिला तेव्हा तर त्यांना मुळीच शंका राहिली नाही. तो तुकडा अगदी पिंजून जाऊन छिन्नविच्छिन्न झाला होता, तरीही कांही वर्षांपूर्वी डॉ. शरचंद्रांला भेट म्हणून

आपण दिलेल्या एका सुंदर काठीचाच तो तुकडा होता याबद्दल त्यांना मुळीच शंका उरली नाही.

"ह्या कृष्णराव गुप्ते ठेंगणासा मनुष्य आहेना ? " त्यांनी विचारलें.

"ती मोलकरीण सांगते की तो विशेष ठेंगणा तर आहेच, पण दिसण्यांतही अगदी दुष्ट व हिडीस दिसतो."

मनोहरपंत विचारांत गढून गेले. थोड्या वेळाने मान वर करून म्हणाले, "तुम्ही जर माझ्याबरोबर याल तर मला वाटतें मी तुम्हांला त्याचें घर दाखवीन."

ह्या वेळेला सकाळचे नऊ वाजून गेले होते. पण सकाळपासून आकाश ढगांनी भरून गेल्यामुळे अजूनही सूर्यदर्शन झालें नव्हतें. काळसर धूसर रंगाचें धुकें साऱ्या मुंबईभर पसरलें होतें, आणि पुष्कळ ठिकाणचे दिवे अजून जळतच असल्याने त्यांच्या अंधुक प्रकाशांत हें धुक्याचे आच्छादन अधिकच भेसूर व उदास दिसे. मनोहरपंतांची गाडी या धुक्यांतून मार्ग काढीत चालली होती. चाळी मागून चाळी, गल्ल्यामागून गल्ल्या ओलांडीत ती चालली होती. दोन चाळींच्यामध्ये आपोआप तयार झालेल्या नैसर्गिक गटारांतून घाणेरड पाणी साचलें होतें. दोन चार नागडींउघडीं व चिंध्या पांघरलेलीं मुलें त्या सृष्टिसौंदर्याचा उपभोग घेत ठिकठिकाणीं बागडत होतीं. आकाशांतील तें भेसूर धुकें आणि त्या धुक्याला अधिक भेसूर करणारा प्रत्येक चाळींतून निघणारा धूर, जमिनी वरील तीं गटारें, त्यापेक्षाही अधिक गलिच्छ असलेल्या त्या चाळी व त्यांतून ऐकूं येणारे दुःख, दारिद्र्य व दीनतेचे आक्रोश, हें सर्व पाहून आपण एखाद्या स्वप्नसृष्टींतूनच चाललों आहोंत की काय, असा मनोहर पंतांना भास झाला. त्या उदास वातावरणांत त्यांच्या मनांत येणा विचारही तितकेच उदासपणाचे होते. आपल्या शेजारीं बसलेल्या आपल्या सोबत्याकडे त्यांची नजर जातांच पोलीस आणि पोलीसचे कायदे यांच्या शीं संपर्क आला असतां अतिशय प्रामाणिक माणसेंही कशीं दचकता याचा त्यांना अनुभव आला.

त्यांचें ठरलेलें ठिकाण येतांच गाडी थांबली व दोघेही खाली उतरले. आता धुकें थोडें कमी होऊं लागलें होतें आणि त्या ठिकाणची परिस्थिति अधिक स्पष्टपणें दिसूं लागली होती. गलिच्छ आणि अंधेऱ्या गल्लींतील तो घाणेरडा रस्ता, धुरानें काळथाकुट्ट झालेल्या इमारती, कुजट घाण येत असलेलीं उपाहारगृहें आणि पानपट्टीचीं दुकानें, फळ्यांवरून व दरवाजांतून बसलेलीं टारगट पोरें, आणि सकाळच्या चहाचा नित्यनेम पूर्ण करण्याकरतां हिंडणाऱ्या, सर्व प्रांतांतील पोशाकाचें व चालीरीतींचें प्रदर्शन करणाऱ्या त्या स्त्रिया—हा सर्व देखावा, त्या धुक्यांतून अस्पष्ट दिसत असला तरी, मनोहरपंतांच्या उदास मनःस्थितींत अधिकच उद्वेग उत्पन्न करणारा होता. डॉक्टर शरच्चंद्रांच्या लाडक्या दोस्ताचें घर येथें होतें. दहा लाखाच्या इस्टेटीचा धनी होणारा कृष्णराव गुप्ते येथे राहत होता.

दारावर थाप मारतांच काळथाकुट्ट चेहऱ्याच्या, केस पिकलेल्या म्हातारीने तें उघडलें. तिचा चेहरा मूळचा दुष्ट होता, पण सुष्टपणाचें सोंग तिला चांगलें साधलें होतें. तिची वागणूक अगदी सभ्यपणाची होती. "होय, कृष्णराव गुप्ते येथेच राहतात" ती माहिती पुरवूं लागली. "पण ते घरीं नाहीत. काल रात्रीं ते फारच उशीरा घरीं आले आणि तासभराच्या आंतच पुनः बाहेर गेले. यांत विशेष असें कांही नाही. नेहमीच ते असे अनियमित वागतात, केव्हा केव्हा तर अजीबात घरीं येतच नाहीत. आताच पहाना मध्येंच दोन महिने त्यांनी कोठे दडी मारली होती, ते काल रात्रीं पुनः उगवले."

"ठीक आहे. आम्हाला त्यांची खोली जरा पाहावयाची आहे." मनोहरपंत तिला म्हणाले, 'पण त्याच्या खोलींत तुम्हाला जाऊं देतां येणार नाही' असें ती म्हणत होती, तोंच मनोहरपंत पुनः म्हणाले, "हें पहा, हे गृहस्थ कोण आहेत हें मी तुम्हाला अगोदर सांगतों. हे पोलीस खात्यांतील फौजदार रामसिंग आहेत."

त्या म्हातारीच्या चेहऱ्यावर एक प्रकारच्या आसुरी आनंदाच्या लहरी उठल्याचा भास झाला. ती म्हणाली, "अस्सें होय ! त्यांचेवर कांही किटाळ आलें आहे तर ! काय केलें आहे त्यांनी."

मनोहरपंत व फौजदारसाहेब यांनी एकमेकांकडे साभिप्राय मुद्रेने पाहिलें. "त्यांच्याविषयीं लोकांचें फारसें चांगलें मत दिसत नाही." फौजदार साहेब उद्‌गारले. नंतर त्या बाईला उद्देशन ते म्हणाले, "आतां हें पहा बाई, मला आणि या गृहस्थांना त्यांची खोली जरा पाहूं द्याल का ?"

त्या एवढया मोठ्या घरांत त्या म्हाताऱ्या बाईशिवाय कोणीच राहत नव्हतें. कृष्णरावाने आपल्याकडे ठेवलेल्या दोन खोल्यांखेरीज बाकीच्या भागांत फारसा वावर सुद्धा नव्हता. पण या दोन खोल्या अगदी श्रीमंती थाटांत, उच्च सुसंस्कृत अभिरुचीला साजतील अशा सजविल्या होत्या. चांदीचीं भांडीं, रेशमी व कलाबतूचे पडदे, शिसवीचें नक्षीदार फरनीचर, भिंतीवर सुंदर चित्र (हें, मनोहरपंतांच्या मताने, डॉ. शरच्चंद्रांनी नजर केलेलें असावें, कारण उच्च दर्जाच्या चित्रकलेची त्यांना आवड होती.) आणि जमिनीवर सुंदर रंगीबेरंगी गालिचे असा थाट होता. आजच्या घटकेला मात्र, सर्व सामान अस्ताव्यस्त पडलेलें होतें, त्यावरून खोलीची नुकतीच कोणी तरी घाईघाईने तपासणी केल्याचें दिसत होतें. कपडे अस्ताव्यस्त पडले होते, खिसे उलटून वस्तु काढून घेतलेल्या दिसत होत्या, टेबलाचे खण उघडे राहिले होते आणि शेगडींत राखेचा ढीग पडला होता व पुष्कळसे कागदपत्र नुकतेच त्यांत जाळून टाकल्याचें उघड दिसत होतें. ह्या राखेच्या ढिगांतून एका हिरव्या चेकबुकाचें अर्धवट जळलेलें थोटुक फौजदारसाहेबांनी हस्तगत केलें. मोडक्या काठीचा दुसरा तुकडाही दारामागे सापडला. मुख्य पुराव्याचा मुद्देमालच सापडल्याने फौजदारसाहेबांचें बरेंच समाधान झालेलें दिसलें. बँकेंत जाऊन तपास करतां आरोपीच्या खात्यावर हजारों रुपये जमा असल्याचें पाहून तर त्याच्या समाधानाचा कळस झाला.

"तुम्ही अगदी खात्री बाळगा" ते मनोहरपंतांना म्हणाले, "तो बदमाष आता पुरा सापडला माझ्या हातांत. बाकी कांही म्हणा, त्याचें माथें फिरलें असलें पाहिजे खास, नाहीतर हा काठीचा तुकडा येथे तो कधी टाकून जाता ना, अन् वर चेकबुक तर कधीच जाळता ना. अहो पैसा म्हणजे आज त्याचा प्राण आहे प्राण ! आता बँकेंत जाऊन फक्त पाळत ठेवावयाची की बेटा आपल्या पायांनी चालत येईल आमच्या कोठडींत."

ही शेवटली गोष्ट मात्र घडवून आणणें इतकें सोपें ठरलें नाही. कारण कृष्णरावाच्या ओळखीचे लोक फारच थोडे सापडले. त्या मोलकरणीच्या मालकाने सुद्धा त्याला एक दोनदांच पाहिला होता. त्याचीं मुलें-माणसें कोणीच सापडेनात; त्याचा फोटोही आढळला नाही; ज्या थोड्या मंडळींनी त्याला पाहिलें होतें त्यांनी केलेल्या वर्णनांत पुष्कळच फरक पडूं लागला आणि सामान्य मनुष्यांच्या अवलोकनांत असा फरक असतोही. एका मुद्द्यावर मात्र सर्वांची एकवाक्यता होती. ज्यांनी ज्यांनी त्या फरारी झालेल्या आरोपीला पाहिला होता, त्या सर्वांच्या मनावर त्याच्या हिडिसपणाची छाप कायमची पडून राही, पण त्याच्या विद्रूपतेचा किंवा व्यंगाचा स्पष्ट नामनिर्देश कोणालाही करतां येईना.



## प्रकरण पांचवें

# एक पत्र

डॉ. शरच्चंद्रांच्या घरीं जाण्याला मनोहरपंतांना अगदी संध्याकाळ झाली होती. नेहमीप्रमाणें विठने दार उघडून त्यांचें स्वागत केलें आणि माडीवरच्या नेहमींच्या हॉलमध्ये त्यांना न नेतां, मागील व्हरांड्यांतून बागेंत व तेथून पलीकडे असलेल्या प्रयोगशाळा किंवा विच्छेदनालय (Dissecting room) म्हणून संबोधिल्या जाणाऱ्या एका लहानशा इमारतींत तो त्यांना घेऊन गेला. एका प्रसिद्ध शस्त्रवैद्याच्या मुला-कडून डॉ. शरच्चंद्रांनी हें घर विकत घेतलें होतें. डॉ. शरच्चंद्रांना शस्त्र-क्रियेपेक्षा रासायनिक संशोधनाची हौस जास्त असल्याने बागेंतील मागील दारीं असलेल्या ह्या विच्छेदनालयाचें त्यांनी आपल्या प्रयोगशाळेंत रूपांतर केलें होतें. डॉ. शरच्चंद्राशीं प्रयोगशाळेंत झालेली मनोहर-पंतांची ही पहिलीच भेट होती.

बिनखिडकीची ती अंधेरी इमारत मनोहरपंतांनी कुतूहलाने पाहिली आणि त्यांना एक प्रकारचा अप्रिय व अननुभूत उद्वेग वाटल्या-वाचून राहिला नाही. त्याचा तळमजला एके काळीं विद्यार्थ्यांनी गज-बजलेला असे, पण आज अगदी ओसाड व उदास दिसत होता. टेबलावर रासायनिक द्रव्यें व प्रयोगाला लागणारीं उपकरणें अव्यवस्थित पडली होतीं, मोडकीं देवदारीं खोकीं इकडे तिकडे विखुरलीं होतीं, त्यांतील गवत वाऱ्याने उडत होतें, आणि रासायनिक द्रव्यें तयार करण्याच्या भट्टीच्या झरोक्यांतून येणाऱ्या अंधुक प्रकाशामुळे तेथील अव्यवस्थित देखावा अधिकच भयाण दिसत होता. पलीकडच्या कोपऱ्यांतील जिन्याने चढून मनोहरपंत दुसऱ्या मजल्यावरील शरच्चंद्राच्या खोलींत आले. ही खोली बरीच मोठी होती. चोहोकडे काचेच्या अलमाऱ्या, मध्यभागीं एक टेबल व पलीकडे एक भला मोठा लंबगोल आरसा, असें तेथील

फरनिचर होतें. मागील बाजूला रस्त्यावर उघडणाऱ्या तीन लोखंडी गजांच्या खिडक्या होत्या. टेबलापाशीं एखाद्या दुखणेकऱ्यासारख्या उदास व विमनस्क स्थितींत डॉ. शरच्चंद्र बसले होते. मनोहरपंतांचें स्वागत करण्याकरितां ते जागेवरून उठले सुद्धा नाहीत. बसल्या बसल्याच तोंडाने त्यांनी औपचारिक स्वागत केलें; पण त्यांचा आवाज सुद्धा अगदीच बदलून गेला होता.

मनोहरपंतांना तेथें पोचवून विठू परत जातांच मनोहरपंत म्हणाले, "आजची नवीन बातमी तुला समजली ना ?"

डॉक्टरांच्या अंगावर कांटा उभा राहिला. "होय रस्त्यावरचीं वर्तमानपत्रवालीं पोरें ओरडत होतीं. मी जेवीत असतांनाच ऐकलीं."

"मी एकच प्रश्न विचारतों" मनोहरपंत वकिली थाटांत म्हणाले, "सरदार खंडेराव हे माझे अशील होते, पण तसा तूंही माझा अशील आहेसच. मी आता जें कांही करणार आहें त्याचे परिणाम कोठवर जातील हें मला पाहिलें पाहिजे. त्याला छपवून ठेवण्याइतका तर तूं खुळा नाहीस ना ?"

"मनोहर, मनोहर, मी अगदी देवाशपथ, परमेश्वरसाक्ष सांगतों, की त्याचें तोंड पुनः माझ्या दृष्टीस पडणार नाही. या जगांतील त्याचा माझा संबंध कायमचा सुटला, अशी तुला मी ग्वाही देतों. ह्या प्रकरणाचा शेवट झाला आणि खरोखरी त्याला माझी मदत नकोही आहे. मला जितकी त्याची माहिती आहे तितकी तुला नाही, तो सुरक्षित, अगदी पूर्ण सुरक्षित आहे. अगदी माझ्या शब्दावर विश्वास ठेव, त्याचें नांव सुद्धा कोणाला ऐकूं येणार नाही."

मनोहरपंत उदास चित्ताने ऐकत होते. त्यांच्या बोलण्याचा आवेश त्यांना तितकासा आवडला नाही. "तुला त्याची बरीच खात्री वाटते असें दिसतें. आणि तुझ्या हिताच्या दृष्टीने तरी निदान तुझें म्हणणें खरें ठरो. कारण जर तें प्रकरण कोर्टांत गेलें तर तुझ्या नांवाचा संबंधही येईल."

"मला त्याची अगदी पुरी खात्री आहे." डॉक्टरांनी उत्तर दिलें. "मला इतकी खात्री का वाटते याला कारणें आहेत, पण मी तीं तुला

सांगूं शकत नाही. पण एका गोष्टीविषयीं मात्र मला तुझी सल्ला पाहिजे आहे. मला—मला आज एक पत्र आलें आहे. तें पत्र पोलिसला दाखवावें की नाही याचा निर्णय मी करूं शकत नाही. तें तुझ्यावर सोपवावें असें मला वाटतें. मनोहर, तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. अगदी योग्य तेंच तूं सांगशील यांत मला शंका नाही."

"या पत्रामुळें पोलिसला त्याचा पत्ता लागेल अशी का तुला भीति वाटते ?"

"छे, छे, मुळीच नाही. गुप्त्याचें काय होईल याची मला चिंता आहे, असें नाही माझें म्हणणें. त्याचा माझा संबंध संपला. या निंद्य प्रकरणामुळे माझ्या चारित्र्याला जरासा बट्टा लागतो आहे, त्याचा मी विचार करीत होतों"

मनोहरपंत विचारांत गर्क झाले. आपल्या मित्राच्या स्वार्थी वृत्तीचें त्यांना थोडें आश्चर्य वाटलें, पण मनांतून थोडें समाधानही झालें. अखेर ते म्हणाले, "बरें तें पत्र मला पाहूं दे."

तें पत्र थोडया विचित्र तिरप्या वळणाच्या अक्षरांत लिहिलें होतें आणि खाली 'कृष्णा गुप्ते' अशी सही होती. अगदी थोडक्यांत त्याचा आशय असा होता, की डॉ. शरश्चंद्रांनी माझ्यावर हजारों उपकार करून ठेवले आहेत, पण त्या उपकारांचा योग्य तऱ्हेने उतराई होण्यास मी नालायक ठरलों आहें. माझ्या सुरक्षिततेची काळजी तुम्ही करूं नका. कारण माझ्याजवळ पळून जाण्याचीं अशीं साधनें आहेत की ज्यांच्यावर मी पूर्ण विसंबून राहूं शकतों. हें पत्र पाहून मनोहरपंतांना बरेंच समाधान झालें. कृष्णरावाच्या व शरच्चंद्राच्या निकट संबंधाविषयीं त्यांची जी समजूत होती त्यापेक्षा त्यांचे संबंध अधिक चांगल्या स्वरूपाचे दिसले. शरच्चंद्राविषयीं आपण उगीच शंका घेतली याबद्दल ते स्वतःला थोडासा दोषही देऊं लागले.

"वरचें पाकिट आहे का तुझ्याजवळ ? " त्यांनी विचारलें.

"मी तें फाडून टाकलें. मी काय करतों आहे हें माझ्या लक्षांतच

आलें नाही. पण त्यावर कांही पोस्टाचा शिक्का नव्हता. हें पत्र माणसाच्या हातीं आलें आहे."

"हें पत्र अगदी बिनधोक ठेवूं ना मी माझेजवळ ? "

"या बाबतींत सर्व कांही माझ्याऐवजीं तूंच काय तें ठरव. माझी बुद्धि काम करीत नाही."

"ठीक आहे, मी विचार करून पाहीन." मनोहरपंतांनी उत्तर दिलें. "आणखी एक शब्द विचारतों. तुझ्या नाहीसें होण्यासंबंधीं तुझ्या मृत्युपत्रांत जें कलम लिहिलें होतें तें गुप्त्याच्याच सांगण्यावरून ना ? "

डॉक्टरांना एखादी फिट येते की काय असें वाटूं लागलें. ओठ घट्ट आवळून घेऊन त्यांनी मानेनेच होकार दिला.

"मला वाटलेंच तसें" मनोहरपंत म्हणाले. "तुझा खून करण्याचा त्याचा बेत होता. नशिबानेच तू सुटलास म्हणावयाचा."

शरच्चंद्रांनी गंभीरपणें उत्तर दिलें. "सुटलों कसला, त्यापेक्षा शिकलों म्हणणेंच अधिक योग्य. मी एक धडा शिकलों—कसला धडा तो मनोहर—अरे राम!" असें म्हणून शरश्चंद्राने दोन्ही हातांनी आपलें तोंड झाकून घेतलें.

बाहेर पडतांना मनोहरपंत थोडे थांबले आणि विठोजीशीं दोन शब्द बोलत उभे राहिले. "बरी आठवण झाली. आज सकाळीं डॉक्टर साहेबांना कोणी एक चिठ्ठी आणून दिली, कसा काय माणूस होता तो?" पण विठोजीने ठासून सांगितलें की जीं कांही पत्रें आलीं तीं टपालानेच आलीं आणि आजच्या टपालांत सुद्धा नुसत्या जाहिरातीच होत्या.

या माहितीने मनोहरपंतांची भीति दुणावलीच. तें पत्र अर्थात मागीलदारानें, प्रयोगशाळेच्या दारानेच आलें असलें पाहिजे. कदाचित् खरोखरीच तें पत्र तेथे बसूनही लिहिलें गेलें असेल. आणि असें असेल तर त्याचा विचार निराळयाच दृष्टीने करावयास पाहिजे. त्याचा उपयोगही संभाळूनच करावा लागेल. वर्तमानपत्रवाळीं पोरें फुटपाथवर घसा खरडून ओरडत होतीं, "जादा अंक ! कौन्सिलच्या सभासदाचा भयंकर खून !" त्यांच्या जुन्या अशिलाचा, मित्राचा, हा मृत्युलेखच होता. आणि या खुनां-

तून उत्पन्न झालेल्या भोवऱ्यांत दुसऱ्या मित्राच्या कीर्तीला जलसमाधि मिळते की काय अशी धास्ती त्यांना वाटल्यावाचून राहीना. अशा आणी-बाणीच्या प्रसंगीं त्यांना निर्णय करावयाचा होता. स्वतःच्या हिंमतीवरच पाऊल टाकावयाचें असा त्यांचा स्वभाव होता, तरीही या वेळीं सल्ला देणारा कोणी तरी भेटला तर बरें, असें त्यांना वाटूं लागलें. सरळ प्रश्न विचारून कोणाची सल्ला घेतां येण्यासारखी नव्हतीच; पण कदाचित अप्रत्यक्षपणें कोणाची सल्ला घेतां आली तर पाहावी असा विचार त्यांच्या मनांत आला.

घरीं येतांच ते तडक आपल्या कचेरींत जाऊन बसले. त्यांचे मुख्य कारकून केशवराव त्यांच्या समोरच बसले होते. आणि त्या दोघांच्या मध्ये टेबलावर सुंदर ट्रेमध्ये चहाची तयारी होती. दाट धुक्याचें आच्छादन सर्व शहरभर पडलें होतें. रस्त्यावरचे दिवे झाकलेल्या माणका-प्रमाणें चमकत होते आणि धुक्याने व ढगांनी दडपून गुदमरून टाकलेले शहरांतील धडपडीचे लांबून येणारे आवाज एकमेकांत विरून जाऊन त्यांचें दीर्घ अनुरणन मोठ्या झंझावाताच्या नादासारखें रस्त्यांतून घुमत होतें. पण त्यांच्या खोलींतील वातावरण शांत व आनंदी होतें. चहाच्या पेल्यांतून वाफा निघत होत्या, क्षणाक्षणाने अधिकाधिक रमणीय भासणाऱ्या कलाकृतीप्रमाणें त्या पेल्यांतील चहाचा रंगही अधिकाधिक प्रसन्न व रमणीय भासत होता आणि पहाडावरील चहाच्या मळ्यांतून चहाच्या पानांनी काबीज केलेली सूर्याची उष्णता मुंबईचें आजचें धुकें व त्याने आलेली उदासीनता घालवून टाकण्याकरितां चहाच्या पेल्यांत अवतरली होती. ह्या प्रसन्न वातावरणांत मनोहरपंतांचे विचार न कळत विरून जाऊं लागले. केशवरावांपाशीं जितक्या गुप्त गोष्टींची ते उघडपणें चर्चा करीत तितकी ते दुसऱ्या कोणापाशीं करीत नसत आणि त्यांच्यापासूनही ज्या गोष्टी गुप्त ठेवण्याची त्यांची इच्छा असे त्या गुप्त ठेवण्यांतही त्यांना नेहमीं यश येईच असें नाही. धंद्या-च्या निमित्ताने केशवरावांचें डॉक्टर शरच्चंद्राकडे नेहमी जाणेंयेणें असे, विठोजीशीं त्यांची ओळख होती, कृष्णरावाची डॉक्टरांच्या घरीं येजा आहे हेंही त्यांच्या कानांवर आल्याशिवाय राहिलें नसेल; याच्या आधारावर

ते स्वत:ही तर्क चालवून कांही अनुमानें बांधतील. मग ह्या सर्व रहस्या-वर प्रकाश पाडणारें पत्र अगोदरच आपण त्यांना दाखविणें अधिक इष्ट नाही का ? शिवाय केशवरावांनी हस्ताक्षरांचा पुष्कळ अभ्यास केला होता. त्यांना हें पत्र दाखविणें स्वाभाविक तर आहेच, पण त्यांत त्यांचा गौरवही आहे. केशवरावांचा सल्ला पुष्कळ प्रसंगीं उपयुक्त ठरला आहे. इतकें हें विचित्र पत्र वाचून ते कांही तरी उद्‌गार काढल्याशिवाय राहणार नाहीत; आणि त्यांच्या त्या उद्‌गारांच्या अनुरोधाने आपल्याला कांही नवी दिशा दिसेल, अशी मनोहरपंतांना आशा वाटली.

"सरदार खंडेरावांचें हें प्रकरण अगदी उद्वेग आणणारें आहे नाही ?" ते म्हणाले.

"किती तरी ! लोकांत सुद्धा त्याच्यामुळे मोठा हाहाकार उडून गेला आहे." केशवरावांनी उत्तर दिलें. "तो मनुष्य खास वेडाच असला पाहिजे."

"त्याचसंबंधीं मला तुमचें मत विचारावेंसें वाटतें. त्याच्या हस्ता-क्षराचें हें पत्र मजजवळ आहे. अर्थात् ही तुमच्या माझ्या मधील गोष्ट आहे, कारण याचें काय करावयाचें हेंच मला समजत नाही. बाकी कसेंही असलें तरी मोठें खराब काम आहे हें. पण हें पत्र येथे आहे खरें, अगदी खुनी मनुष्याच्या प्रत्यक्ष हातचें अक्षर."

केशवरावांचे डोळे चमकले. ते जरा अंग झाडून बसले आणि आस्थापूर्वक तें पत्र पाहूं लागले. "छे, नव्हेच," ते म्हणाले, "तो वेडा नव्हेच. पण हें अक्षर विचित्र आहे खरें."

"आणि मिळालेल्या माहितीवरून पाहतां लेखकही कांही कमी विचित्र नाही."

इतक्यांत चिठ्ठी घेऊन एक नोकर आंत आला.

"डॉ. शरच्चंद्राकडून आली आहे काय ही ?" केशवरावांनी विचारलें. "ओळखीचें अक्षर दिसलें म्हणून म्हणतों. कांही खासगी मज-कूर आहे त्यांत ?"

"फक्त जेवणाचें आमंत्रण आहे हें. कां? तुम्हांला पाहावयाचें आहे हें?"

"जरा थोडें."

केशवरावांनी तीं दोन्ही पत्रें शेजारीं टेबलावर मांडलीं आणि त्यांतील अक्षरांची किती तरी बारकाईने तुलना करून पाहिली. दोनही पत्रें परत देत अखेर ते म्हणाले, "लक्षांत राहण्यासारखें अक्षर आहे खरें हें."

दोघेही शांत होते. मनोहरपंतांच्या डोक्यांत परस्परविरुद्ध विचारांचा झगडा सुरू होता. थोडया वेळाने त्यांनी एकदम विचारलें, "पण काय हो केशवराव, ह्यांची तुलना तुम्ही कां करीत होतां?"

"उगीच." केशवरावांनी उत्तर दिलें. "त्या दोनही अक्षरांत विलक्षण साम्य आहे. पुष्कळ बाबतीत तीं दोनही अक्षरें तंतोतंत सारखींच आहेत. फक्त त्यांचें वळण निरनिराळें आहे इतकेंच."

"आश्चर्य आहे!"

"होय आपण म्हणतां तसें आश्चर्य आहे खरें हें."

"या पत्राविषयीं मी कोणाजवळ बोललों नसतों, तुम्हाला माहीतच आहे." वकीलसाहेब म्हणाले.

"अर्थातच नाही." त्यांच्या कारकुनांनी उत्तर दिलें. "माझ्या ध्यानांत आलें सर्व."

त्या दिवशीं रात्रीं मनोहरपंतांना एकांत मिळतांच त्यांनी तें पत्र आपल्या तिजोरींत कायमचें ठेवून दिलें व तिजोरीला कुलूप घातलें. त्यांच्या मनांत विचार आला, खुनी इसमाच्या नांवचें बनावट पत्र शरच्चंद्राने लिहावें! काय हें! आणि हा विचार येतांच त्यांच्या अंगांतलें रक्त जणू गोठून गेलें!

---

प्रकरण सहावें

# डॉक्टर कमलाकांत

कालाचा ओघ चाललाच होता. सरदार खंडेरावांच्या खुनामुळे सर्वच समाज चिडून गेला होता आणि खुनी इसमाचा पत्ता लावून देणाऱ्यास हजारों रुपयांचीं बक्षिसें जाहीर झालीं होतीं. पण कृष्णराव गुप्ते नाहीसा होऊन पोलिसच्या दृष्टीच्या टप्प्यापलीकडे गेला होता. जणूं काय तो कधी अस्तित्वांतच नव्हता. त्याचा पूर्व इतिहास पुष्कळसा पोलिसला मिळाला, अर्थात तो सर्व कलंकित, चारित्र्यहीन होता; त्याचें कठोर हृदय व भयंकर क्रूरपणा याचीं किती तरी उदाहरणें बाहेर आलीं; त्याचें दुष्ट व स्वैर जीवन, त्याचे विलक्षण दोस्त व त्याच्या जीवनाभोवती पसरलेलें तिरस्काराचें वातावरण या सर्व गोष्टीही समजल्या. पण त्याच्या आजच्या ठावठिकाणाविषयीं एक अवाक्षर सुद्धा नाही. खून झाला त्याच्या दुसरे दिवशीं सकाळीं परळवरील आपल्या घरांतून तो नाहीसा झाला तो जणूं काय आकाशांत उडून गेला. हळूहळू दिवस जाऊं लागले तसा मनोहरपंतांना वाटलेल्या भीतीचा आवेग ओसरूं लागला आणि त्यांची वृत्ति पुनः पहिल्यासारखी शांत होऊं लागली. सरदार खंडेराव यांच्या मृत्यूची हानि, कृष्णरावाच्या नाहीसें होण्याने, त्यांच्या दृष्टीने सव्याज भरून आली होती. डॉ. शरच्चंद्रांवरचें त्या दुष्ट मनुष्याचें दडपण नाहीसें झाल्यामुळे त्यांच्याही जीवनांत एका नव्या अध्यायाला सुरुवात झाली. आपला एकांतवास सोडून आपल्या मित्रमंडळींत ते पुनः मिळूं मिसळूं लागले होते. चहापार्ट्यांच्या आमंत्रणांना आणि हास्यविनोदाला पुनः सुरुवात झाली. उदारपणाबद्दल तर त्यांची ख्याति पूर्वीपासून होतीच त्याच्या जोडीला आता त्यांच्या जीवनांत धार्मिकपणाही पुष्कळ येऊं लागला. आपल्या धंद्यांत ते लक्ष घालूं लागले, मित्रमंडळींत मोकळेपणीं ते येऊं लागले. एकंदरींत त्यांचें जीवन सुखासमाधानांत जाऊं लागलें.

त्यांची मुद्रा तेजस्वी दिसूं लागली, समाजसेवेच्या जाणिवेचें आंतरिक समाधान त्यांच्या मुद्रेवर विलसूं लागलें आणि दोनतीन महिनेपर्यंत त्यांचा काळ शांततेंत गेला.

जानेवारीच्या ८ तारखेस डॉक्टरसाहेबांच्या घरीं झालेल्या एका लहानशा चहापार्टीला मनोहरपंत व कमलाकांत दोघेही हजर होते. डॉ. शरच्चंद्र त्यांच्याशीं इतक्या मोकळेपणाने वागले, की त्या त्रिकुटाच्या पूर्वीच्या गाढ मैत्रीच्या दिवसांची त्यांना आठवण झाली. बाराव्या तारखेला आणि पुनः चवदाव्या तारखेला मनोहरपंत डॉक्टरांना भेटावयास गेले पण भेट झाली नाही. साहेब आपल्या खोलींत बसून राहिले आहेत व कोणाचीही गाठ घेत नाहीत म्हणून विठोजीने सांगितलें. पंधराव्या तारखेला ते पुनः गेले आणि पुनःही गाठ पडली नाहीच. गेल्या दोन महिन्यांत आपल्या मित्राला भेटल्याशिवाय जवळ जवळ एक दिवसही त्यांचा गेला नव्हता. त्यामुळे शरच्चंद्राच्या ह्या एकांतवासाने त्यांचें मन अधिकच उदास झालें. पांचवे दिवशीं त्यांनी केशवरावांना घरीं बोलाविलें होतें. आणि सहावे दिवशीं डॉ. कमलाकांतांच्या घरीं जाऊन ते थडकले.

निदान येथे तरी त्यांना मज्जाव झाला नाही. पण ते आले आणि आपल्या डॉक्टर मित्राच्या मुद्रेवर झालेला बदल त्यांनी पाहिला तोंच त्यांच्या मनाला धक्का बसला. मृत्यूचें आमन्त्रण येऊन पोचल्याची स्पष्ट चिन्हें त्यांच्या मुद्रेवर दिसत होतीं. त्यांचा गाजरासारखा लाल चेहरा निस्तेज झाला होता, त्यांचें मांसल शरीर शिथिल होऊन गेलें होतें, म्हातारपणाची कळा स्पष्ट दिसूं लागली होती. एकाएकी वाढलेल्या त्यांच्या शारीरिक दुर्बलतेचीं तीं चिन्हें पाहून त्यांना इतका धक्का बसला नाही, पण त्यांच्या डोळ्यांतील विलक्षण दृष्टि, आणि त्यांच्या मनावर कसल्या तरी भीतीचा खोल आघात झाल्याचीं चिन्हें पाहूनच त्यांच्या मनाला जास्त धक्का बसला. डॉक्टर कमलाकांताना मृत्यूची भीति वाटली असेल असा संभव नव्हता. पण मनोहरपंतांना मात्र तशी शंका आली खरी. ते मनांत म्हणाले, "तो तर डॉक्टरच आहे. आपली स्थिति त्याच्या ध्यानांत आलीच असेल. आपले दिवस आता भरत आले आहेत हेंही त्याला समजलें असेलच. आणि ह्याच विचार त्याला सहन करणें कठोण

झालें असावें." पण मनोहरपंतांनी जेव्हा त्याच्या खालावलेल्या प्रकृती-संबंधीं उल्लेख केला तेव्हा आपण आता वाचत नाही हें सांगतांना कमलाकांतांचें चित्त अगदी स्थिर होतें.

"मला एक धक्का बसला," ते म्हणाले, "आणि त्यांतून मी आता उठणार नाही. आता फक्त दिवसगतीचाच प्रश्न आहे. पण मी आयुष्यांत सुख भोगून घेतलें आहे, खरोखर माझें पूर्ण समाधान आहे. मला तर केव्हा केव्हा असें वाटतें की जर आपण सर्वज्ञ असतों तर ह्या जगांतून सुटून जातांना अधिक आनंदच झाला असता."

"शरद सुद्धा आजारी आहे. तुला भेटला होता तो अलीकडे ?"

पण शरच्चंद्राचें नांव ऐकतांच त्यांची मुद्रा बदलली. आपला थर-थर कापणारा हात वर उचलून ते म्हणाले, "शरच्चंद्राचें तोंड सुद्धा पाहण्याची, नांव सुद्धा ऐकण्याची माझी इच्छा नाही." घोगऱ्या, कंप पावणाऱ्या अवाजांत ते पुढे म्हणाले, "त्याचा माझा संबंध संपला. तो मला मेला असेंच मी समजतों. आणि तूं सुद्धा मजजवळ त्याचा उल्लेख कृपा करून करूं नकोस."

"अरे, अरे !" मनोहरपंत म्हणाले. नंतर थोडा वेळ थांबून त्यांनी विचारलें, "मला कांहीच का करतां येणार नाही ? कमलाकांत, आपल्या तिघांची दोस्ती फार जुनी आहे. आणि यापुढे नवीन मित्र जोडण्याइतकें आपलें आयुष्य उरलें नाही."

कमलाकांतांनी उत्तर दिलें, "कांही इलाज नाही. तूं त्यालाच विचार ना ?"

"तो माझी गाठच घेत नाही."

"त्याचें मला आश्चर्य वाटत नाही. यांत कोणाचें खरें आणि कोणाचें खोटें हें कांही दिवसांनी, मी मेल्यानंतर, कदाचित् तुला समजून येईल. मी सांगूं शकत नाही. आणि तोंपर्यंत येथे बसून कांही दुसऱ्या गोष्टी तूं काढणार असलास तर जरूर काढ; पण मला नको असलेल्या

या विषयाशिवाय तुला दुसरें कांही सुचत नसेल तर तूं येथून चालता हो कसा. मला तें सहन होत नाही."

घरीं गेल्याबरोबरच मनोहरपंतांनी शरच्चंद्राला एक पत्र लिहिलें. माझी गाठ सुद्धा तूं का घेत नाहीस, कमलाकांताशीं तुझें भांडण इतक्या विकोपाला कां गेलें, हेच प्रश्न अगदी जीव तोडून त्या पत्रांत त्यांनी विचारले होते. दुसरे दिवशीं त्याचें लांबलचक उत्तर आलें. अगदी हृदयांतील व्यथा त्याच्या भाषेंत व्यक्त होत होती. कांही ठिकाणीं व्यक्त करतां न येणाऱ्या गूढ वेदनांची जाणीव दिसून येत होती. शरच्चंद्राने लिहिलें होतें, की "कमलाकांताशीं झालेलें भांडण मिटणें अशक्य आहे. मी माझ्या जुन्या दोस्ताला दोष देत नाही. पण आम्ही एकमेकांना कधीही भेटतां कामा नये हें त्याचें मत मला मान्य आहे. यापुढील सर्व आयुष्य पूर्ण एकांतवासांत घालवावें असा माझा विचार आहे. तुला सुद्धा माझ्या घरीं मज्जाव झाला, तर आश्चर्य मानूं नकोस किंवा माझ्या मित्रप्रेमाविषयीं शंकाही घेऊं नकोस. माझा हा दुःखाचा, कष्टाचा मार्ग मला एकटयालाच आक्रमूं दे. कोणती शिक्षा मी माझ्यावर ओढवून घेतली आहे, मी कोणत्या भयंकर संकटांत सांपडलों आहें, त्याचा मला उच्चारही करणें शक्य नाही. मी पाप्यांतला पापी आहें, पण पाप करण्यांत माझा नंबर जसा पहिला आहे तसा त्याचें प्रायश्चित भोगण्यांतही मी पहिलाच राहीन. हड्डी नरम करणारे इतके भयंकर हाल सहन करण्याचा प्रसंग ह्या जगांत येऊं शकतो याची मला कल्पना नव्हती. माझें हें दुःख हलकें करण्याकरितां, मनोहर ! तूं फक्त एकच गोष्ट कर; माझ्या एकांतवासाचा भंग करूं नकोस." मनोहरपंत तर आश्चर्यानें थक्क झाले. कृष्णरावांचें दुष्ट दडपण नाहीसें झालें होतें. डॉ. शरच्चंद्र आपल्या नेहमीच्या व्यवहारांत निमग्न झाले होते. मित्रमंडळींत आनंदानें मिसळूं लागले होते. एकाच आठवडयापूर्वी सर्वत्र आनंदाचें वातावरण भरून राहिलें होतें व भावी मानसन्मानाची आशा वाटूं लागली होती. आणि आज पहावें तों मित्रांचें प्रेम, मनाची शांति, जीवनांतील उत्साह हे सर्व एका क्षणांत पाण्यावरील बुडबुडयाप्रमाणें नाहीसे झाले होते ! कांहीही पूर्व सूचना नसतांना इतका मोठा बदल घडून आला, तेव्हा शरच्चंद्राला वेड लागलें असावें अशी

त्यांना शंका आली. पण कमलाकांताचे उद्‌गार व वागणूक पाहतां दुसरें कोणतें तरी अधिक खोल कारण असलें पाहिजे असेंही वाटूं लागलें.

दुसऱ्या आठवड्यांत डॉ. कमलाकांत अंथरुणाला खिळले आणि एका पंधरवड्याच्या आंतच कालवश झाले.त्यांचा मृत्यु झाला त्याच दिवशीं रात्रीं मनोहरपंत आपल्या कचेरीच्या खोलींत गेले, आणि दार बंद करून घेऊन त्यांनी पेटींतून एक लिफाफा बाहेर काढला. त्यांचे दिवंगत मित्र डॉ. कमलाकांत यांनीं स्वहस्ताने त्यावर पत्ता लिहून सील केलें होतें. "**अगदी खासगी.** मनोहरपंत वकील यांचेखेरीज दुसऱ्या कोणीही फोडूं नये आणि माझ्या पूर्वी ते कालवश झाल्यास **न वाचतांच जाळून टाकावें.**" स्वच्छ व जाड अक्षरांत हा मजकूर त्यावर लिहिलेला होता. तें पत्र फोडण्याचीही वकिलांना भीति वाटूं लागली. त्यांच्या मनांत विचार येऊं लागला, "आज एक मित्र तर मला सोडून गेलाच. न जाणों, ह्या पत्रामुळे दुसराही मला अंतरला तर !" पण अशी शंका घेणें म्हणजे आपल्या मित्रनिष्ठेला बट्टा लावणें होय असें वाटून त्यांनी तें पत्र फोडलें. त्या लिफाफ्याच्या आंत तसाच सीलबंद केलेला दुसरा लिफाफा होता आणि त्यावर पुढील मजकूर लिहिला होता– "डॉ. शरच्चंद्र यांचा मृत्यु झाल्याशिवाय किंवा ते नाहीसे झाल्याशिवाय फोडूं नये." मनोहरपंतांचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. होय, "नाहीसे झाल्याशिवाय" असेंच लिहिलें होतें. त्या वेडेपणाच्या मृत्युपत्राप्रमाणे (तें मृत्युपत्र त्यांनी पूर्वीच त्याच्या मालकाला परत केलें होतें ) येथेही नाहीसें होण्याचा स्पष्ट उल्लेख होता आणि डॉक्टर शरच्चंद्र हे शब्द कंसांत घातले होते. पण मृत्युपत्रांत कृष्णरावाच्या दुष्ट सूचनेवरून असा उल्लेख करण्यांत आला होता. कोणत्या भयंकर उद्देशाने तें कलम तेथे घालण्यांत आलें होतें तें स्पष्ट दिसत होतें. पण कमलाकांताने स्वहस्ताने हें वाक्य लिहिलें होतें त्याचा हेतु काय असावा ? तेथे लिहिलेल्या अटीकडे दुर्लक्ष करून एकदम त्या गुप्त रहस्याचा ठाव पहावा अशी एक तीव्र जिज्ञासा त्या लिफाफ्याचे ट्रस्टी मनोहरपंत यांना वाटूं लागली. पण आपल्या पेशाची परंपरा आणि मृतमित्राने टाकलेला विश्वास हीं बंधनें तोडणें अशक्य झालें; आणि तिजोरीच्या अगदी तळच्या कप्प्यांत तें पाकिट त्यांनी ठेवून दिलें.

पण जिज्ञासा दाबून टाकणें निराळें आणि तिच्यावर जय मिळविणें निराळें. त्या दिवसापासून आपल्या या अखेरच्या उरलेल्या मित्राचा सहवास आपणांस लाभावा याविषयीं त्यांना पूर्वीइतकी उत्सुकता वाटत होती की नाही याबद्दल शंकाच आहे. त्याच्यावरचें त्यांचें प्रेम होतेंच, पण त्यांचें चित्त अस्वस्थ असे, त्यांना एक प्रकारची भीतीही वाटे. त्यांची गाठ घेण्याकरितां ते अवश्य जात, पण गाठ पडली नाही म्हणजे एक प्रकारचें समाधानही त्यांना वाटे. आपल्या घराचा स्वेच्छेने तुरुंग बनवून त्यांत एकांतवासांत राहणाऱ्या त्या अगम्यचरित मित्राच्या शेजारीं बसून गप्पा मारण्याची त्यांना एक प्रकारची धास्ती वाटे; त्यापेक्षा दरवाजांत उभे राहून, मुंबईंतील चोहोकडे चाललेली गडबड व धावपळ पाहत विठोजीशीं दोन गोष्टी बोलणें त्यांना अधिक आवडे. आणि विठोजी तरी त्यांना अशी काय मोठी आनंदाची बातमी सांगणार होता ? प्रयोगशाळेच्या वरच्या खोलीच्या बाहेर येण्याचें डॉ. शरच्चंद्रांनी जवळ जवळ सोडूनच दिलें होतें. केव्हा केव्हा तर रात्रींही ते तेथेंच निजत. त्यांचें चित्त अगदीं उदास झालें होतें, संभाषण तर ते कोणाशींही करीतच नसत. वाचनसुद्धा त्यांनी सोडून दिलें होतें. त्यांच्या मनावर कोणत्या तरी भयंकर चिंतेचें दडपण पडलेलें दिसत होतें. ह्या ठराविक स्वरूपाच्या बातम्या रोजच्या रोज ऐकून मनोहरपंतही कंटाळले आणि डॉ. शरच्चंद्रांच्या घरीं त्यांच्या खेपाही हळूहळू कमी कमी होऊं लागल्या.



## प्रकरण सातवें

# खिडकीखाली झालेली भेट

आज रविवार होता, आपल्या नित्यनियमाप्रमाणे मनोहरपंत श्यामकांताबरोबर फिरावयास निघाले होते; आणि योगायोग असा की आजही त्या पूर्वीच्याच गल्लींतून ते जात होते. अर्थात् त्या परिचित दरवाजासमोर येतांच दोघेही थांबले आणि टक लावून तिकडे पाहूं लागले.

"चला, एक प्रश्न तर निकालांत निघाला" श्यामकांत म्हणाले. "तो गुप्ते कांही पुन: आपल्याला दिसणार नाही."

"तो दिसेल अशी मलाही आशा नाही." मनोहरपंतांनी उत्तर दिलें. 'त्याची माझी एकदा गाठ पडली होती हें मी तुला सांगितलें ना ? त्याला पाहतांच मलाही अगदी तुझ्यासारखाच तिटकारा आला."

"त्याला पाहिलें आणि तिटकारा आला नाही असें घडणेंच अशक्य आहे. पण हें पहा, मला तरी अगदी मूर्खांतच काढलें असेल तुम्ही. हा दरवाजा म्हणजे डॉ. शरच्चंद्राच्या घराचें मागील दार आहे ही मला कल्पनाही नव्हती. बाकी हें सुद्धा मला अखेर समजलें तें कांही अंशीं तुमच्याच नजरचुकीने."

"अस्सें, म्हणजे हें समजलें म्हणावयाचें तुला!" मनोहरपंत म्हणाले. "पण आता तुला समजलें आहेच तर चल जरा पुढे होऊन खिडकीशीं जरा पाहूं तर खरे. खरें सांगूं तुला, मला त्या बिचाऱ्या शरदची फार काळजी वाटते, आणि बाहेरून का होईना, पण एखाद्या प्रेमळ मित्राचा सहवास त्याला मिळाला तर त्याला पुष्कळ बरें वाटेल अशी आपली माझी कल्पना आहे."

ही संध्याकाळची वेळ होती, गार वारा वाहत होता, सूर्यास्त नुकताच झाला होता व आकाशांतील ढगांवर त्याचा रंगीबेरंगी प्रकाश खुलून दिसत होता. दुसऱ्या मजल्यावरच्या तीन खिडक्यांपैकी मधली खिडकी अर्धवट उघडी होती आणि त्याच्या शेजारीं उदास व कष्टी होऊन विचार करीत, हताश झालेल्या कैद्याप्रमाणे बसलेले डॉ. शरच्चंद्र मनोहरपंतांना दिसले.

"ओहो, शरद, शरद" ते ओरडून म्हणाले, "आता तुझी प्रकृति बरी आहे ना ?"

"फारच खालावली आहे ती, मनोहर," डॉक्टर साहेबांनी निराशेने उत्तर दिलें. "अगदीच खालावली आहे. पण देवाच्या दयेने फार दिवस नाही चालणार असें."

"तूं मुळी बाहेरच पडत नाहीस अगदी. जरा हिंडून फिरून थोडी हुशारी आणीत जा. हा श्याम—माझा चुलत भाऊ. आमच्याप्रमाणें झटकून ताजातवाना हो. चल, टोपी घाल, जरा रपेट करून येऊं."

"धन्य आहे तुझी, मनोहर." डॉक्टर उदासपणें म्हणाले, "मला सुद्धा यावेसें वाटतें. पण नको. छेः अगदी अशक्य आहे तें. माझी छातीच होत नाही. पण खरेंच, मनोहर, तूं भेटलास मला किती आनंद झाला! फारच समाधान झालें मला! तुला आणि श्यामकांतांना वरच बोलाविलें असतें मी. पण ही जागा अगदीच योग्य नाही."

"नाही तर नाही. आम्ही येथेच उभे राहतों आणि आहोंत येथूनच बोलूं की तुझ्याशी."

"मी तरी आता अगदी तेंच म्हणणार होतों." डॉक्टर स्मितपूर्वक म्हणाले. पण हे शब्द त्यांनी पुरते उच्चारले सुद्धा नाहीत तोंच त्यांच्या मुखावरील स्मित मावळलें आणि त्याच्या जागीं तीव्र भीति आणि निराशा यांची इतकी भयंकर छाया त्यांच्या मुखावर पसरली की ती पाहतांच खाली उभे असले असलेल्या त्या दोघाही सद्गृहस्थांच्या शरीरांतील रक्त जणूं गोठून गेलें. ती त्यांना नुसती ओझरतीच पाहावयास मिळाली, कारण दुसऱ्याच क्षणीं खिडकी धाडकन् लावली गेली. पण तें ओझरतें पाहिलेलें दृश्यही पुरेसें होतें. दोघेही परत फिरले आणि एक शब्दही न बोलतां तेथून निघाले. त्या गल्लींतून बाहेर पडेपर्यंत एक शब्दही त्यांनी उच्चारला नाही. कांही वेळाने शेजारच्या मोठ्या रस्त्यावर ते आले, भोवताली मुंबईची नेहमीची गडबड त्यांना दिसूं लागली, तेव्हाच वर मान करून आपल्या दोस्ताकडे पाहण्याची मनोहरपंतांची छाती झाली. त्यांचे चेहरे पांढरे फटफटीत झाले होते. दोघांचीही दृष्टि भीतीने कावरी बावरी झाली होती.

"प्रभू, प्रभू आता तूंच संभाळ." मनोहरपंत म्हणाले.

पण श्यामकांतांनी अगदी गंभीरपणें मान हलवून आपली संमति दर्शविली व एक शब्दही न उच्चारतां ते शांतपणे पुढे चालूं लागले.

---

## प्रकरण आठवें

# अखेरची रात्र

रात्रीची वेळ होती. मनोहरपंतांचें जेवण नुकतेंच झालें होतें आणि आपल्या खोलींत शतपावली करीत ते हिंडत होते. इतक्यांत एकाएकी विठोजीला आलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें.

"कोण विठोजी, का रे? अशा भलत्या वेळीं आलास ? " त्यांनी विचारलें. इतक्यांत त्यांची नजर विठोजीच्या चेहऱ्याकडे गेली. ते एकदम उद्गारले, "आं ! विठोजी ! तुला कांही होतें आहे ? डॉक्टर साहेबांची तबियत का बिघडली आहे ?"

"वकील साहेब, कांही तरी गडबड आहे खास."

"जरा शांत बैस, थोडी विश्रांति घे," मनोहरपंत म्हणाले, "आणि मग सावकाश सांग तुला काय सांगावयाचें आहे तें."

"डॉक्टर साहेब हल्ली कसे वागत आहेत हें तर तुम्हा माहीतच आहे." विठोजीने उत्तर दिलें. "अगदी खोलीच्या बाहेर येत नाहीत. आताशा तर त्या माडीवरच्या खोलींतच त्यांनी स्वतःला कोंडून घेतलें आहे. प्राण गेला तरी मला नाही बरें वाटणार हें. वकीलसाहेब मला भारी भीति वाटते."

"अरे, भल्या गृहस्था, जरा नीट सांग काय तें. कसली भीति वाटते आहे तुला इतकी ? "

मनोहरपंतांच्या प्रश्नाकडे हट्टानें दुर्लक्ष करीत विठोजी म्हणाला, "मला गेले आठ दिवस भीति वाटते आहे साहेब, आणि आता मला अगदी सहन होत नाही तें."

विठोजीच्या भाषेंतील भाव त्याच्या मुद्रेवर स्पष्टपणे उमटला होता. त्याची बोलण्याचालण्याची तऱ्हाही अगदी बदलली होती. आला

तेव्हा त्याने मनोहरपंतांकडे काय एकदा पाहिलें असेल तेवढेंच. त्यानंतर त्याने एकदाही वर मान करून समोर पाहिलें नव्हतें. आता सुद्धा तो विमनस्क स्थितींत बसून राहिला होता व त्याची नजर खोलीच्या एका कोपऱ्याकडे खिळून राहिली होती. पुनः एकदा तो म्हणाला, "छे छे, मला आता अगदी सहन होत नाही तें."

"हें बघ," मनोहरपंत म्हणाले, "तूं इतका घाबरला आहेस तेव्हा कांही तरी कमी जास्त आहे खास. कांही तरी भयंकर गोष्ट घडली असली पाहिजे. मला नीट सांग, काय आहे तें."

"कांही तरी दगा आहे, साहेब."

"दगा!" मनोहरपंत उद्गारले. त्यांना चांगलीच भीति वाटली होती आणि हा मनुष्य स्पष्ट खुलासा करीत नाही त्याची चीडही आली होती. "दगा, कसला दगा! काय म्हणतो आहेस तरी काय तूं?"

"तें मी काय सांगूं साहेब? पण आपण जरा तसदी घेऊन तेथपर्यंत चलतां का?"

एका शब्दानेही उत्तर न देतां मनोहरपंत उठले व त्यांनी कोटटोपी चढविली. हें पाहतांच विठोजीच्या मुद्रेवर केवढें समाधान दिसूं लागलें तें पाहून त्यांना आश्चर्य वाटलें आणि विठोजी सुद्धा न बोलतां तसाच आणि त्यांच्या बरोबर निघाला.

मार्च महिन्याची रात्र होती. चंद्र अस्ताला जाण्याच्या बेतांत असल्याने निस्तेज दिसत होता. जणूं काय वाऱ्याने ढकलल्याप्रमाणें त्याची कोर तिरपी झालेली होती; झिरझिरीत, अर्धवट पारदर्शक वातावरण आड आल्याने त्याचें तेज मंद व अस्पष्ट दिसत होतें. वाऱ्यामुळे एकमेकांचा शब्द ऐकूं येणें कठीण झालें होतें. शिवाय रस्त्यावर तर चिटपाखरूंही दिसेना. जणूं काय धुळीच्या कणांप्रमाणें माणसेंही वाऱ्याबरोबर उडून गेलीं असावीत. मुंबईचे हमरस्ते इतके निर्मनुष्य झालेले मनोहरपंतांनी कधीच पाहिले नव्हते. हे रस्ते इतके निर्मनुष्य नसते तर त्यांना अधिक समाधान झालें असतें. मनुष्याचा सहवास मिळावा, एखादा तरी मनुष्य दृष्टीस पडावा अशी इच्छा त्यांना आज जितक्या तीव्रतेने वाटत होती

तितकी त्यांना साऱ्या आयुष्यांत कधी वाटली नसेल. कांही तरी संकट पुढे वाढून ठेवलें आहे असें त्यांचें मन त्यांना सांगत होतें. जोराचा प्रयत्न करूनही मनाला हतबल करणारा हा विचार त्यांच्या मनांतून जाईना. डॉ. शरच्चंद्रांच्या बंगल्यापाशीं ते येऊन पोचले; वाऱ्याचा जोर अजूनही कमी झाला नव्हता. बागेंतील लहान लहान झाडें आपल्या छोट्या फांद्या त्या लोखंडी कुंपणावर जोरजोराने आपटीत होतीं. विठोजी दोन पावलें त्यांच्या पुढेच होता. फाटकाजवळ येतांच तो थांबला. इतक्या सोसाट्याच्या वाऱ्यांतही त्याच्या कपाळावर चमकूं लागलेले घामाचे बिंदु खिशांतील हातरुमालाने त्याने पुसून काढले. हे घामाचे बिंदु कांही वेगाने चालण्याच्या श्रमाने आले नव्हते. तर त्याच्या अंत:करणांतील भीतीच्या व चिंतेच्या दडपणाचे ते द्योतक होते. त्याचा चेहरा पांढरा व निस्तेज दिसत होता. त्याचा आवाज सुद्धा घोगरा व दु:खी भासत होता.

"अखेर एकदाचे घरीं तर येऊन ठेपलों," तो म्हणाला. "देव करो आणि सगळें सुखरूप असो म्हणजे झालें."

"तथास्तु" मनोहरपंतांनी उत्तर दिलें.

लागलीच विठोजी पुढे झाला आणि हलक्या हाताने त्याने दारावर थाप मारली. कडी काढल्याचा आतून आवाज झाला, कोणी तरी विचारलें, "कोण आहे ? विठोजी, तुम्हीच का ?"

"होय मीच, दार उघड."

दिव्याचा उल्ल प्रकाश दिवाणखान्यांत पसरला होता. थंडीने काकडून एकमेकांच्या अंगावर माना टाकून पडलेल्या कोकरांप्रमाणे घरांतील सर्व नोकर एका कोपऱ्यांत गोळा झाले होते. मनोहरपंतांना पाहतांच मोलकरीण आनंदाने हातवारे करूं लागली. स्वयंपाकीण काकू तर "देव पावला, मनोहरपंत आले" असें म्हणून धावत इतकी पुढे आली की जणू काय ती आता त्यांना मिठीच मारणार असें दिसलें.

"अरे, तुम्ही सगळे येथे काय करतां ?" मनोहरपंत जरा चिडून म्हणाले. "असा गोंधळ चालविलेला तुमच्या मालकांना मुळीच खपणार नाही."

"सगळे घाबरून गेले आहेत, साहेब." विठोजीने उत्तर दिलें. सर्व स्तब्ध झाले, कोणीच कांही बोलेना. इतक्यांत मोलकरणीने मोठ्याने गळा काढून रडण्यास सुरुवात केली.

"गप बैस ग," विठोजीने तिला दरडावलें. पण त्याचा स्वत:चाच आवाज कापत होता, कारण त्याचें तरी मन कोठें स्थिर होतें ? तो सुद्धा कांही कमी घाबरलेला नव्हता. मोलकरणीने मोठमोठ्याने रडण्याची सुरुवात केलेली पाहतांच, सर्वच नोकर चपापले व कांही तरी भयंकर गोष्ट घडणार अशा भीतीने घाबरून आंतल्या दरवाज्याने पळून जाऊं लागले. विठोजी त्यांतील एका पोराकडे वळून म्हणाला. "आता असें कर, मला एक दिवा आणून दे. आता आम्ही सर्व गोष्टींचा छडा लावतों." इतकें बोलून तो मागील बाजूच्या बगीच्याकडे निघाला आणि मनोहरपंतांनाही तिकडेच चलण्यास त्याने सुचविलें.

"आता साहेब !" तो म्हणाला, "अगदी पाऊल न वाजवितां या. माझें म्हणणें असें आहे की आत काय आहे तें तुम्ही ऐका पण तुम्ही आल्याचें मात्र त्यांच्या कानीं जातां कामा नये. आणि असें पहा साहेब, जर यदाकदाचित् त्यांनी तुम्हांला आत बोलावलेंच तर जाऊं नका."

ही शेवटची अनपेक्षित सूचना ऐकतांच मनोहरपंतांना इतका धक्का बसला की त्यांच्या चित्ताची स्थिरता जवळ जवळ ढळली. पण त्यांनी धीर धरून चित्त शांत केलें आणि त्याच्या मागोमाग त्या प्रयोगशाळेच्या इमारतीकडे ते निघाले. देवदारी खोकीं आणि बाटल्या यांनी भरलेल्या तळमजल्यावरील खोलींतून जिन्याच्या पायथ्याशीं ते आले. तेथे येतांच विठोजीने त्यांना एका बाजूस उभें राहून लक्ष देऊन ऐकण्यास खुणविलें; आपण स्वतः हातांतील दिवा खालीं ठेवला आणि आपलें सर्व धैर्य निर्धाराने एकवटून तो जिना चढून वर गेला व वरच्या खोलीच्या दारावर त्याने हलक्या हाताने भीत भीत थाप मारली.

"साहेब, मनोहरपंत वकील भेटावयास आले आहेत." त्याने वर्दी दिली आणि त्याच वेळीं नीट लक्ष देऊन ऐकण्यास जोराने हात हालवून मनोहरपंतांस पुन: एकदा खुणविलें.

आतून आवाज आला, "त्यांना सांग, की कोणाचीच गाठ घेणें मला शक्य नाही." जरा चिडूनच हें उत्तर दिलें गेलें होतें.

"ठीक आहे साहेब." विठोजीने उत्तर दिलें. त्याच्या आवाजांत थोडी समाधानाची झांक दिसत होती. खाली उतरून त्याने आपला कंदील पुनः उचलला आणि मनोहरपंतांना घेऊन मागील अंगणांतून पुनः पूर्वीच्या दिवाणखान्यांत आला.

"पहा साहेब," मनोहरपंतांकडे टक लावून पाहत तो म्हणाला, "हा आमच्या मालकांचा आवाज आहे काय ?"

"आवाज पुष्कळच बदललेला दिसतो." मनोहरपंतांनी उत्तर दिलें. त्यांचें तोंड उतरलें होतें पण तरीही स्थिरदृष्टीने विठोजीच्या दृष्टीशीं दृष्टि भिडवीत ते पाहत होते.

"बदलला म्हणतां आपण ? तसें म्हणावें पाहिजे तर. पण मी आज वीस वर्षे या घरांत मालकांजवळ आहे आणि मला त्यांचा आवाज ओळखूं येणार नाही ? छे छे साहेब, आमच्या मालकांचा कधीच निकाल झाला आहे. आठ दिवसांपूर्वीच देवाचें नांव घेऊन मालक मोठ्याने ओरडले, तेव्हाच ते आटपले असले पाहिजेत आणि आज जें हें कोण त्यांचें सोंग घेऊन बसलें आहे आणि तें का बसलें आहे, तें . . . . देवाला ठोळे."

"कांही तरी सांगतोस तूं हें विठोजी. खरें तरी वाटेल का कोणाला हें ?" आपलें बोट तोंडांत धरीत मनोहरपंतांनी उत्तर दिलें. "पण समजा, तूं म्हणतोस तसेंच आपण धरून चालूं. समजा की शरदचा—तूं म्हणतोस तसेंच—समजा की—खूनच झाला आहे. पण मग येथें राहण्यांत त्या खून करणाऱ्याचा काय हेतु असावा ? छे ! या कल्पनेंत कांही राम नाही. तर्काला मुळीच पटणारी नाही ही."

"ठीक आहे, वकीलसाहेब. तुमची समजूत पाडणें जरा कठीणच आहे. पण मी सांगतोंच सगळें." विठोजी म्हणाला. "तुम्हांला माहीतच आहे, साहेब, गेल्या सगळ्या आठवडाभर हें जें कोण येथे मालकांच्या खोलींत राहिलें आहे, त्याला रात्रंदिवस कोणत्या तरी एका औषधाचा ध्यास लागला आहे आणि तें औषध कांही त्याला आठवत नाही. आता केव्हा केव्हा आमचे मालकही असें करीत की त्यांना कांही हवें असलें

म्हणजे एका कागदावर लिहून कागद जिन्यावरून खाली टाकून देत. पण गेला आठवडाभर असल्या चिठ्ठ्यांशिवाय आम्हांला दुसरें कामच नाही. हें बंद केलेलें दार आणि आंतून चिठ्ठ्यांचा पाऊस. जेवणाचें ताट वाढून आणलें तरी कोणी पाहत नसेल अशा वेळीं चोरासारखें आत घेऊन जावयाचें. दररोज कधी कधी तर दिवसांतून दोनदोनदा तीन-तीनदा सुद्धा वरून चिठ्ठ्या आणि हुकूम यावयाचे आणि मला मुंबईंतील साऱ्या केमिस्टांचीं दुकानें धुंडीत भटकावें लागावयाचें. मी औषध घेऊन परत आलों न आलों की पुनः दुसरा हुकूम, की आणलेलें औषध परत कर. तें चांगलें नाही, अशुद्धच आहे आणि पुन: दुसऱ्या केमिस्टाकडून दुसरें आणण्याचा हुकूम. कशाकरितां तें औषध हवें असेल तें असो, पण त्याची भयंकर जरूर आहे, साहेब."

"त्या कागदांपैकी एखादा आहे का तुझ्याकडे ? " मनोहरपंतांनी विचारलें. विठोजीने हात खिशांत हात घालून चाचपून पाहिलें व एक चुरगळलेला कागद बाहेर काढला. मनोहरपंतांनी तो दिव्याजवळ धरून काळजीपूर्वक पाहिला. मेसर्स मॉर्गन आणि कंपनी यांच्या नांवाचें खालील मजकुराचें तें एक पत्र होतें.

"आपणांकडून मी जो नमुना मागविला तो फार अशुद्ध आहे व माझ्या हल्ली चालू असलेल्या प्रयोगाला तो निरुपयोगी आहे हें कळविण्यास मला फार दिलगिरी वाटते. इ. स. १९–मध्ये मी आपणाकडून ह्या औषधाचा फार मोठा स्टॉक खरेदी केला होता. त्यापैकी कांही आपणांकडे शिल्लक असेल तर अत्यंत दक्षतेने तपास करून पाहण्याची तसदी घ्यावी आणि सापडल्यास तावडतोब पाठवून द्यावा अशी आग्रहाची विनंती आहे. त्याकरितां कितीही खर्च आला तरी हरकत नाही. त्याची मला हल्ली इतकी जरुरी आहे की त्याचें वर्णन मी शब्दाने करूं शकत नाही...."

येथपर्यंत तें पत्र पुष्कळ व्यवस्थित व शांत चित्ताने लिहिलेलें दिसत होतें. पण लेखकाच्या मनाची चलबिचल यापुढे त्याला आवरतां आली नसावी. कारण त्यापुढील वाक्य टाकाचे भले मोठे वेडेवाकडे फराटे काढून मोठ्या अक्षरांत खरडलें होतें. "देवाच्या नांवाने त्या जुन्या नमुन्यापैकी मला थोडासा तरी पाठवा हो."

" हें पत्र मोठें चमत्कारिक दिसतें." मनोहरपंत म्हणाले. थोड्या वेळानें त्यांनी एकदम विचारलें, " पण हें पत्र तुझ्याजवळ कसें ? "

" त्या कंपनीचा नोकर चिठ्ठी पाहतांच असा चिडला की ती त्याने चोळामोळा करून माझ्या अंगावर भिरकावून दिली."

"पण हें अक्षर डॉक्टरसाहेबांचेंच आहे यांत शंका नाही. तुला ओळखतें ना ? " वकील साहेबांनी उत्तर दिलें.

"होय. त्यांच्यासारखेंच अक्षर दिसतें खरें." थोड्या उदासीनतेने विठोजीने उत्तर दिलें आणि लागलीच निराळ्याच आवाजांत म्हणाला, "पण त्या अक्षराला घेऊन काय करतां ? मी त्याला स्वतःला पाहिला आहे."

" त्याला पाहिला आहे ? म्हणजे ? "

"अगदी बरोबर" विठोजी म्हणाला. "त्याचें असें झालें. मी असाच एकदम बागेंतून ह्या येथे तळमजल्यावर आलों. बहुतकरून तें औषध शोधण्याकरितां किंवा आणखी काय हेतु असेल तो खरा. पण तो येथे गुपचुप शिरला होता. कारण माडीवरचें खोलीचें दार उघडें होतें. आणि त्या पलीकडच्या कोपऱ्यांतील देवदारी खोक्यांपाशीं तो कांही तरी धुंडाळीत होता. मी येतांच त्याने माझ्याकडे पाहिलें आणि एकदम एक किंकाळी फोडून माडीवरच्या खोलींत सटकला. मी त्याला क्षणभरच पाहिला असेल, पण माझ्या डोक्याचे सुद्धा केस ताठ उभे राहिले. जर ते आमचे मालकच असते तर त्यांनी आपलें तोंड असें झाकून कां घेतलें असतें ? आणि मला पाहतांच असे चोरासारखे वर पळून कां गेले असते ? माझे काळधांचे पांढरे झाले या घरांत. आणि मग......" सांगतां सांगतां विठोजी थांबला आणि त्याने एकदा आपल्या कपाळावरून हात फिरवला.

" ही मोठी विचित्र परिस्थिति दिसते सगळी." मनोहरपंत म्हणाले. "पण मला वाटतें आता माझ्याही डोक्यांत थोडाथोडा प्रकाश पडूं लागला आहे. हें पहा, विठोजी, असे कांही रोग असतात की त्यांमुळें रोग्याला शारीरिक वेदना तर होतातच आणि त्याची मुद्राही विद्रूप दिसूं लागते. असाच एखादा रोग डॉक्टरसाहेबांना झाला असावा.

मला वाटतें म्हणूनच त्यांचा आवाज बदलून गेला असावा; म्हणून त्यांनीं तोंड झाकून घेतलें असावें आणि मित्रमंडळीच्या गाठी घेणेंही बंद केलें असावें, आणि तेवढयाचकरितां हें औषध हुडकून काढण्याची त्यांना इतकी आतुरता वाटत असावी. त्या दुर्दैवी प्राण्याला थोडीशी आशा वाटत असेल, की ह्या अमुक औषधाने आपल्याला कायमचा गुण येईल– देव करो आणि त्याची आशा निष्फळ न ठरो. मला आपलें हें असें वाटतें. ही स्थिति सुद्धा मोठी कठीण आहे खरेंच. त्याची कल्पना सुद्धा भयानक वाटते; पण हेंच सरळ आणि स्वाभाविक दिसतें. सर्व गोष्टींची संगति पण स्पष्ट लागते. उगीच अवास्तव भीति बाळगण्याचें कांही कारण दिसत नाही."

विठोजीच्या मुद्रेवर अनेक प्रकारच्या मनोविकारांच्या भिन्न भिन्न छटा दिसूं लागल्या. तो म्हणाला, "साहेब, तुम्ही कांहीही म्हणा, ते कांही माझे मालक नव्हते आणि हेंच खरें आहे. आमचे मालक..." जरा आजू-बाजूला पाहून हलक्या आवाजांत तो पुढे म्हणाला, "आमचे मालक कसे उंचे पुरे देखणे आहेत आणि हा एक उगीच ठेंगणा बुटुक होता." मनोहर-पंत कांही म्हणणार होते, त्यांना थांबवीत तो पुढे म्हणाला, "अहो साहेब, तुम्हाला असें वाटतें काय की वीस वर्षें नोकरी करूनही माझ्या मालकांची ओळख मला पटणार नाही ? रात्रंदिवस मी त्यांना पाहतों, ह्या दारांत उभे राहिले म्हणजे त्यांचें डोकें कोठवर पोचतें हें सुद्धा मला माहीत नाही असें समजतां काय आपण? छे, छे, ते आमचे डॉक्टर साहेब कधीच नव्हत–देव जाणे कोण होतें तें. पण डॉक्टर साहेब नव्हते हें खास. आणि येथे खून झाला आहे अशी माझी तर मनोदेवता सांगत आहे."

"इतकी जर तुझी खात्री असली" मनोहरपंतांनी उत्तर दिलें, "तर त्याची शहानिशा करून घेणें माझें कामच आहे. तुझ्या मालकांचें मन दुखवूं नये असें मला वाटतें हें खरें. ह्या चिठ्ठीचा मग नीट खुलासा होत नाही. कारण त्यावरून तर तुझे मालक अजून जिवंत आहेत असें ठरतें, हेंही खरें, तरीही दार फोडून आंत शिरणें हें माझें कर्तव्य आहे असें मला वाटतें."

"कसें बोललां साहेब, लाख रुपयाची गोष्ट." विठोजी मोठ्यानें म्हणाला.

"आता आला दुसरा प्रश्न–हें काम करावयाचें कोणी?"

"कोणी म्हणजे, तुम्ही आणि मी." विठोजीने बेधडक उत्तर दिलें.

"छान बोललास" वकील साहेबांनी उत्तर दिलें. "आणि याचे परिणाम कांहीही झाले तरी तुझ्यावर कांही येणार नाही हें पाहण्याचें काम माझें."

"येथे ही कुऱ्हाड आहेच, आणि बागेंतील पहार मी तुम्हाला आणून देतों."

मनोहरपंतांनी ती जड व ओबडधोबड पहार आपल्या हातीं घेऊन पेलून पाहिली. विठोजीकडे पाहत ते म्हणाले, "विठोजी, आपण जें काम करणार आहोंत त्यांत थोडासा धोका आहे हें तुझ्या लक्षांत आहे ना?"

"तुम्ही म्हणतां तसें आहे खरें." त्याने उत्तर दिलें.

"तर मग आपण जरा खुल्या दिलाने एकमेकांशीं बोलावें हें बरें. आपल्या दोघांच्याही मनांत जें कांही आहे तें सर्व कांही आपण बोलून दाखविलें नाही. तें सगळें अगदी उघड उघड सांगून टाकूं या. ही जी तोंड झाकून घेतलेली आकृति तूं पाहिलीस तिला तूं ओळखलेंस का?"

"त्याचें असें आहे, तो इतक्या झटदिशीं निघून गेला आणि इतका अंग चोरून चालत होता की मला अगदी खात्रीने सांगतां येणार नाही." विठोजीने उत्तर दिलें. "पण तो गुप्ते–कृष्णराव गुप्ते–असावा असें जर तुम्हांला वाटत असेल तर माझीही समजूत आहे की तो तोच असावा. असें पहा, तो बहुतेक तितकाच उंच होता, आणि त्याच्यासारखाच जलद उडत चालत होता. आणि शिवाय प्रयोगशाळेच्या या मागील दाराने दुसरा कोण येणार? तुम्हाला आठवत असेल साहेब, की तो खून झाला त्या वेळीं सुद्धा त्याचेजवळ येथील किल्ली होतीच! पण येवढ्यानेच काय झालें? ह्या गुप्त्याची व तुमची कधी गाठ पडली होती का?"

"होय एकदा त्याच्याशीं बोलण्याचा प्रसंग मला आला होता."

"मग तुम्हांलाही तें माहीत असेल, आम्हांला सर्वांना तर अनुभव आहेच त्याचा की, त्या माणसांत अशी कांही एक विलक्षण जादू आहे— त्याला पाहिला की शिसारीच येते. ह्यापेक्षा अधिक वर्णन करून मला सांगतां नाही यायचें कसें वाटलें तें. एखादा झटका बसल्यासारखें सगळें अंग गार पडतें; अंगांतून जशी कांही चमक येऊन जाते."

"तूं म्हणतोस तसें मलाही वाटलें खरें." मनोहरपंतांनी उत्तर दिलें.

"वाटलेंच पाहिजे मुळी." विठोजी म्हणाला. "तो तोंड झाकून घेतलेला मनुष्य जेव्हा त्या बाटल्यांमधून माकडासारखी उडी मारून उभा राहिला आणि माडीवर सटकला, तेव्हा माझ्यासुद्धा पाठींतून अशी गार चमक चमकून गेली. आता हें खरें आहे, वकीलसाहेब, की हा पुरावा कांही कोर्टांत चालणार नाही. मला सुद्धा इतका कायदा समजतो. पण माणसाच्याही कांही भावना असतातच ना, अगदी बेलभंडारा उचलून सांगेन मी, की तो कृष्णरावच होता."

"अगदी अस्सें, मला सुद्धा तीच शंका आहे" मनोहरपंत म्हणाले. "त्याच्याशीं दोस्ती केल्याने कांही तरी दुष्परिणाम भोगावे लागणार ही भीति मला वाटतच होती—अगदी खात्रीच होती. होय, खरोखरच तुझें म्हणणें खरें आहे. बिचाऱ्या शरदचा खून झाला आहे हें मला सुद्धा खात्रीने वाटतें. आणि देव जाणे कां तें, पण हा खून करणारा खुनी, त्याचा बळी घेऊन त्याच्याच खोलींत लपून राहिला आहे. आता आमच्याशीं गाठ आहे म्हणावें. त्या सखारामला हाक मार."

बोलावल्याबरोबर सखाराम आला, पण बिचारा भीतीनें अगदी गर्भगळीत झाला होता.

"जरा हुशारी राख सखाराम" वकीलसाहेब म्हणाले. "हा जो संशयाचा खेळ चालला आहे त्याचे परिणाम तुम्हां सर्वांवर झालेले दिसतात. पण त्याचा आता सोक्षमोक्ष करण्याचा आमचा विचार ठरला आहे. हा विठोजी आणि मी माडीचें दार फोडून आत शिरणार आहोंत. जर सर्व कांही सुरळीत पार पडलें तर जो कांही दोष पदरीं येईल तो सहन करण्यास मी खंबीर आहें. पण न जाणों, कांही घोटाळा झालाच किंवा एखादा कुकर्मी मागील दाराने पळून जाऊं लागलाच तर आपली तयारी असावी.

तूं आणि हा बाळू दोघे दोन भक्कम काठया घ्या आणि मागील गल्लींतून प्रयोगशाळेच्या मागील दाराजवळ जाऊन उभे रहा, तुम्ही तेथे जाईपर्यंत आम्ही दहाएक मिनिटें थांबतों.

सखाराम जातांच मनोहरपंतांनी आपल्या घड्याळाकडे पाहिलें. "आता, विठोजी, आपण आपल्या उद्योगास लागलें पाहिजे." असें म्हणून हातांत पहार घेऊन ते मागील दारीं निघाले. चंद्र एका मोठ्या ढगाआड गेला असल्यामुळे सर्वत्र पूर्ण अंधकार पसरला होता. वाऱ्याचा सोसाटा अजूनही जोरांत चालू होता. त्या उंच उंच इमारतींवरून वाहतांना त्याचा लांब, खोल व गंभीर ध्वनि दुमदुमत होता. हातांतल्या कंदिलाची ज्योत एकसारखी वरखाली नाचत होती. हळू हळू ते प्रयोगशाळेच्या तळमजल्यापर्यंत आले आणि त्या इमारतीच्या आडोशानें स्तब्धपणें वाट पाहत उभे राहिले. मुंबईच्या गडबडीचे निनाद चोहोकडे गंभीरपणें घुमत होते; पण त्यांच्या आसपास सर्व शांत होतें. माडीवरच्या खोलींत येरझाऱ्या घालणाऱ्या व्यक्तीच्या पावलांचा आवाजच फक्त त्या स्तब्धतेचा भंग करीत होता.

"असें हें सारा दिवसभर तें फेऱ्या घालीत असतें," विठोजी हलक्या आवाजांत म्हणाला. "आणि बहुतेक सारी रात्र सुद्धा. केमिस्टकडून एखादा नवा नमुना आला म्हणजेच थोडा वेळ काय खंड पडेल तेवढाच. अंतःकरणांत पाप असलें म्हणजे शांतीचें नांव नको! केलेला खून पावलागणिक आठवत असेल ना आता! पण ऐकाच, साहेब, जरा जवळ येऊन पुनः ऐका, अगदां सर्वांगाचे कान करून ऐका, अन् सांगा पाहूं हीं डॉक्टरसाहेबांचीं पावलें आहेत काय?"

पावलें हळू हळू आणि अनियमित पडत होतीं, विशिष्ट प्रकारें हिसके देऊन चालत असल्याचा भास होत होता आणि किती सावकाश पडत होतीं तीं! हें पाऊल कोणीकडे आणि डॉ. शरच्चंद्र यांचें ऐटीने व भारदस्तपणानें पडणारें पाऊल कोणीकडे! मनोहरपंतांनी एक दीर्घ निःश्वास टाकला. त्यांनी विचारलें, "दुसरें कांहीच ऐकू येत नाही का?"

विठोजीने मान हलविली, "होय, मीं एकदा त्याला रडतांना ऐकिलें."

"रडतांना ! तें काय म्हणून ?" मनोहरपंतांचें मन भीतीने एकाएकी चरकलें.'

"एखाद्या बायकोप्रमाणें, नाही तर सत्यानाश झालेल्या पापी जीवाप्रमाणें—रडत होतें तें. जातांना माझ्यासुद्धा हृदयावर असा धक्का बसला की मलासुद्धा रडावेंसें वाटूं लागलें."

इतक्यांत दहा मिनिटें पुरीं होत आलीं. गवताच्या ढिगाच्या खालून एक कुऱ्हाड काढून विठोजीने उचलली, जिन्यावर स्वच्छ उजेड पडेल अशा रीतीने जवळच्याच टेबलावर हातांतील दिवा ठेवून दिला आणि जिना चढून ते वर आले त्यांनी आपला श्वास जवळ जवळ कोंडून धरला होता आणि रात्रीच्या त्या भयाण शांततेंत, खोलीच्या आंत तालावर पडणाऱ्या पावलांचा मंद आवाज अखंड चालू होता.

मनोहरपंत मोठ्याने ओरडून म्हणाले, "शरद, शरद, आज मी तुझी गाठ घेणारच." क्षणभर ते थांबले, पण आंतून उत्तर आलें नाही. "मी तुला आगाऊ सूचना देऊन ठेवीत आहें. आम्हांला नानाप्रकारच्या शंकाकुशंका येऊं लागल्या आहेत आणि मी तुझी गाठ घेणारच घेणार. सरळ मार्गाने पडली तर ठीक, नाही तर आडमार्गाने; तुझ्या संमतीने, नाही तर केवळ दंडेली करून."

"मनोहर,"—आंतून आवाज आला, "देवाशपथ, माझ्यावर एवढी दया कर."

"अरे, हा शरदचा आवाज नाही. हा तर गुप्त्याचा आवाज ! विठोजी, फोड दार."

विठोजीने कुऱ्हाड डोक्यावरून फिरवून जोराने हाणली, त्या धक्क्याने सारी इमारत हादरली, तें पॉलीश केलेलें सुन्दर मजबूत दारही थयथय नाचूं लागलें. घाबरून, केवळ भीतीने गर्भगळीत होऊन फोडलेली भयंकर किंकाळी आंतून ऐकूं आली. विठोजीने पुनः कुऱ्हाड परजली, दाराच्या फळ्या पुनः हादरल्या, चौकट पुनः खिळखिळी झाली. एका मागून एक असे चार घाव घातले; पण लाकूड मजबूत होतें, आणि दाराच्या बोल्टबिजागऱ्याही मजबूत होत्या. अखेर पांचवा घाव घातला,

आंतला बोल्ट तुटून पडला आणि दाराच्या मोडलेल्या फळयांच्या चिरफळयांचा ढीग आंतील बाजूस जमिनीवर पडला.

स्वतःच उत्पन्न केलेल्या गडबडीचा धक्का आणि दार पडल्यानंतर तेथे पसरलेली शांतता यांमुळे किल्ला सर करणारे हे वीर सुद्धा थबकले, थांबले आणि आंत डोकावून पाहूं लागले. त्यांच्यासमोर एक सुंदर खोली दिसत होती, आंतील दिवा शांतपणें जळत होता, शेगडीवरच्या किटलींतील पाण्यांतून मंद सुस्कारा उसासत होता, टेबलाचा एखाद दुसरा खण उघडा पडला होता, वरचे कागद व्यवस्थित मांडले होते आणि स्टोव्हजवळच्या टेबलावर चहाची तयारी दिसत होती. 'किती शांत खोली ही' असेच उद्‌गार पहातांक्षणींच कोणीही काढले असते; रासायनिक द्रव्यांच्या बाटल्यांनी भरलेलीं चकचकीत कपाटें तेथे नसतीं तर मुंबईंतील सर्वसामान्य दिवाणखानाच तो भासला असता.

खोलीच्या बरोबर मध्यभागीं एका मनुष्याचें शरीर पडलें होतें. त्याचे हातपाय विलक्षण आखडले होते आणि त्यांना अजूनही झटके येत होते. पाऊलसुद्धा न वाजवतां ते जवळ गेले आणि प्रेत फिरवून पाहतात तों कृष्णराव गुप्त्याचा चेहरा त्यांनी ओळखला. त्याच्या अंगांतले कपडे त्याच्या शरीराच्या मानाने बरेच सैल होते, डॉक्टर शरच्चंद्राच्याच अंगचे ते होते; त्याच्या तोंडावरच्या शिरा उडत असल्याचा भास होत होता, जणूं काय तो अजूनही जिवंतच आहे असें वाटत होतें. पण प्राण केव्हाच निघून गेले होते. त्याने हातांत घट्ट पकडून धरलेली बाटली आणि त्यांतील औषधाचा हवेंत दरवळून राहिलेला उग्र दर्प यांमुळे मनोहरपंतांची खात्री झाली की त्याने आत्महत्याच केली असावी.

"आपणाला यावयास जरा उशीरच झाला." ते कठोरतेने म्हणाले. शिक्षा करणें किंवा वाचविणें कांहीच आता शक्य नाही. आपल्या पापाचा झाडा देण्यास तो देवाच्या घरीं जाऊन पोचला. आता तुझ्या मालकांचें प्रेत कोठे आहे इतकेंच पाहावयाचें राहिलें आहे.

त्या इमारतीच्या तळमजल्याचा बहुतेक भाग त्या मोठ्या हॉलने-दिवाणखान्याने—व्यापला होता; दुसऱ्या मजल्यावर एका बाजूला ही खोली होती आणि त्यांतील खिडक्या मागील गल्लींत उघडत होत्या.

तळमजल्यांतील दिवाणखान्यांतून मागील गल्लींत जाण्यास एक रस्ता होता आणि ह्याच रस्त्याने माडीवरच्या खोलींतून परस्पर जाण्याकरितां दुसरा एक जिना होता. त्याशिवाय दोन तीन लहान खोल्या आणि एक मोठेंसें तळघरही होतें. ह्या सर्व भागाची त्यांनी अगदी कसून तपासणी केली. सर्व खोल्या रिकाम्या असल्याने फक्त नजर टाकण्याचेंच काम होतें आणि दारें उघडतांना वरून इतकी माती पडली की, किती तरी दिवसांत त्या खोल्या उघडल्या गेल्या नसाव्यात हें स्पष्ट दिसत होतें. तळघरांत पुष्कळशी अडगळ व मोडकें तोडकें सामानच भरलेलें होतें आणि त्यांपैकी कांही तर डॉक्टर शरच्चंद्राच्या पूर्वीच्या घरमालकाच्या वेळेपासूनचें होतें. पण त्या तळघराचें दार उघडतांच वरून इतकें भलें मोठें जळमटांचें जाळें त्यांच्या अंगावर पडलें की वर्षांनुवर्षें तो दरवाजा कोणी उघडला नव्हता यांत त्यांना शंका राहिली नाही. अर्थात तेथे अधिक संशोधन करण्यांत कांही अर्थ नव्हता. त्या सगळ्या इमारतींत डॉ. शरच्चंद्राची किंवा त्यांच्या प्रेताची नांवनिशाणी-सुद्धा आढळून आली नाही.

मागील दारीं जाणाऱ्या रस्त्याच्या फरशीवर पाय आपटून पाहून विठोजी म्हणाला, "ह्याच्या खाली प्रेत पुरून टाकलें असावें." पुनः पुनः त्या फरशीवर ठोकून पाहून निघणारा आवाज कोठे पोकळ निघतो आहे की काय हें तो पाहूं लागला.

"नाही तर तो पळून गेला असेल" असें म्हणत मनोहरपंत मागील दरवाजाकडे वळले व त्याची तपासणी करूं लागले. दाराला कुलूप होतें. त्याची गंजून गेलेली किल्ली तेथे जवळच खाली फरशीवर पडलेली त्यांना सापडली.

"ही तर वापरण्यांतली दिसत नाही." किल्ली पाहतांच ते म्हणाले. "वापरण्यांतली ?" विठोजीने उत्तर दिलें. "ही पहा साहेब, ही तर मोडलेली आहे. जणूं काय मुद्दाम आपटून ठोकून मोडल्यासारखी दिसते."

"अरेच्या, आणि हे तुकडेसुद्धा गंजून गेलेले दिसतात." दोघेही एकमेकांकडे टकमका पाहूं लागले. "अक्कल काम करीत नाही. विठोजी चल आपण पुनः वरची खोली तपासूं."

एक शब्दही न उच्चारतां ते पुन: जिना चढून वर आले, जातां जातां त्या प्रेताकडे एक ओझरती नजर टाकली आणि त्या खोलींतील सामानाची तपासणी अधिक कसोशीने करण्यास त्यांनी सुरुवात केली. एका टेबलावर नुकताच एखादा रासायनिक प्रयोग केला असल्याचीं चिन्हें दिसत होतीं, कांचेच्या तबकड्यांतून वजन करून घेतलेल्या एक प्रकारच्या पांढऱ्या क्षाराचे ढीग पडले होते, जणू काय एखादा प्रयोग करीत असतांनाच त्या दुर्दैवी प्राण्याचा अंत झाला असावा.

"त्यांना मी नेहमी आणून देत असें तेंच हें औषध," विठोजी म्हणाला. त्याचें हें बोलणें चाललें आहे तोंच शेजारच्या शेगडीवरील किटलींतील पाण्याला वेगाने उकळी येऊन पाणी बाहेर सांडू लागलें.

एकदम त्यांचें लक्ष शेगडीकडे गेलें. शेगडीच्या शेजारींच एक ईझीचेअर आणून ठेविली होती, आणि त्यावर बसणाऱ्याच्या सहज हाताशीं येईल अशा बेताने चहाची सर्व तयारी होती. अगदी कपांत साखरसुद्धा तयार होती. शेजारच्या शेल्फांत पुष्कळशीं पुस्तकें होतीं; त्यांपैकीच एक बाहेर काढून चहाच्या कपाशेजारींच उघडून ठेवलेलें होतें. तें एक भक्तिपर, धार्मिक पुस्तक होतें. डॉ. शरच्चंद्रांनी त्या पुस्तकाविषयीं किती तरी वेळा फार आदरपूर्वक उल्लेख केलेला होता. असें असतांनाही त्याच पुस्तकाच्या पाना पानांवर अधार्मिक अपशब्द आणि तेही डॉ. शरच्चंद्राच्या हस्ताक्षरांनी लिहिलेले पाहून मनोहरपंतांना फारच आश्चर्य वाटलें.

खोलीची तपासणी करतां करतां ते दोघे खोलींत असलेल्या भल्या मोठ्या लंबगोल आरशाजवळ आले. त्याकडे नजर जातांच दोघांच्याही मनाला भीतीचा अस्पष्ट व स्वाभाविक धक्का बसला. तो आरसा असा तिरपा करून ठेविला होता की, तक्तपोशीवर नाचणारा गुलाबी प्रकाश, पॉलिश केलेल्या आलमाऱ्यांवर पडलेलीं त्या प्रकाशाचीं शेंकडो प्रतिबिंब आणि त्या आरशांत डोकावून पाहणाऱ्या त्या दोघांच्या निस्तेज व भयभीत मुद्रा, इतकेंच फक्त त्यांत दिसत होतें.

"या आरशाने किती आश्चर्यकारक घटना पाहिल्या आहेत, नाही?" विठोजी हलक्या आवाजांत म्हणाला.

मनोहरपंतांनी त्याच आवाजांत उत्तर दिलें, "पण सर्वांत आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे तो आरसा स्वतःच ! कारण शरदला"–हे शब्द उच्चारतांच त्यांच्या मनाला धक्का बसून ते जरा थांबले; पण आत्मसंयमन करून चित्त स्थिर करून पुढे म्हणाले, "शरदला या आरशाचें येथे काय करावयाचें होतें ?"

"बरोबर आहे तुमचें म्हणणें." विठोजी म्हणाला.

तिकडून ते टेबलाकडे वळले. टेबलावरच्या व्यवस्थित लावून ठेवलेल्या कागदांच्या अगदी वर एक मोठा जाड लिफाफा होता. आणि त्यावर डॉक्टर शरच्चंद्रांच्या हस्ताक्षरांत मनोहरपंतांचें नांव लिहिलेलें दिसत होतें. मनोहरपंतांनी तो घेऊन फोडला तोंच त्यांतून दोनचार लहान मोठे लिफाफे खाली जमिनीवर पडले. सहा महिन्यांपूर्वी त्यांनी डॉक्टरांना परत केलेल्या पहिल्या मृत्युपत्राप्रमाणेंच चमत्कारिक कलमें असलेलें डॉक्टरांचें मृत्युपत्र पहिल्या लिफाफ्यांत होतें. डॉक्टरांचा मृत्यु झाल्यास मृत्युपत्र म्हणून व ते नाहीसे झाल्यास बक्षीसपत्र म्हणून तो कागद समजला जावा असा त्यांत उल्लेख होता; पण कृष्णराव गुप्त्याच्या नांवाऐवजी मनोहरपंतांचें स्वतःचें नांव त्यांत दाखल केलेलें पाहून त्यांना जें आश्चर्य वाटलें तें वर्णन करणें शक्य नाही. त्यांनी विठोजीकडे पाहिलें, पुनः एकदा त्या कागदाकडे पाहिलें आणि अखेर एकदा जमिनीवर पसरलेल्या त्या दुरात्म्याच्या प्रेताकडे नजर टाकली.

"माझें डोकें अगदी सुन्न झालें आहे." ते म्हणाले. "इतके सगळे दिवस ह्याच्या ताब्यांत हे कागद होते, माझ्याविषयीं त्याचें चांगलें मत असण्याचें कांहीच कारण नाही; स्वतःचें नांव काढून टाकलेलें पाहून त्याचें पित्त खवळून गेलें असलें पाहिजे आणि तरीही त्याने हे कागद नाहीसे केले नाहीत ! "

दुसरा कागद त्यांनी उचलला, वर तारीख घातलेली डॉक्टरांच्या स्वतःच्या हातची ती एक चिठ्ठी होती. "अरे विठोजी ! " ते ओरडून म्हणाले, "अगदी आज या खोलींत तो जिवंत होता. इतक्या थोड्या अवकाशांत त्याचें बरेवाईट केलें असण्याचा संभव नाही. तो जिवंत असला पाहिजे, पळून गेला असला पाहिजे. आणि मग पळाला कां ? आणि तसेंच असलें तर ही आत्महत्याच आहे असें आपणाला म्हणतां येईल का?

छे, आपण जपून वागलें पाहिजे. न जाणो तुझ्या मालकावर आपण आणखी एखादें भयंकर संकट ओढवून आणूं."

"पण, साहेब, ती चिठ्ठी तुम्ही वाचीत कां नाही ?" विठोजीने विचारलें.

"कारण मला भीति वाटते." मनोहरपंतांनी गंभीरपणें उत्तर दिलें. "पण देवाच्या दयेने भीतीचें कांही कारण नाही." असें म्हणून ती चिठ्ठी उलगडून त्यांनी डोळ्यांसमोर धरली आणि वाचूं लागले:—

"प्रिय मित्र मनोहर,

"ही चिठ्ठी तुझ्या हातांत पडेल त्या वेळेस मी नाहीसा झालों असेन, पण कोणत्या परिस्थितींत तें आगाऊ सांगण्याइतकी दीर्घ दृष्टि मला नाही. माझ्या अंतःस्फूर्तीलाच तसें वाटतें आणि ज्या अवर्णनीय परिस्थितींत मी सांपडलों आहें त्यावरूनही मला वाटूं लागलें आहे, की माझा विनाशकाल निश्चित आहे आणि तो लवकरच घडून येईल. तूं आता जा; कमलाकांताने मला बजावलें होतें की सर्व सविस्तर वृतांत लिहून मी तुला देणार आहें त्याने लिहिलेली ती हकीगत वाच; आणि अधिक ऐकण्याची तुझी इच्छा असेल तर माझ्या आत्मनिवेदनावरून तुला ती कळून येईल.

तुला न शोभणारा तुझा दुर्दैवी मित्र,
शरच्चंद्र."

"यासोबत तिसरा एक लिफाफा होता ?" मनोहरपंतांनी विचारलें.

"हा येथे पडला आहे." असें म्हणून खाली पडलेलें एक भलें मोठें जाडु सीलबंद पाकीट विठोजीने त्यांच्या हातीं दिलें.

मनोहरपंतांनी तें तात्काळ खिशांत घातलें. "मी या कागदाविषयीं कांहीच सांगत नाही. तुझे मालक पळून गेलेले असोत किंवा त्यांचा मृत्यू झालेला असो, आपण निदान त्यांची अब्रू तरी वाचवूं. आता दहा वाजले आहेत. घरीं जाऊन हे सर्व कागदपत्र मला शांतपणें पाहिले पाहिजेत. बारा वाजण्याच्या आंत मी परत येतों आणि आपण पोलिसांत वर्दी देऊं."

ते तेथून निघाले, खाली येऊन त्यांनी प्रयोगशाळेला कुलूप घातलें. सर्व नोकर दिवाणखान्यांत एकत्र जमले होते, त्यांना तेथे तसेच सोडून, बुधा सर्व गुप्त रहस्याचा उलगडा करणारे ते दोन वृत्तांत वाचण्याकरितां मनोहरपंतांनी आपल्या कचेरीचा रस्ता धरला.

---

## प्रकरण नववें

# कमलाकांताने लिहिलेला वृत्तांत

कमलाकान्ताने आपल्या मृत्यूपूर्वी पाठविलेला लिफाफा फोडून त्यांतील मजकूर मनोहरपंत वाचूं लागले. मजकूर पुढीलप्रमाणें होता.

' चार दिवसांपूर्वी, जानेवारीच्या नवव्या तारखेला, संध्याकाळच्या डाकेने मला एक रजिस्टर्ड पत्र आलें. त्याच्या पत्त्यावरचें हस्ताक्षर माझा व्यवसायबंधु व जुना दोस्त शरच्चंद्र याच्या हातचें होतें. हें पाहतांच मला पुष्कळच आश्चर्य वाटलें, कारण एकमेकांशीं पत्रव्यवहार करण्याची आमची मुळीच पद्धत नव्हती. आदले दिवशीं रात्रींच मी त्याला भेटलों होतों, त्याच्या घरीं जेवायलाच गेलों होतों मुळी; आणि तिऱ्हाइ-तासारखें रजिस्टर्ड पत्र पाठविण्याची त्याला आवश्यकता भासावी अशी कोणती गोष्ट आमच्या परस्पर व्यवहारांत होती याची मला कल्पना होईना. पत्रांतील मजकुराने तर माझें आश्चर्य वाढलेंच. तें पत्र असें होतें–

९ जानेवारी १९–

"प्रिय कमलाकांत,

"तूं माझा अतिशय जुना दोस्त आहेस. केव्हा केव्हा कांही शास्त्रीय प्रश्नांसंबंधीं जरी आपला मतभेद झाला असला, तरी, निदान माझ्या बाजूने तरी आपल्या प्रेमांत अंतर पडलें आहे असें मला वाटत नाही. जर कधीकाळीं तूं मला असें म्हणाला असतास की, 'शरद, माझें जीवित, माझी अब्रू, माझें शहाणपण वाचविणें तुझ्या हातांत आहे,' तर मी माझी सर्व संपत्ति, फार काय माझा डावा हातसुद्धा उतरून ठेवून तुला मदत केल्याशिवाय राहतोंना. कमलाकांत, माझें जीवित, माझी अब्रू, माझें शहाणपण आज तुझ्या हातांत आहे; आज तूं जर मला तोडून टाकलेंस तर माझा सत्यानाश झाला म्हणून समज. ह्या प्रस्तावनेवरून तुला वाटेल की मी एखादें कीर्तीला कलंक लावणारें कृत्य करण्यास तुला सुचवीत आहें. तूं स्वतःच त्याचा निर्णय कर.

"आज रात्रींच्या तुझ्या मत्रं गाठी भेटी (एन्‌गेजमेंट्‌स्‌) रद्द कर,— अगदी एखाद्या बादशहाकडे व्हिजिटला तुला बोलावणें असलें तरी सुद्धा. तुझी गाडी आता दाराशीं तयार असली तर ठीकच, नाही तर एक भाड्याची गाडी कर, पुनः कदाचित पाहण्याची जरूर पडेल म्हणून हें पत्र बरोबर घे आणि सरळ माझ्या घरीं जा. विठोजीला मी कळवून ठेवलें आहेच. एखादा मिस्त्री बोलावून आणून तो तुझी वाटच पाहत बसला असेल. माझ्या खोलीचें दार फोडून तूं एकटाच आंत जा, डाव्या हाताकडील (E अक्षर वर असलेल्या) आलमारीचें दार उघड, त्याला कुलूप असल्यास कुलूप फोड; आणि मग त्या आलमारींतील वरून चवथा (म्हणजे खालून तिसरा) कप्पा, त्यांतील सर्व सामानासह असेल तसा बाहेर काढ. अतिशय त्रास झाल्यामुळे माझें चित्त स्थिर नाही, कदाचित या तपशिलांत चूक तर होत नाहीना अशी मला निष्कारण भीति वाटत आहे. पण जरी चुकत असलों तरीही त्यांतील सामानावरून मला हवा असलेला कप्पा तुला ओळखतां येईल. त्या कप्प्यांत कांही औषधाच्या पुड्या, एक बाटली आणि एक नोटबुक इतक्या जिनसा आहेत. अगदी असेल तसा तो खण तूं काढून घे आणि चौपाटीवरील तुझ्या बंगल्यांत घेऊन ये.

"तुला करावयाच्या कामाचा हा पहिला भाग झाला; आता दुसरा. हें पत्र पोचतांच तूं आपल्या उद्योगाला लागलास, तर मध्यरात्रीच्या कितीतरी पूर्वी तुला परत येतां येईल. पण मी तितकी सवड तुला ठेवतों. एखादी न टाळतां येण्यासारखी अनपेक्षित अडचण उत्पन्न व्हावयाची हें तर एक कारण आहेच; पण दुसरें कारण असें की, त्यानंतर जें काय करावयाचें आहे त्या कामाकरितां नोकरचाकर झोपीं गेल्यानंतरची वेळ जास्त सोयीची आहे. बरोबर रात्रीं बारा वाजतां, तूं आपल्या कन्सल्टिंग रूममध्ये एकटाच बसून रहा, माझें नांव सांगून एक मनुष्य येईल त्याला तूं स्वतः आपल्या हाताने दार उघडून आंत घे आणि माझ्या खोलींतून तूं आणलेला टेबलाचा खण त्याच्या स्वाधीन कर इतकें झालें म्हणजे तूं आपलें काम पार पाडलेंस; मग मी तुला शतशः धन्यवाद देईन. त्यानंतर पांच मिनिटांनी, ह्या सर्वांचा खुलासा करून

घेण्याचा तुझा आग्रहच असेल तर, ही सर्व व्यवस्था करणें किती अगत्याचें होतें हें तुला समजून येईल. ह्या सर्व सूचना तुला विचित्र किंवा वेडेपणाच्या वाटतील, पण त्यांपैकी एखाद्या सूचनेकडे दुर्लक्ष झालें असतें तर माझ्या मृत्यूचें किंवा मला वेड लावल्याचें पाप तुझ्या माथीं कसें आलें असतें हेंही तुझ्या ध्यानीं येईल.

"माझ्या विनंतीचा तूं अव्हेर करणार नाहीस ही मला खात्री आहे. तरीही तसें होण्याची नुसती शंका आली तरी सुद्धा माझें मन खचून जातें, माझा हात थरथर कापूं लागतो. लक्षांत घे, की आज या घटकेला एका अज्ञात, अनोळखी स्थळीं मी बसून राहिलों आहें, कोणाला कधी कल्पनाही करतां येणार नाही अशा तीव्र मानसिक यातनांचा अनुभव घेत आहें. तरीही मला पक्कें माहीत आहे की, मी सांगितलेलें काम जर तूं वेळेवर करशील, तर माझें दुःख एखाद्या कल्पित कादंबरीप्रमाणें हवेंत विरून जाईल. तरी माझ्या प्रिय मित्रा, माझें एवढें काम कर व मला प्राणदान दे.

"तुझा मित्र,

"शरद.

"ता. क. हें पत्र मी बंद सुद्धा केलें होतें, इतक्यांत माझ्या मनांत एक नवीनच भीति उत्पन्न झाली. कदाचित असेंही होईल की, टपाल खात्याच्या गडबडीमुळे उद्या सकाळपर्यंत माझें पत्र तुझ्या हातांत पडणारही नाही. तसें झालें तर, मित्रा कमलाकांता, उद्याच्या दिवसांत तुला जेव्हा सवड सापडेल त्या वेळीं माझें काम कर आणि मध्यरात्रीं पुनः माझ्या मनुष्याची वाट पहात बैस. कदाचित त्या वेळींही प्रकरण माझ्या आटोक्याच्या बाहेर गेलेलें असावयाचें. आणि जर त्या रात्रींही कांही विशेष घडून आलें नाही तर यापुढे शरद तुझ्या दृष्टीस पडत नाही असें पक्कें समज."

पत्र वाचतांच माझी खात्री झाली की माझ्या दोस्ताला वेडच लागलें आहे. पण त्याला खरोखरीच वेड लागलें आहे असें निःसंशय सिद्ध होई-पर्यंत त्याने सांगितल्याप्रमाणें त्याचें काम करणें हें माझें कर्तव्य आहे असें

मला वाटलें. त्याच्या या शब्दजंजाळाचा अर्थच जेथे मला कळेना, तेथे त्याचें महत्त्व खरोखरी किती आहे याचा निर्णय करणें मला कसें शक्य होतें ? पण इतक्या काकुळतीच्या शब्दांनी केलेली विनंती नाकारणें म्हणजे भलतीच जबाबदारी ओढून घेतल्यासारखें होणार होतें. म्हणून मी तावडतोब उठलों, एक गाडी केली आणि सरळ शरच्चंद्राच्या बंगल्यावर गेलों. विठोजी माझ्या येण्याचीच वाट पाहत होता. त्यालाहीं त्याच टपालानें एक रजिस्टर्ड पत्र आलें होतें आणि त्यांतील सूचनेप्रमाणें मिस्त्री व सुतार यांना बोलावून आणण्याकरितां त्याने मनुष्य पाठविलाच होता. आम्ही बोलत आहोंत तोंच ते सुतार मिस्त्री आले आणि आम्ही सर्व मिळून त्या पुराण्या प्रयोगशाळेंत आलों; तुलाही माहीत असेलच की शरदच्या खासगी खोलींत जाण्याचा सर्वांत सोयीचा रस्ता येथूनच आहे. दार भक्कम होतें, कुलूपही उत्कृष्ट होतें; सुतार तर म्हणू लागला की, असलें दार फोडून उघडावयाचें म्हणजे त्रास तर खूपच होईल, पण नुकसानही पुष्कळ होईल. मिस्त्री तर जवळ जवळ निराशच झाला होता; पण हा मिस्त्री कसबी मनुष्य होता आणि अखेर दोन तास मेहनत करून त्याने दार उघडून दिलें. E अक्षराच्या आलमारीचेंही कुलूप काढलें, त्यांतील खण मी बाहेर काढला, त्यांत थोडें गवत वगैरे घालून वर कागद गुंडाळला आणि बरोबर घेऊन चौपाटीवरील माझ्या बंगल्यांत परत आलों.

घरीं येऊन त्या खणांत आहे तरी काय हें मी पाहूं लागलों. औषधाच्या पुड्या व्यवस्थित तयार केल्या होत्या, पण धंदेवाईक केमिस्टची सफाई त्यांत दिसत नव्हती. अर्थात शरच्चंद्राने स्वतःच त्या तयार केल्या होत्या हें उघड होतें. त्यांतील एक पुडी सोडून मी पाहिली; एखाद्या पांढऱ्या रंगाच्या साध्या क्षाराचे ते स्फटिक (Crystals) असावेत असें दिसलें. त्यानंतर बाटलींतील औषध मी पाहूं लागलों. रक्तासारख्या लालबुंद औषधाने ती अर्धीअधिक भरलेली होती. त्याचा वास अत्यंत उग्र होता, त्यावरून मला वाटतें की त्यांत फॉस्फरस व ईथर हीं द्रव्यें असावीत. दुसऱ्या औषधांसंबंधीं मला कांहीच कल्पना होईना. त्यांतील वही साधी, नेहमीच्या पद्धतीची टिप्पणवही होती आणि त्यांत तारखांच्या आकड्यांशिवाय विशेष असें दुसरें कांही लिहि-

लेलें नव्हतें. ह्या तारखा पुष्कळ वर्षांपासून चालत आलेल्या होत्या, पण एक गोष्ट माझ्या लक्षांत आली की, सुमारें वर्षभरापूर्वी त्या एकदम बंद पडल्या होत्या, त्यानंतरची तारीख त्यांत दाखल केलेली दिसत नव्हती. क्वचित ठिकाणीं एखाद्या तारखेपुढे शेरा मारलेला दिसे, बहुश: एखादा शब्दच लिहिलेला असे. एकंदर चारपाचशें तारखांपैकी सहाएक तारखांपुढे 'दुप्पट' हा शब्द लिहिला होता. आणि त्या यादीच्या अगदी सुरवातीस एकदा 'पूर्ण फसला !!!' असा शेरा लिहून त्या पुढे किती तरी उद्‌गार चिन्हें केलेलीं आढळली. या सर्व प्रकारामुळे, माझी जिज्ञासा वाढली खरी, पण निश्चित अशी कांहीच माहिती मला मिळाली नाही. औषधाची एक बाटली, एका क्षाराची पुडी आणि प्रयोग केल्याबद्दलच्या कांहीं नोंदी, इतकीच सामग्री मजजवळ होती. शरदच्या नेहमीच्या अनेक प्रयोगांप्रमाणें या प्रयोगापासूनही कांही फलनिष्पत्ति झालेली दिसत नव्हती. ही सर्व सामग्री माझ्या घरीं असली काय किंवा नसली काय, त्यामुळे माझ्या या लहरी दोस्ताच्या अब्रूवर, शहाणपणावर किंवा जीविता-वर कोणता बरा वाईट परिणाम होणार होता कोण जाणे? त्याचा मनुष्य जर एका ठिकाणीं जाऊं शकतो तर दुसऱ्या ठिकाणीं तो कां जाऊं शकत नाही? आणि समजा कांही अडचण असली तरीही त्याच्या या मनुष्याची गाठ इतक्या गुप्तपणें घेण्याची काय जरूर होती? जों जों मी याचा अधिक विचार करूं लागलों, तों तों माझी खात्री होत चालली की हा सर्व मेंदू बिघडल्याचा परिणाम आहे. माझ्या नोकरांना अर्थात मी थांबवून धरलें नाही, पण प्रसंग आलाच तर आत्मसंरक्षणाची कांही तयारी असावी म्हणून माझा जुना रिव्हॉल्वर भरून मी जवळ ठेवला.

घड्याळांत बाराचे ठोके पुरते थांबलेही नसतील, तोंच माझ्या दारावर अगदी हळूच टिचक्या वाजल्या. मी स्वतः उठून दार उघडलें तों एक ठेंगणासा मनुष्य पोर्चच्या खांबाशीं अंग चोरून उभा असलेला आढळला.

"तुम्ही डॉ शरच्चंद्रांकडूनच आलां आहांत काय?" मी विचारलें.

अगदी हलकेच मान हलवून त्याने "होय" असें उत्तर दिलें; "आंत या" असें मी म्हटल्यावर, त्याने मागे वळून चौकांतील अंधाराकडे शोधक दृष्टीने नीट पाहून घेतलें. बऱ्याच दूरवर हातांतील चोरकंदील उघडा

ठेवून एक पोलिसचा शिपाई चालला होता. त्याला पाहतांच माझा हा पाहुणा दचकला आणि अधिकच घाई करून आंत शिरला.

ह्या सर्व प्रकारामुळे माझें मन त्याच्याविषयीं अधिकच कलुषित झालें ही गोष्ट खरी. माझ्या कन्सल्टिंग रूममध्ये तो आला आणि त्याच्या पाठोपाठ, माझा हात माझ्या पिस्तुलावर ठेवून मीही आलों. तेथील दिव्याच्या प्रकाशात त्याचा चेहरा मला स्पष्ट पाहतां आला. त्याला मी आजपर्यंत कधीही पाहिला नव्हता यांत तर शंका नव्हतीच. तो टेंगणा होता हें मी पूर्वी सांगितलेंच आहे. आणखीही एक अशी गोष्ट माझ्या लक्षांत आली की, त्याच्या मुद्रेवरची भीषण छटा पाहतांच एक प्रकारचा धक्का बसत असे; त्याची प्रकृति उघड उघड अशक्त दिसत असतांही त्याच्या हातापायांची चळवळ खूप जोराने चालत असे ही एक त्याची विशेषता होती. आणि शेवटची—पण कमी महत्त्वाची नव्हे अशी—गोष्ट ही की त्याच्या सहवासांत येणाऱ्या व्यक्तींच्या मनोवृत्तींत अतिशय खळबळ उडून जात असे. तापाच्या सुरुवातीस जसें शरीर गार पडून हीव भरूं लागतें तशींच लक्षणें होऊं लागत आणि त्याच बरोबर नाडीचे ठोकेही अधिक मंद पडूं लागत. त्या वेळेला मला असें वाटलें की, माझ्या विशिष्ट मनोरचनेमुळे, व्यक्तिशः त्याच्याविषयीं प्रतिकूल मत झाल्याने असें झालें असेल, तरीही इतकीं तीव्र लक्षणें दिसून आल्याबद्दल आश्चर्य वाटलेंच. पण आज विचार करतांना वाटूं लागतें की त्याचें कारण फार खोल असावें. मनुष्याच्या मूळ स्वभावाशीं त्या लक्षणांचा संबंध असावा. केवळ तिरस्काराच्या भावनेशीं त्यांचा संबंध जोडण्यापेक्षा मनुष्याच्या मूलभूत, अधिक उदात्त मनोवृत्तीशीं त्यांचा संबंध लावणेंच अधिक तर्कशुद्ध आहे.

त्या मनुष्याने माझ्या खोलींत पाऊल ठेवल्यापासूनच त्याच्याबद्दल माझ्या मनांत एक प्रकारचा उद्वेग व कुतूहल उत्पन्न झालें होतें. त्याचा पोषाकाचा अवतार पाहतांच कोणालाही हसूंच आलें असतें. त्याचे कपडे तसे श्रीमंती थाटाचे व सभ्य होते खरें, पण त्याच्या शरीराच्या मानाने ते किती तरी मोठे होते. पाटलोणीचीं टोकें जमिनीवर लोळूं नयेत म्हणून वर गुंडाळून ठेवावीं लागलीं होतीं. त्याचा कोट तर गुडघ्याच्याही खाली येत होता आणि गळ्याशीं इतका सैल होता की, त्यांतून अर्धे

खांदे सहज उघडे दिसत. आणि आश्चर्य असें की त्याचा हा विदूषकी थाट पाहून मला हसूं तर मुळीच आलें नाही. माझ्यासमोर उभा असलेल्या त्या प्राण्यांत कांही तरी निसर्गविरुद्ध आहे, कांही तरी चुकलेलें आहे असें भासत होतें; त्याला पाहतांच आश्चर्य, उद्वेग, तिरस्कार इत्यादि अनेक भावना एकदम जागृत होत होत्या; त्यामुळे त्याचा हा विचित्र पोषाखही त्या भावनांना पोषकच होत होता आणि हसूं आणण्याऐवजी त्या तिरस्काराच्या भावनांना वृद्धिंगतच करीत होता. त्यामुळे, त्या मनुष्याचा स्वभाव व चारित्र्य यांबद्दल जें कुतूहल मला वाटत होतें त्याच्याच भरीला, त्याचें ठावठिकाण, त्याचें जीवन, त्याची परिस्थिति, व त्याचा समाजांतील दर्जा जाणन घेण्याचीही जिज्ञासा मला वाटूं लागली.

हे सर्व विचार आतां लिहिण्यास मला किती तरी वेळ लागला, पण त्या वेळेला मनांत येण्यास पुरतीं दोन सेकंदेंही लागलीं नसतील. तो गृहस्थ आपल्या उदास उत्साहाच्या भरांत नुसता उड्या मारीत होता.

"तुम्हीं आणलें आहे तें ?" तो मोठ्याने म्हणाला. "घेऊन आलां आहांत ना तुम्ही ?" उत्साहाच्या भरांत तो इतका अधीर झाला होता की त्याने माझ्या खांद्यावर हात सुद्धा ठेवला आणि मला हलवूं लागला.

त्याचा स्पर्श होतांच माझें अंग जणू बर्फासारखें गार झाल्याचा मला भास झाला. लागलीच त्याचा हात मी काढून टाकला. मी त्याला म्हटलें. " जरा थांबा की ! अजन तुमची माझी पुरती ओळख सुद्धां झाली नाही. कृपा करून जरा बसा." असें म्हणून त्याला उदाहरण घालून देण्याकरितां मी माझ्या नेहमीच्या खुर्चीवर बसलों आणि ती मध्यरात्रीची वेळ, त्याच्याविषयीं माझा झालेला पूर्वग्रह व मला वाटत असलेला तिरस्कार, ह्या सर्वांचा माझ्यावर परिणाम झाला होता, तरीही सामान्य रोग्यांशीं वागतांना आम्ही जितकी निर्विकार मुद्रा धारण करून सरळपणें वागतों तसें वागण्याचा शक्य तितका मी प्रयत्न केला.

" डॉक्टर साहेब, मला क्षमा करा" त्याने बऱ्याच सभ्यपणाने उत्तर दिलें. " तुमचें म्हणणें बरोबर आहे. माझ्या अधीरतेने माझ्या सभ्यपणाचीही हकालपट्टी केली. आपले व्यवसायबंधु डॉ. शरच्चंद्र यांच्या सांगण्या-

म्हणून फार महत्त्वाच्या कामाकरितां मी आपणाकडे आलों आहें. मला वाटतें–" इतकें म्हणून तो थांबला, आणि त्याने आपल्या गळयावर हात ठेवला. शक्य तितक्या शांतपणें तो बोलत होता, तरीही वाताच्या झटक्या-प्रमाणें उसळू पाहाणाऱ्या मनांतील ऊर्मि दाबण्याचा त्याचा प्रयत्न चालू होता हें मलाही दिसत होतें. "मला वाटतें, तो खण—"

मला त्याच्या संशयाकुल मनाची कीव आली आणि कदाचित माझ्या वाढत जात असलेल्या जिज्ञासेचीही दया आली असेल.

टेबलामागे, जमीनीवर पडलेला, कागदांत तसाच बांधून ठेवलेला तो खण त्याला दाखवीत मीं म्हटलें, " तो तेथे आहे."

उडी मारून तो उठला, थोडा वेळ थांबून आपल्या छातीवर हात ठेवून उभा राहिला; मनाच्या आवेगामुळे त्याचे दात कटकटा वाजत असलेले मला स्पष्ट ऐकूं येत होते. त्याची मुद्रा इतकी भयंकर दिसत होती की या धक्क्याने तो आता मरणार किंवा त्याला वेड तरी लागणार अशी मला भीति वाटूं लागली.

" जरा शांत व्हा." मी म्हणालों.

माझ्याकडे पाहून त्याने विकट हास्य केलें आणि निराश होऊन एक महत्त्वाचा निर्णय आपण करीत आहोंत अशा जाणिवेने वरचा कागद त्याने काढून टाकला. आंतील वस्तु पाहतांच, पूर्ण समाधानाचा इतक्या मोठ्याने त्याने निःश्वास टाकला की मी तर दिङ्मूढच होऊन गेलों. दुसऱ्याच क्षणीं आपला आवाज पुष्कळच शांत करून तो म्हणाला, "तुमच्या-जवळ एखादा मेझर ग्लास असेलच."

त्याने हसतमुखाने लवून कृतज्ञतेने माझ्याकडे पाहिलें. त्या तांबड्या अर्काचे थोडे थेंब मोजून घेतले आणि एका पुडींतील औषध त्यांत टाकलें. प्रथम त्या मिश्रणाचा रंग तांबूस होता, पण त्या क्षाराचे कण त्यांत विरघळूं लागले तसतसा त्याचा रंग अधिक तेजस्वी होऊं लागला, त्याच्यावर फेस येऊन त्याचें फसफसणें स्पष्ट ऐकूं येऊं लागलें आणि त्यांतून धुरकट वायूच्या लहान लहान लकेऱ्याही निघूं लागल्या. एका क्षणांत एकाएकी तो फुगारा खाली बसला आणि त्या मिश्रणाला प्रथम गर्द जांभळा व हळूहळू अगदी फिका पोपटी रंग आला. हे सर्व फेरबदल

अगदी काळजीपूर्वक तो पाहत बसला होता. तें पाहून झाल्यावर थोडें हसून त्याने पेला टेबलावर ठेवून दिला आणि सूक्ष्म भेदक नजरेने माझ्या-कडे पाहत म्हणाला.—

"आता राहिलेल्या गोष्टी ठरवावयाच्या. तुम्ही थोडा शहाणपणा कराल का? थोडें माझ्या कलाने चालाल का? अधिक चर्चा केल्या-शिवाय हा पेला घेऊन सुखरूप मला तुमच्या घरांतून जाऊं द्याल का? का जिज्ञासेच्या लोभाला तुम्ही पूर्ण बळी पडलां आहांत? पहा, विचार करून उत्तर द्या, कारण तुम्ही जसें सांगाल तसेंच मी करीन. तुमची तशी इच्छा असेल तर तुम्ही आहांत तसे राहाल. तुमच्या ज्ञानांत किंवा शहाणपणांत एका कवडीचीही भर पडणार नाही. अर्थात् मरणप्राय संकटांत सापडलेल्या एका जीवाची सेवा केल्याच्या जाणिवेचें समाधान तुम्हाला लाभेल आणि त्या प्रमाणांत तुमच्या आध्यात्मिक ऐश्वर्यांत भर पडेल हें खरें. पण जर तुमची तशी इच्छा असेल तर येथे, या क्षणीं, या तुमच्या खोलींत ज्ञानाचें एक नवीन क्षेत्र तुमच्या हस्तगत होईल, कीर्ति आणि सामर्थ्य संपादन करण्याचे नवीन मार्ग तुम्हांला खुले होतील; आणि नास्तिकांतल्या नास्तिकालाही थक्क करून सोडणारा चमत्कार पाहून तुमचे डोळे दिपून जातील."

माझें चित्त खरोखरी शांत नव्हतें, तरीही शांततेचा आविर्भाव आणून मी म्हणालों, "तुम्ही सांगतां हें सर्व एक कोडेंच आहे आणि त्याच्यावर माझा विश्वास नाही हें ऐकून तुम्हाला कदाचित आश्चर्यही वाटणार नाही. पण एकाही गोष्टीचा हेतु समजल्याशिवाय मी तुमच्या-करितां इतक्या गोष्टी केल्या आहेत की त्यांचा आता अखेर परिणाम काय होत आहे हें पाहिल्याशिवाय मला राहवत नाही."

त्या गृहस्थाने उत्तर दिलें, "ठीक आहे. कमलाकांत तुला आपल्या प्रतिज्ञा आठवतात ना? यापुढे जें घडत आहे तें आपल्या व्यवसायांतील रहस्य आहे. आजपर्यंत तूं आपल्या अत्यंत संकुचित आणि आधिभौतिक जडवादी मतांना चिकटून राहिला होतास; आध्यात्मिक क्षेत्रांत औषधांचें महत्त्व तूं नाकारलें आहेस, तुझ्यापेक्षा श्रेष्ठ व्यक्तींचा तूं उपहास केला आहेस—तर आता पहा!"

त्याने तो पेला तोंडाला लावला आणि एकाच घोटांत तें मिश्रण पिऊन टाकलें. त्याने एक किंकाळी फोडली, त्याचें डोकें भ्रमण करूं लागलें, थरथर कापून तो पडण्याच्या बेतांत आला. पण टेबलाचा आधार घेऊन त्याने स्वतःला सावरून धरलें, स्थिर व अनिमिष नेत्रांनी टक लावून पाहत श्वा वासून तो उभा राहिला. मी त्याच्याकडे पाहतच राहिलों. इतक्यांत मला वाटतें त्याचें शरीर बदलूं लागलें–तें फुगूं लागलें, त्याचा चेहरा एकाएकीं काळा पडला, त्याची चेहरेपट्टी जणूं काय विरून जाऊन बदलूं लागली–आणि दुसऱ्याच क्षणीं, मी उडी मारून उभा राहिलों, मागे उडून भिंतीला टेकलों. या मायावी राक्षसापासून संरक्षण करण्याकरितांच जणूं काय माझे हात मी वर केले. माझें मन भीतीने पूर्ण ग्रासलें गेलें.

"अरे राम, अरे राम," मी पुनः पुनः ओरडूं लागलों. कारण तेथे माझ्या दृष्टीसमोर–निस्तेज आणि खचून गेलेला, अर्धवट बेशुद्ध असलेला आणि मरण पावल्यानंतर पुनः जिवंत झालेल्या माणसाप्रमाणे हातवारे करीत असलेला–शरच्चंद्र उभा राहिला.

त्यानंतर एक तासभर त्याने मला जें काय सांगितलें तें कागदावर लिहिण्याची मला हिंमत होत नाही. मी जें पाहिलें तें पाहिलें आणि जें ऐकलें तें ऐकिलें इतकेंच. तें पाहून व ऐकून माझें मन विटलें. आणि तरीही तें दृश्य आता माझ्या डोळ्यांपुढून नाहीसें झाल्यानंतर, मी पाहिलें तें सत्यच होतें काय हें मला निश्चित सांगतां येत नाही. माझ्या जीविताच्या मर्मावर आघात झाला आहे. झोप नाहीशी झाली आहे. रात्रंदिवस चोवीसही तास भयंकर भीतीचें भूत माझ्या उरावर बसलेलें मला भासत आहे. माझें आयुष्य सरलें. मला मृत्यु येणार असें मला वाटूं लागलें आहे. तरीही मी पाहिलें त्याच्यावर माझा विश्वास बसत नाही. पश्चात्तापाचे अश्रु गाळीत गाळीतही स्वतःच्या नैतिक अधःपाताचें जें वर्णन त्या मनुष्याने माझ्याजवळ केलें त्याची नुसती आठवण झाली तरीही भीतीने अंगावर काटा उभा राहतो. मनोहर, मी फक्त एकच गोष्ट सांगतों आणि तीही पुरेशी आहे. (तिच्यावर तुझा विश्वास बसत असेल तर पहा.) शरदने स्वतःच मला सांगितलें की, त्या दिवशीं रात्रीं चोरासारखा माझ्या घरांत शिरणारा प्राणी म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून कृष्णराव गुप्तेच होता. सरदार खंडेराव यांचा खून करण्याबद्दल जगाच्या कोन्या-कोपऱ्यांतून ज्याचा जारीने तपास सुरू आहे असा कृष्णराव गुप्ते तो तोच.

कमलाकांत.

---

## प्रकरण दहावें

# शरच्चंद्राचें आत्मनिवेदन

डॉ. शरच्चंद्राने मागे ठेवलेल्या जाड लिफाफ्यांतील मजकूर पुढील-प्रमाणें होता.

माझा जन्म इ. स. १८ . . . मध्ये झाला. भरपूर वडिलार्जित संपत्ति, जात्याच कुशाग्रबुद्धि, सर्वांगीण शिक्षणामुळे आलेला अष्टपैलूपणा, स्वभावतःच उद्योगाची आवड, सहवासांतील शाहण्या व सुशील सज्जनांकडून मानसन्मान व कीर्ति मिळविण्याची उत्सुकता, इत्यादि सर्व सद्गुणांमुळे माझें भावी आयुष्य सुखाने, सन्मानाने जाईल व मी कीर्ति करून नांव कमावून जाईन, अशीच कोणालाही माझ्याविषयीं खात्री वाटली असती. माझ्यांत सर्वांत मोठा असा खरोखर एकच दोष होता. माझा स्वभाव आनंदी, चैनीला हपापलेला होता. पुष्कळांना अशा स्वभावामुळे सुखच झालें असतें; पण समाजांत शिष्ट म्हणून मिरविण्याची माझी जबर महत्त्वाकांक्षा आणि अंगीं असामान्य गांभीर्य राखून लोकांवर छाप पाडण्याची माझी तीव्र इच्छा, यांच्याशीं माझ्या सुखलोलुप वृत्तीचें पटणें कठीण जाऊं लागलें. अर्थात् माझ्या चैनीच्या वासनांची तृप्ति मला गुप्तपणेंच करावी लागे. मी मोठा झालों, विचार करण्याइतकें माझें वय झालें आणि माझी प्रगति व समाजांतील माझें स्थान यांचें जेव्हा मी विचारपूर्वक अवलोकन करूं लागलों, तेव्हा मला आढळून आलें की, माझ्या जीवनांत पूर्ण छद्मीपणा कधीच शिरून गेला होता. माझ्या जीवनाचे परस्परविरोधी दोन निरनिराळे प्रवाह स्वतंत्रपणें वाहूं लागले होते. मला जडलेला स्वच्छंदीपणासारखा दोष जर दुसऱ्यांत असता तर त्यांनी त्याचा टेंभाच मिरविला असता. पण माझ्यापुढे जो उच्च आदर्श मीं ठेविला होता, त्यामुळे मला तर त्याची इतकी लाज वाटूं लागली की, तोच एक मला रोग होऊन बसला आणि त्याच्या पायीं अशा गोष्टी झाकून ठेवण्याचा मी आटोकाट प्रयत्न करूं लागलों. माझी अशी स्थिति झाली ती माझे दोष विशेष गंभीर स्वरूपाचे होते म्हणून नव्हे, तर माझ्या

आकांक्षा उच्च होत्या आणि त्या पूर्ण करण्याचा आग्रही करारीपणा माझ्या अंगीं होता म्हणून. सामान्यत: सुष्ट आणि दुष्ट वासनांच्या योगें द्विधा झालेल्या मनुष्यस्वभावांत त्या द्विविध वासनांचे भिन्न असलेले प्रवाह एकमेकांत मिसळून वाहत असतात. पण माझ्या बाबतींत ह्या दोन प्रवाहांमध्ये फार मोठा बांध घातला गेल्यामुळे ते प्रवाह स्वतंत्रपणें वाहूं लागले. अशा स्थितींत धर्माचा मूळ आधार आणि मनुष्याच्या क्लेशाचें महत्त्वाचें उगमस्थान असलेला जो जीवनाचा खडतर सिद्धांत, त्याच्याविषयीं खोल आणि आग्रहपूर्वक चिंतन करणें मला भाग पडलें. द्विविध जीवन व्यतीत करण्यांत मी इतका पटाईत असलों तरी कोणत्याही प्रकारें मी ढोंगी नव्हतों. माझ्या जीवनाचीं दोन्ही अंगें पूर्ण प्रामाणिकच होतीं. सर्व संयम झुगारून देऊन अनीतिमय जीवनांत मी निःशंकपणें उडी घेत असें त्या वेळीं माझ्याच अंतःप्रवृत्तींना अनुसरून मी वागत असें. त्याचप्रमाणें ज्ञानाचा व्यासंग वाढविण्याकरितां किंवा दु:खी कष्टी जीवांचे क्लेश कमी करण्याकरतां मी जेव्हा रोजच्या सामान्य व्यवहारांत प्रयत्न करीत असें त्यावेळीं-ही माझ्याच अंतःप्रवृत्तींना अनुसरण्यांत माझ्या अंगीं कांही कमी उत्कटता होती असें नाही. आणि घडलें असें की, माझ्या शास्त्रीय संशोधनाची दिशा सामान्यतः गूढ व अगम्य अशा आध्यात्मिक तत्त्वांच्या मागे लागण्याची असल्यामुळे त्याच्या योगाने माझ्या अंतःकरणांतील मनोवृत्तींत चाललेल्या या सनातन युद्धाच्या जाणिवेवर स्वच्छ प्रकाश पडला. दिवसामागून दिवस जाऊं लागले आणि माझ्या चित्तांतील नैतिक व बौद्धिक अशा दोन्ही दृष्टींनी विचार करतां, मी, हळूहळू पण निश्चितपणें, सत्याच्या जवळ जवळ येऊं लागलों आणि ह्या अपूर्ण व अर्धवट शोधामुळेच आज हा भयंकर कडेलोट करून घेण्याचें माझ्या नशिबीं आलें आहे. तें सत्य असें की मनुष्याची मनोवृत्ति खरोखरी एकमुखी नाही, तर ती द्विविध आहे. मी द्विविध म्हणतों, कारण माझ्या स्वतःच्या ज्ञानाची धाव अजून यापेक्षा पुढे गेलेली नाही. माझ्या मागून दुसरे संशोधक येतील आणि ते याच दिशेने माझ्याही पुढे जातील. माझा तर्क असा आहे की, मनुष्य अनेक प्रकारच्या, परस्परविरोधी व स्वतंत्र अशा अनेक जीवनप्रवृत्तींचें एक संस्थानच आहे. माझ्या स्वतःपुरतें बोलावयाचें तर, माझ्या जन्मस्वभावाला

अनुसरून मी एकाच, फक्त एकाच दिशेने न चुकतां प्रगति करीत होतों. मनुष्याचें जीवन, नैतिकदृष्टया मूलतः अगदी पूर्णपणें द्विविध आहे हें माझ्या स्वतःच्या वरूनच मला स्पष्ट दिसून आलें. माझी खात्री झाली की माझ्या चित्तरूपी रणांगणावर युद्ध करणाऱ्या या दोन्ही वृत्तींपैकी एका वेळेला खरोखर एकीशींच माझें तादात्म्य झालें आहे असें जरी म्हटलें तरी मूलतः या दोन्ही वृत्तींत मीच व्यापून राहिलों आहें. फार पूर्वीपासून, माझ्या शास्त्रीय संशोधनामुळे असा चमत्कार घडवून आणण्याची शक्यता निःसंदिग्धपणें दिसूं लागण्याच्याही पूर्वीपासून, या दोन वृत्तींना भिन्न करण्याचा विचार करणें, त्या भिन्न वृत्तींचें चित्र कल्पनाचक्षूंपुढे उभें करून त्या कल्पनेचें कौतुक करणें, यांत मला असामान्य गोडी वाटूं लागली होती. जर प्रत्येक वृत्तीला अनुरूप असें स्वतंत्र व्यक्तित्व देतां आलें तर जीवनांतील किती तरी असह्य क्लेश कमी करतां येतील. अविवेकी वृत्तीला आपला मार्ग मोकळा होईल, तिच्या न्यायनिष्ठ सहचारिणीच्या स्वाभाविक आकांक्षा आणि पश्चात्ताप यांचा तिला अडथळा होणार नाही, विवेकी मनोवृत्तीलाही आपल्या उन्नतीच्या मार्गाने सतत आणि सुरक्षितपणें जातां येईल, सत्कृत्यें करण्यांत तिला मिळणारें स्वाभाविक समाधान मिळवितां येईल आणि खरोखरी परक्या असलेल्या त्या दुसऱ्या मनोवृत्तीमुळे भोगावी लागणारी मानहानि व उद्वेग तिच्या वाट्यास येणार नाहीत. ह्या दोन विरोधी वृत्तींची मोट एकत्र बांधणें, उत्तर दक्षिण ध्रुवांइतक्या विरुद्ध असलेल्या ह्या जुळ्या मनोवृत्तींनी मनुष्याच्या चित्तांत अखंड झगडा चालवून मनुष्याला कष्टी करून सोडणें, हा मनुष्यजातीला खरोखर एक शापच आहे. तर मग त्यांना वेगळें करावयाचें कसें ?

माझ्या विचारांची परंपरा येथपर्यंत आली, इतक्यांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें माझ्या शास्त्रीय प्रयोगांनी या विषयावर नवाच प्रकाश पाडला. आपण जो देह धारण करून समाजांत वावरतों तो देह आपणांस इतका घन व स्थूल दिसतो खरा; पण वास्तविक त्याचें स्वरूप अस्थिर व अजड आहे, धुक्याप्रमाणें विरल व सूक्ष्म आहे, ही गोष्ट मला अधिक उत्कटतेने प्रतीत होऊं लागली. आजपर्यंत ती इतक्या स्पष्टपणें

कोणीही सांगितली नव्हती. वाऱ्याने तंबूच्या कनाती उडून जाव्यात त्याप्रमाणें आत्म्याच्या या पार्थिव वस्त्रालाही झाडून उडवून लावण्याचें सामर्थ्य असणाऱ्या कांही द्रव्यांचा मला शोध लागला. माझ्या या आत्मनिवेदनांत माझ्या शास्त्रीय शोधांचें अधिक स्पष्टीकरण करण्याची माझी इच्छा नाही त्याचीं दोन कारणें आहेत. एकतर असें की, आपल्या जीवनाचें हें ओझें मनुष्याच्या पाठीवर कायमचें लादलेलें आहे; तें फेकून देण्याचा आपण जों जों प्रयत्न करूं, तों तों त्याचें दडपण उलट अधिक तीव्र व अधिक भयंकरच होत जातें, असा मला अनुभव आला. दुसरें असें की, दुर्दैवाने—आणि ही गोष्ट माझ्या या हकीकतीवरून अगदी स्पष्ट दिसून येत आहे—माझे शोध अपूर्ण आहेत. मी फक्त इतकेंच सांगतों की, ज्या शक्तिसमुच्चयाला आपण आत्मा म्हणतों त्या आत्म्याच्या भव्य, तेजस्वी व प्रभावी शक्ति निराळ्या आणि जड शरीर निराळें, याची मला स्पष्ट ओळख पटली. इतकेंच नव्हे तर असेंही एक द्रव्य मी तयार करूं शकलों की, ज्याच्या योगाने या प्रभावी शक्तींना त्यांच्या श्रेष्ठ स्थानापासून आपण पदच्युत करूं शकतों आणि स्वत: दुसरेंच एक शरीर व रूप धारण करूं शकतों. माझ्या चित्तांतील हीन वृत्तींची छाप त्या शरीरावर पडली असली, त्या तेथे व्यक्त होत असल्या तरीही, माझ्या पूर्वीच्या शरीरापेक्षा ह्या शरीराविषयीं मला कमी आत्मीयता वाटत होती, असें मात्र नव्हे.

माझ्या या उपपत्तीचा प्रत्यक्ष प्रयोग करून तिची प्रतीति पाहण्यापूर्वी माझें मन पुष्कळ दिवस साशंक व अस्थिर होतें. जीवाच्या जोखमीवर मी हे प्रयोग करीत आहें याची मला जाणीव होती. कारण मनुष्याच्या व्यक्तित्वाचा हा अभेद्य दुर्गही चाळवून हादरून टाकण्याइतकें ज्या द्रव्यांत सामर्थ्य होतें, त्याचें प्रमाण थोडेसेंही जास्त झालें किंवा प्रयोग करून पाहतांना थोडेंसेंही दुर्लक्ष झालें तर ज्या जड शरीरांत रूपांतर घडवून आणण्यास मी पहात होतों, तें हें क्षुद्र व विनाशी शरीर कायमचें नाहीसें झालें असतें. पण या अद्वितीय व गंभीर स्वरूपाच्या शोधाचा मोह इतका होता की, अखेर त्याच्यापुढे या धोक्याच्या सूचनांचा टिकाव लागला नाही. माझें मिश्रण मीं केव्हाच तयार करून ठेविलें होतें.

आता फक्त एकाच महत्त्वाच्या औषधाची आवश्यकता होती. तें औषध एका केमिस्टच्या दुकानांतून मोठ्या प्रमाणांत मीं खरेदी करून आणलें; आणि एका दुर्दैवी रात्रीं तीं द्रव्यें मीं एकत्र मिसळलीं. पेल्यांत उठणारे त्यांचे बुडबुडे व निघणाऱ्या वाफा पाहिल्या आणि त्यांचा फेस विरून गेल्यावर होतें नव्हतें तें सर्व धैर्य एकत्र करून तें औषध मीं पिऊन टाकलें.

सर्व शरीरांतील नाड्या तटातट तुटूं लागल्या, हाडें कसकसू लागलीं, पोटांत मळमळूं लागलें. मन इतकें घाबरलें की, जन्माच्या किंवा मृत्यूच्या प्रसंगीही इतकी भीति कोणाला वाटत नसेल. पण हे क्लेश लागलीच कमी झाले आणि एखाद्या मोठ्या दुखण्यांतून उठल्याप्रमाणें मी हुशार होऊन उभा राहिलों. मला अगदी नवीन प्रकारच्या, विचित्र व अवर्णनीय संवेदना होऊं लागल्या; त्यांच्या नावीन्यामुळेच त्या नितांत रमणीय व मधुर वाटूं लागल्या. माझें शरीर तरुण, हलकें व आनंदी वाटूं लागलें. मनांत एका प्रकारच्या बेफाम अविचारीपणाची जाणीव होऊं लागली, विषयसुखाच्या अव्यवस्थित व काल्पनिक चित्रांचे प्रवाह एखाद्या गिरणीतील चक्रांप्रमाणें माझ्या कल्पनाचक्षूंपुढे वेगाने धावूं लागले. जबाबदारीचीं बंधनेंही मी विसरून गेलों. माझ्या जीवाला एक प्रकारची अज्ञात पण पापी स्वैरता प्राप्त झाल्याचें मला भासूं लागलें. माझ्या या नवीन जीवनाचा आरंभ होतांच माझी वृत्ति दुष्ट झाल्याचें, दसपटीनें अधिक दुष्ट झाल्याचें व माझ्या मूळच्या पापी वृत्तीचा मी दास झाल्याचें मला आढळून आलें. आणि त्या वेळेपुरता तरी, ह्या विचाराने मला एक प्रकारचा उन्मत्त उत्साह, उन्मादक आनंद वाटूं लागला. ह्या नवीन भावनांच्या प्रफुल्लतेच्या भरांत मीं आनंदाने हात वर केले; आणि असें करतांना पाहतों तों माझी उंचीही कमी झाल्याचें मला एकदम आढळून आलें !

त्या वेळीं माझ्या खोलींत आरसा नव्हता. ही हकीकत लिहीत असतांना माझ्या शेजारीं जो हा आरसा दिसत आहे तो मागाहून येथे खास व रूपांतराच्या प्रयोगाकरितांच आणलेला आहे. रात्र संपत येऊन पहाटेचा सुमार होऊं लागला होता—काळोख बराच होता, तरीही पहाट संपून अरुणोदयाची तयारी होऊं लागली होती—माझ्या घरांतील सर्व

माणसें गाढ निद्रेंत निमग्न झालीं होतीं; आशेच्या आणि विजयाच्या उत्साहाने माझें हृदय उचंबळून आलें होतें. अशा स्थितींत मी माझ्या या नव्या अवतारांत माझ्या निजण्याच्या खोलीपर्यंत मजल मारण्याचा निश्चय केला. मीं अंगण ओलांडलें, आकाशांतील तारका माझ्याकडे टक लावून आश्चर्याने पाहूं लागल्या; आपल्या अनिमिष लोचनांनी युगानुयुगें अत्यंत जागरूकतेने निहाळत असतांही माझ्या जातीचा प्राणी त्यांना आजपर्यंत दिसला नसावा. माझ्या स्वतःच्या घरांतच मी आगंतुक ठरलों. चोर पावलांनी मी व्हरांड्यांतून चालू लागलों आणि माझ्या खोलींत येऊन तेथील आरशांत कृष्णराव गुप्तेच्या अवताराचें प्रथम दर्शन मीं घेतलें.

या ठिकाणीं जीं विधानें मी करीत आहें ती केवळ तात्त्विक स्वरूपाचींच आहेत. मी जें सांगतों आहें त्याच्याविषयीं मला निश्चित ज्ञान आहे असें नाही, फक्त तीं खरीं असण्याचा बराच संभव आहे इतकेंच. माझ्या स्वभावांतील दुष्ट वृत्तींना मनसोक्त विहार करण्याचें सामर्थ्य मीं आता बहाल केलें होतें. पण ज्या सद्वृत्ति मी सोडून दिल्या होत्या, त्यांच्यापेक्षा या दुष्ट वृत्ति कमी जोरदार होत्या, त्यांची जोपासनाही कमी झालेली दिसत होती. शिवाय कसेंही असलें तरी, माझें जीवन नव्वद हिश्शांनी सद्गुण संपादन करण्यांत व आत्मसंयमनाचा प्रयत्न करण्यांत गेलें असल्याने त्या वृत्तींचा विकास होण्यास पुरेसा वावही मिळाला नव्हता आणि त्यांची शक्तीही फारशी खर्च झालेली नव्हती. म्हणून मला वाटतें की, कृष्णराव गुप्ते हा डॉक्टर शरच्चंद्रापेक्षा पुष्कळच ठेंगणा, किडकिडीत व तरुण होता. एकाच्या मुद्रेवर सद्गुणांचें तेज विलसत होतें, तर दुसऱ्याच्या मुद्रेंत मूर्तिमंत दुष्टपणा वास करीत होता. शिवाय याच दुष्ट वृत्तींची (मनुष्याचा अंतिम नाश घडविणाऱ्या याच वृत्ति आहेत अशी माझी खात्री आहे, त्या वृत्तींची) छाप शरीरावर पडून तेंही विद्रूप व ऱ्हासाच्या पंथाला लागलेलें दिसे. आणि तरीही मी जेव्हा तें आरशांत पडलेलें माझें विद्रूप प्रतिबिंब पाहिलें तेव्हा मला त्याचा तिटकारा वाटला नाही तर उलट मी आनंदाने नाचूं लागलों. हा सुद्धा मीच होतों. तें नवीन स्वरूपही स्वाभाविक व मानवीच वाटलें. उलट

माझ्या दृष्टीने त्यांत माझ्या जीवात्म्याचें प्रतिबिंब अधिक उत्साहजनक होतें. आतापर्यंत ज्या अपूर्ण व भिन्न वृत्तींच्या छटांचें मिश्रण असलेल्या चेहऱ्याला मी माझा म्हणत होतों, त्यापेक्षाही याच्या मुद्रेवरील भाव अधिक रेखीव व एकजिनसी दिसला. आणि येथपर्यंत माझें हें अनुमान निःसंशय बरोबर होतें. एक गोष्ट माझ्या लक्षांत आली आहे की, मी जेव्हा कृष्णराव गुप्ते याच्या शरीराने वावरत असें त्या वेळीं जो कोणी माझ्या निकट येई त्या प्रत्येकाला माझ्या त्या स्वरूपाची उघड उघड भीति वाटल्याशिवाय राहत नसे. माझ्या मताने याचें कारण असें असावें की, जगांत वावरणारीं जीं सामान्य माणसें आपणास दिसतात त्या सर्वांच्या मनोवृत्तींत सुष्ट व दुष्ट अशा दोन्ही वृत्तींचें मिश्रण असतें, पण अखिल मानवजातींत केवळ दुर्वासनांचा मूर्तिमंत पुतळा असा कृष्णराव गुप्ते हा एकटाच होता.

आरशासमोर मी फक्त एक क्षणभरच उभा राहिलों. दुसरा आणि अखेरचा प्रयोग अजून व्हावयाचा होता, माझें पूर्वीचें स्वरूप कायमचें नाहीसें झालें की काय, हें अजून पहावयाचें होतें. तें परत मिळविणें शक्य आहे की नाही, माझें स्वतःचें घरच मला पारखें ठरून सूर्योदयापूर्वी मला येथून पळ काढला पाहिजे की काय, याचा निर्णय अजून लागावयाचा होता. पुनः मी माझ्या प्रयोगशाळेंत परत गेलों, पुनः एकदा मिश्रण तयार केलें आणि पिऊन टाकलें, पुनः एकदा जड शरीराच्या घडामोडीचे क्लेश सहन केले आणि डॉक्टर शरच्चंद्राचें स्वरूप, त्याचें शील आणि कीर्ति धारण करून पूर्वस्थितीप्रत आलों.

त्या रात्रीं माझ्या जीविताला निराळी, परिणामीं प्राणघातक, दिशा लागली. माझ्या शोधाकडे मी अधिक उदार दृष्टीने पाहिलें असतें, उच्च, उदार व भक्तियुक्त आकांक्षांचा पगडा मनावर कायम ठेवून हा धाडसाचा प्रयोग मी केला असता तर सर्वच परिस्थिति निराळी झाली असती. ह्या जन्ममृत्यूच्या क्लेशांच्या दिव्यांतून राक्षसाऐवजी एखादा सत्पुरुष होऊन मी बाहेर पडलों असतों. निर्जीव औषधांच्या अंगीं विवेक करण्याची शक्ति थोडीच होती ? तें राक्षसीही नव्हतें तसेंच दैवीही नव्हतें. माझ्या जीवाला बंधन करणारे तुरुंगाचे दरवाजे फक्त त्या औषधाने

उघडले आणि त्याबरोवर आंत ज्या कांही मनोवृत्ति कोंडल्या गेल्या होत्या त्या सापळ्यांतून सुटलेल्या सिंहाप्रमाणें मोकळ्या सुटल्या. त्या वेळीं माझ्या सत्प्रवृत्ति झोपीं गेल्या होत्या. महत्त्वाकांक्षेच्या वाऱ्याने प्रज्वलित राखले गेलेले माझे कुविचार मिळालेल्या संधीचा उपयोग करून घेण्यास तयारच होते. आणि त्यांचाच मूर्तिमंत परिणाम म्हणजे हा कृष्णराव गुप्ते. आता माझ्या दोनही मनोवृत्ति दोन निरनिराळ्या शरीरांत वास करीत होत्या तरीही त्यांपैकी एक व्यक्ति कुप्रवृत्तीचें आगरच होती; आणि दुसरी व्यक्ति म्हणजे ज्याच्यामध्ये सुधारणा आणि प्रगति घडवून आणण्यासंबंधांत मी निराश होऊन बसलों होतों तो, परस्परविरोधी वृत्तींचें मिश्रण होऊन बनलेला डॉ. शरच्चन्द्र, ही होती. अशा तऱ्हेने माझी प्रगति सर्व प्रकारें अधःपाताकडेच चालली होती.

त्या वेळीं विद्याव्यासंगी व शुष्क जीवनाबद्दल मला मोठा तिटकारा वाटत असे. फुलपाखरासारखें स्वच्छंदी जीवन घालविण्याची इच्छा मला मधून मधून होत असे. माझें स्वच्छंदी जीवन, अगदी सौम्य शब्दांत सांगावयाचें म्हणजे अगदी असभ्य होतें. तर उलटपक्षीं माझी कीर्ति वाढत होती. माझें वय व त्याबरोबरच समाजांतील प्रतिष्ठा वाढत होती. अर्थात् माझ्या या जीवनांतील विषमता मला अधिकच जाचक होऊं लागली होती. माझ्या या मर्मस्थानावरच माझ्या या नव्या शोधाने हल्ला चढविला आणि मी त्याच्या पूर्ण अंकित झालों. औषधाचा एकच पेला पिण्याचा अवकाश की, मी विद्वान व प्रसिद्ध डॉक्टराचें शरीर फेकून देऊं शकत असें आणि एखादा भला जाडा कोट अंगांत घालावा त्याप्रमाणें कृष्णराव गुप्ते याचें शरीर धारण करूं शकत असें. या कल्पनेचेंही मला कौतुक वाटे. या विचाराने मला आनंदाच्या गुदगुल्या होत. सर्व व्यवस्था मी मोठ्या आस्थेने व काळजीने केली. कृष्णराव गुप्ते याचा तपास करीत पोलिस परळवरील ज्या घरीं गेले होते, तें घर मीं घेतलें आणि सजविलें. फारशी बडबड न करणाऱ्या व खऱ्याखोट्याचा विधिनिषेध न बाळगणाऱ्या अशा एका म्हाताऱ्या मोलकरणीची तेथे योजना केली. इकडे माझ्या नोकरांनाही कृष्णरावाचें वर्णन सांगून ठेवून सूचना देऊन ठेविल्या, माझ्या बंगल्यांत

त्याला सर्व प्रकारची मुभा आणि सत्ता आहे म्हणून त्यांना बजाविलें. गैरसमजुतीने कांही घोटाळा होऊं नये म्हणून मी स्वतःही कृष्णरावाच्या रूपाने दोन चार वेळां माझ्या घरीं येऊन जाऊन नोकरांशीं परिचय करून ठेविला. तसेंच तुला इतकें नापसंत असलेलें माझें मृत्युपत्रही मी करून ठेविलें. अशा हेतूने की, न जाणो, डॉक्टर शरच्चंद्राच्या स्वरूपांत माझ्यावर कांही संकट आलें व कृष्णरावाचें स्वरूप मला कायमचें स्वीकारावें लागलें तर सांपत्तिक अडचण मला भासूं नये. अशा तऱ्हेने, माझ्या समजुतीप्रमाणें, मी सर्व बाजूने नाकेबंदी करून टाकली आणि माझ्या या नवीन परिस्थितीमुळे प्राप्त होणाऱ्या विचित्र स्वातंत्र्याचा मी निर्धास्तपणें उपभोग घेऊं लागलों.

आपल्या स्वतःला किंवा आपल्या कीर्तीला धक्का लागूं नये म्हणून आपण योजिलेलीं इष्ट कृत्यें पार पाडण्याकरितां द्रव्याची लालूच दाखवून बेगुमान बेरडांची योजना पूर्वीच्या काळीं लोक करीत असत. स्वतःची सुखोपभोगाची हाव तृप्त करण्याकरितां असें करणारा वीर मी पहिलाच होतों. एकीकडे समाजांत मानसन्मानाने मिरवावयाचें आणि दुसऱ्याच क्षणीं अंगावरचे कपडे लीलेने उडवून टाकणाऱ्या मुलाप्रमाणें हें शरीर टाकून देऊन स्वच्छंदतेच्या समुद्रांत स्वैरपणें विहार करावयाचा, हा चमत्कार करून दाखविणारा पुरुष मी पहिलाच होतों. पण रूपांतराच्या अभेद्य पांघरुणाखाली मी अगदी पूर्णपणें सुरक्षित होतों. कल्पना तर करून पहा, मी मुळी अस्तित्वांतच नव्हतों. प्रयोगशाळेंत शिरून नेहमीच तयार ठेवलेल्या त्या औषधाचें मिश्रण पोटांत घेण्यापुरता एकदोन सेकंदांचा अवधि मला मिळाला की बस. कृष्णरावाने कितीही भयंकर पातक केलें असलें तरी पाण्यावरच्या बुडबुड्याप्रमाणें तो हवेंत विरून जाईल आणि त्याच्या जागीं शंकाकुशंकांना केवळ तिरस्काराने हसूनच उत्तर देणारा डॉक्टर शरच्चंद्र आपल्या प्रयोगशाळेंत शांतपणें कामांत गढून गेलेला दिसेल.

या नव्या अवतारांत ज्या सुखांचा मी उपभोग घेत होतों तीं सभ्यपणाचीं नव्हतीं हें मी मागे सांगितलेंच आहे. यापेक्षा कडक शब्दांत त्यांचें वर्णन करण्याची आवश्यकता मला वाटत नाही, पण कृष्णरावाच्या

हातून त्यांचा भयंकर अतिरेक होऊं लागला. अशा प्रकारचे फेरफटके करून मी घरत आलों म्हणजे माझ्या प्रतिनिधीच्या मार्फत इतका नीच-पणा मी कसा करूं शकतों याचेंच मला आश्चर्य वाटे. ह्या भुताला मी माझ्याच शरीरांतून उत्पन्न करून आपल्या वासना तृप्त करण्याकरितां पाठवून देत असें; पण त्याचा स्वभाव आमूलाग्र दुष्ट व मत्सरी असे, त्याचे आचारविचार शुद्ध स्वार्थमय असत, दुसऱ्याचे अनन्वित हाल करतांना रक्त पिणाऱ्या वाघाप्रमाणें त्याला सुरसुरी येई, त्याचें हृदय तर पाषाणा-सारखें निर्दय होतें. कृष्णरावाने केलेलीं कृत्यें पाहून डॉ. शरच्चंद्र तर केव्हा केव्हा आश्चर्याने व भीतीने दिङ्मूढच बनून जाई. पण सामान्य कायदेका-नूच्या आटोक्याबाहेरची ही परिस्थिति होती आणि या कपटप्रयोगाच्या सिद्धीमुळे सदसद्विवेकबुद्धीची टोचणी बोथट होऊन गेली होती. कारण अखेर अपराधी होता तो एकटा कृष्णरावच. डॉ. शरच्चंद्र पूर्ण निष्पाप होता. आपली कीर्ति किंवा सद्‌गुण यांत बिलकुल उणेपणा येऊं न देतां तो उजळ माथ्याने हिंडत असे. शक्य तेथें कृष्णरावाने केलेलें नुकसान भरून काढण्यासही तो विलंब लावीत नसे. अशा तऱ्हेने त्याची सद-सद्विवेकबुद्धि निद्रिस्त झाली.

अशा तऱ्हेने ज्या दुष्कृत्यांकडे मी काणाडोळा केला (कारण तीं दुष्कृत्यें मी केलीं हें आजही कबूल करण्याची माझी तयारी नाही) त्यांचा विस्तृत तपशील सांगत बसण्याची माझी इच्छा नाही. माझा पापाचा घडा कसा क्रमाक्रमाने भरत गेला, त्यासंबंधीचीं सूचक चिन्हें कशीं क्रमाक्रमाने दिसूं लागलीं होतीं, त्याचाच फक्त उल्लेख मी करणार आहें. एक दिवस एक अपघात घडला. पण त्याचे परिणाम मला कांहीच भोगावे लागले नाहीत; म्हणून त्याचा फक्त मी ओझरता उल्लेखच करणार आहें. एका मुलीला निर्दयपणें मी तुडविलें हें पाहून रस्त्यावरच्या एका गृहस्थाला माझा राग आला. (हा गृहस्थ तुझा नातलग आहे हें मला नुकतेंच समजलें.) एक वैद्य आणि त्या मुलीचे आईबापही तेथे धावून आले, क्षणभर तर मला माझ्या जिवाचीही धास्ती वाटूं लागली; आणि त्यांचा पुण्यप्रकोप शांत करण्याकरितां कृष्णरावाला त्यांना माझ्या दाराशीं घेऊन येणें भाग पडलें व डॉ. शरच्चंद्राच्या सहीचा चेक लिहून द्यावा

लागला. असा धोक्याचा प्रसंग पुनः येऊं नये याची एक सोपी युक्ति मला सुचली. कृष्णराव गुप्ते याच्या स्वतःच्याच नांवाने दुसऱ्या एका बँकेंत मीं खातें उघडलें आणि माझ्या हस्ताक्षराला थोडेसें तिरपें वळण देऊन कृष्णरावाची सही तयार केली. इतकी तयारी झाल्यावर मला वाटलें की, नियतीचा फेरा आपण निर्धास्तपणें चुकवूं शकूं.

सरदार खंडेराव थोरात यांचा खून होण्याच्या पूर्वी सुमारें दोन महिने, (एका रात्रीं) असेच कांही पराक्रम करून घरीं येण्यास मला बराच उशीर झाला होता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी जागा झालों तों मला फार चमत्कारिक संवेदना होत असल्याचा भास झाला. मी इकडे तिकडे नजर टाकली. माझ्या बंगल्याच्या नेहमीच्या प्रशस्त खोलींतच मी होतों. नेहमीचें सुंदर फर्निचर खोलींत दिसत होतें, पण व्यर्थ ! या विचित्र संवेदना दूर होईनात. माझ्या पलंगाचें नक्षीकाम माझ्या ओळखीचें होतें. सुंदर मच्छरदाणीवरील कुसरीच्या आकृतीही नेहमीच्याच होत्या. तरीही माझें समाधान होईना. मी माझ्या नेहमीच्या खोलींत नाही, परळवरील घराच्या ज्या खोलींत कृष्णरावाच्या रूपाने मी निजत असें त्या खोलींत मी आहें ही माझी भावना कांही केल्या कमी होईना. माझ्या या विक्षिप्त कल्पनेचें मला हसूं आलें. असा भास मला कां व्हावा याचें मानस-शास्त्राच्या पद्धतीने पृथक्करण करीत पहाटेच्या गुलाबी झोपेच्या गुंगींत मी पडून राहिलों. इतक्यांत एकाएकी माझी दृष्टि माझ्या हातावर पडली. डॉ. शरच्चंद्राचा हात तुझ्या ओळखीचा आहेच. मृदु, मांसल आणि गोरापान, डॉक्टरांच्या पेशाला शोभणारा, सुंदर व देखणा असा तो हात कोणीकडे, आणि पांघरुणाखाली अर्धवट झाकला गेलेला, रुक्ष, कणखर आणि कठोर दिसणारा, फुगलेल्या शिरांच्या गाठींनी विद्रूप झालेला व दाट, राठ केसांमुळे अधिकच दणकट दिसणारा, मुंबईच्या सकाळच्या अस्पष्ट सूर्यप्रकाशांत भयानक भासणारा तो हात कोणीकडे ! तो हात कृष्णराव गुप्ते याचा होता !

आश्चर्याने मूढ व स्तिमित होऊन मी त्या हाताकडे अर्धाएक मिनिट नुसता टकमक पाहतच राहिलों. इतक्यांत माझ्या हृदयावर जणूं काय वज्राघात झाल्यासारखा मी चमकलों, भ्यालों आणि कानांजवळ झांजा

वाजविल्याप्रमाणें घाबरून दचकून उठलों; पलंगावरून एकदम उडी मारून मी आरशाजवळ आलों. आरशांत जें दृश्य मीं पाहिलें, तें पाहतांच जणूं काय माझ्या शरीरांतील सर्व रक्त जागच्या जागीं गोठून गेलें. निजतांना मी डॉ. शरच्चंद्र होतों. उठलों तेव्हा मी कृष्णराव गुप्ते बनलों होतों. याचा अर्थ काय? हें कसें घडलें? मी सारखा विचार करूं लागलों; आणि इतक्यांत माझ्या अंतःकरणांत भीतीचा दुसरा वज्राघात झाला. आता याला उपाय काय करावयाचा? सूर्योदय केव्हाच होऊन चक्क ऊन पडलें होतें, नोकर चाकर उठले होते आणि माझीं औषधें तर राहिलीं माझ्या प्रयोगशाळेंत! येथून चार जिने ओलांडून खाली जावयाचें, मागील वाटेने बागेंत जावयाचें, तेथून अंगण ओलांडून प्रयोगशाळा गाठावयाची! मी भीतीने थिजूनच गेलों. माझें तोंड झाकून घेणें मला शक्य होतें, पण त्याचा काय उपयोग? माझ्या उंचींत झालेला बदल तर कांही मी लपवूं शकत नव्हतों. इतक्यांत मला आठवण झाली, आणि मी समाधानाने सुटकेचा निःश्वास टाकला. माझ्या या दुसऱ्या स्वरूपांतील–कृष्णराव गुप्तेच्या रूपांतील–व्यक्तीला नोकर ओळखतात. तो नेहमी माझ्या घरीं येतो जातो हें त्यांना माहीत आहे, हें मला आठवलें. मी लागलीच कपडे चढविले. माझे नेहमीचे कपडे मला पुष्कळ सैल होत होते, ते शक्य तितके नीटनेटके करून घेतले आणि शांतपणाने घरांतून बाहेर पडून चालूं लागलों. कृष्णरावाला इतक्या सकाळच्या प्रहरीं या विचित्र वेषाने आलेला पाहून सखाराम तर आ वासून पाहतच राहिला. दहाच मिनिटांत डॉ. शरच्चंद्र आपल्या नेहमीच्या स्वरूपांत पण थोड्या खिन्न मुद्रेने सकाळचा चहा घेण्यास हजर झाले.

चहाची वासना तर मला मुळीच नव्हती. ही विचित्र व अतर्क्य घटना, माझ्या पूर्वीच्या स्वरूपांत आपोआप घडून आलेली ही उलटापालट, म्हणजे माझ्या भावी शिक्षेची पूर्वसूचनाच होती. तुझा शत्रु गोकुळांत जन्मला आहे म्हणून पूर्वसूचना देणारी आकाशवाणीच होती; अर्थात अशा प्रकारें हीं दोन भिन्न शरीरें धारण करून जगांत वावरण्याचे भावी परिणाम काय होतील आणि ते कोणत्या थराला जातील याचा मी गंभीरपणें विचार करूं लागलों. हें नवीन रूप धारण करण्याच्या शक्तीचा

अलीकडे मी पुष्कळ उपयोग करीत होतों आणि परिणामीं तिचा विकासही पुष्कळ झालेला दिसत होता. जणूं काय कृष्णराव मोठा झाला आहे, असा मला भास होत होता. मी गुप्ते बनून हिंडत असतांना मला पूर्वीपेक्षा अधिक उत्साह वाटे, माझें रक्त अधिक वेगाने सळसळूं लागे. जर अशी स्थिति कांही काळ चालली, तर माझ्या वृत्तीची स्थिरता कायमची ढासळेल, इच्छेस येईल त्याप्रमाणें स्वरूप बदलण्याची माझी शक्ति कायमची नाहीशी होईल आणि कृष्णराव गुप्ते याच्या रूपांतच मला कायमचें राहावें लागेल हें संकट मला स्पष्ट दिसूं लागलें. माझ्या औषधाचा प्रभावही नेहमी एकसारखाच दिसत होता असें नाही. माझ्या प्रयोगांच्या सुरुवातीस एकदा तर त्याचा परिणाम बिलकुल झाला नाही. त्यानंतर अनेक वेळां मला औषधाचें प्रमाण दुप्पट करावें लागलें आणि एकदा तर प्राण धोक्यांत घालूनही तें तिप्पट करणें भाग पडलें. केव्हा केव्हा दिसून येणारी ही अनिश्चितता हा एकच माझ्या समाधानांत मिठाचा खडा पूर्वी होता. पण आज सकाळच्या ह्या घटनेने एक नवें संकट उभें केलें. सुरुवातीस शरच्चंद्राचें शरीर सोडून कृष्णरावाचें धारण करतांना मला अधिक त्रास पडे; पण अलीकडे त्याच्या उलट अनुभव येऊं लागला होता व कृष्णरावाचें शरीर सोडणें मला हळूहळू अधिक कठीण जाऊं लागलें होतें. या गोष्टीकडेही आजच्या प्रसंगाने माझें लक्ष अधिक वेधलें. ह्या सर्वाचें पर्यवसान कशांत होणार हें माझ्या लक्षांत येण्यास उशीर लागला नाही. माझ्या मूळच्या उच्च मनोवृत्तीचा मजवरील पगडा कमी कमी होऊं लागला होता आणि नवीन धारण केलेल्या दुसऱ्या नीच स्वरूपाशीं माझें तादात्म्य हळूहळू पण निश्चितपणें वाढत जात होतें.

हें स्वरूप स्वीकारावें की तें, हा प्रश्न आता माझ्यापुढे उभा राहिला. माझ्या दोन्ही जीवांची स्मरणशक्ति एकच होती पण इतर मानसिक शक्तींची विभागणी मात्र अगदीच असमान झाली होती. शरच्चंद्रामध्ये दोन्ही वृत्तींचा मिलाफ झाला होता. कृष्णरावाचे पराक्रम आणि चैनबाजी पाहून कधी कधी त्याचें चित्त भीतीने अस्वस्थ होई तर कधी त्याच्या कृत्यांकडे समभावाने व तृष्णाकुल आतुरतेने पाहून त्याच्या सुखाचा स्वाद घेण्याचा तो प्रयत्न करी. पण कृष्णरावाला शरच्चंद्राची

बिलकुल पर्वा वाटत नसे. रानावनांतून वाटमाऱ्या करणारा दरोडेखोर पर्वतांतील गुहेकडे, संकटसमयीं पाठलाग करणाऱ्या शत्रूपासून आपला बचाव करण्याचें एक साधन या दृष्टीनेच जसा पाहतो, तितकीच फार तर शरच्चंद्राची आठवण गुप्ते ठेवी. एखाद्या वत्सल पित्यापेक्षाही शरच्चंद्र त्याची अधिक काळजी वाही, तर कृष्णराव वहकलेल्या मुला-पेक्षाही अधिक बेगुमान असे. शरच्चंद्राच्या तर्फेने निकाल द्यावयाचा, शर-च्चंद्राचा कायमचा स्वीकार करावयाचा म्हणजे अंतःकरणाच्या खोल कप्प्यांत बाळगून ठेवलेल्या व अलीकडेच तृप्त होऊं लागलेल्या सर्व लाल-सांना कायमचें मुकावयाचें. कृष्णरावाचा अंगीकार करावयाचा तर जिवाशीं बाळगलेलीं हजारों उच्च ध्येयें व आकांक्षा, यांचा त्याग करावयाचा आणि एकाच फटकाऱ्यासरसें समाजाचा कायमचा तिरस्कार पत्करून मित्रांच्या प्रेमाला पारखें व्हावयाचें. ह्या दोनही बाजू समान दिसणार नाहीत, पण त्यांत आणखीही एका गोष्टीचा विचार करावयास पाहिजे. तपस्व्याचें त्यागमय जीवन व्यतीत करतांना शरच्चंद्राच्या लालचावलेल्या अंतःकर-णाला अत्यंत कष्ट होतील; तर आपण कोणत्या उदात्त सुखाला आचवलों याची कृष्णरावाला आठवणसुद्धा होणार नाही. माझी परिस्थिति विचित्र असली तरी हा अंतःकलह अनादि आहे, मनुष्यमात्राला सर्वसामान्य आहे. अगदी याच प्रकारचे मोह पापी जीवाला भुलवीत असतात. याचसारखीं भयें त्याला भेडसावीत असतात. आणि या दोघांच्या झगड्यांत त्याला आपल्या जीवनाचा निर्णय करावयाचा असतो. अशा वेळीं हजारों मनुष्य-प्राण्यांची जी स्थिति होते तीच माझी झाली. मी सद्वृत्तींचा, उच्च ध्येयांचा स्वीकार केला, पण त्यांना चिकटून राहण्याइतकी शक्ति, इतका निर्धार मात्र माझ्या अंगीं नव्हता.

होय, वयोवृद्ध व असंतुष्ट, प्रेमळ मित्रांच्या सहवासांत वावरणाऱ्या व प्रामाणिक आशा आकांक्षा मनांत बाळगणाऱ्या डॉ. शरच्चंद्राचा मी स्वीकार केला आणि कृष्णरावाची स्वच्छंदी वृत्ति, त्याचें तारुण्य, त्याचें निष्काळजी जीवन, सळसळणारा उत्साह आणि त्याच्या वेषाने गुप्त-पणाने उपभोगावयास मिळणारे भोगविलास या सर्वांना कायमचा रामराम ठोकण्याचा मी निर्धार केला. हा निर्धार करतांना सुद्धा माझ्या अंतःकरणांत

अगदी गुप्तरूपाने थोडीशी तरी वासना मी शिल्लक ठेविली असावी; कारण परळवरील तें घर मी सोडून दिलें नाही किंवा माझ्या कपाटांत नेहमी तयार असणारे कृष्णरावाचे कपडेही मी नाहीसे केले नाहीत. तरीही दोन महिनेपर्यंत या निश्चयाला मी जागलों. दोन महिनेपर्यंत आजपावेतो कधीही साधला नाही इतका संयम मी माझ्या जीवनांत पाळूं शकलों, व अंतःकरणांतील सत्प्रवृत्तीनें समाधान केल्याने जें सुख मिळतें त्याचा अनुभव घेतला. पण दिवसामागून दिवस जाऊं लागले, तशी माझ्या भीतीची तीव्रताही कमी होऊं लागली. शुद्ध अंतःकरणामुळे मिळणारें समाधान ही एक नेहमीची सामान्य गोष्ट होऊन गेली. पिंजऱ्यांत अडकलेला कृष्णराव सुटका करून घेण्याकरितां धडपड करूं लागला व त्या धडपडीच्या तीव्र वेदना माझ्या मनाला सतावून सोडूं लागल्या. आणि अखेर मानसिक दुर्बलतेच्या क्षणिक लहरीच्या भरांत मी तें मिश्रण फक्त एकदा तयार केलें व शरीर बदलून टाकणारें तें औषध पिऊन टाकलें.

एखादा दारूबाज आपल्या दुर्व्यसनाच्या बाबतींत आपल्या मनाची समजूत घालीत असतो त्या वेळीं स्वतःला पशुवत् चेतनाहीन व भावनाशून्य करून टाकल्यामुळे कोणतें संकट आपण ओढवून घेत आहोंत याची त्याला हजारांत एकदाही जाणीव होत नसते. माझीही स्थिति त्या दारुबाजासारखीच होती. नैतिक बाबींत पूर्ण भावनाशून्य अंतःकरण आणि बेगुमानपणें दुष्ट कृत्यें करण्याची तत्परता, हे कृष्णराव गुप्ते याचे मुख्य स्वभावविशेष होते. त्याच्या परिणामांची पूर्ण कल्पना माझ्या परिस्थितीचा महिनान् महिना विचार करूनही मला आली नव्हती; आणि अखेर याच दोषांच्या पायीं मला शिक्षा भोगावी लागली. माझ्या सैतानी वृत्ति फार दिवस पिंजऱ्यांत कोंडल्या गेल्या होत्या, त्या आता गर्जना करीतच बाहेर आल्या. तें मिश्रण पीत असतांनाच, बेछूट मनोवृत्ति, दुष्ट कृत्यें करण्याची भयंकर इच्छा उत्पन्न होत असल्याचा मला भास होऊं लागला. माझ्या तावडींत सापडलेल्या त्या दुर्दैवी प्राण्याचे साधे व सभ्य शब्द ऐकतांच तुफानांतील खवळलेल्या समुद्राप्रमाणें माझ्या हृदयाचा खळबळाट झाला, तो मला वाटतें त्या दुष्टवृत्तीमुळेच. परमेश्वराला स्मरून मी सांगतों की,

शुद्धीवर असलेला कोणताही शाहणा मनुष्य इतक्या क्षुल्लक निमित्ताने चिडून असें भयंकर कृत्य करणार नाही. एखादें चिडलेलें मूल आपलें खेळणें फोडून टाकतें, त्यापेक्षा कांही अधिक शहाणपणा त्याला मारतांना माझ्या अंगीं होता असें मला वाटत नाही. जगांतील दुष्टांतल्या दुष्ट मनुष्याच्या अंतःकरणांतही त्याच्या दुष्ट वृत्तींना ताळ्यावर राखणाऱ्या कांही वृत्ति असतात आणि म्हणूनच जगांतील मोहांची मोहनी पडल्या-वरही थोड्याशा प्रमाणांत का होईना, ते आपलें डोकें ठिकाणावर राखूं शकतात. पण संयम करविणाऱ्या या सर्व वृत्तींचा कृष्णरावाच्या स्वरूपांत मी निःशेष त्याग केला होता. माझी स्थिति अशी होती की, मोह कितीही क्षुल्लक असला तरी तो उत्पन्न झाला की त्याला मी वश व्हावयाचाच.

त्याच क्षणीं माझ्यांत सैतान संचरला. आणि मी बेफाम झालों. त्या निरुपद्रवी शरीरावर प्रहार करतांना मला आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या, प्रत्येक प्रहाराबरोबर नवा आनंद मी अनुभवूं लागलों. मला थोडा थकवा वाटूं लागल्यावर मात्र, त्वेषाच्या पूर्ण भरांत एकाएकी माझें हृदय भीतीने थरारलें, कंपायमान झालें. माझ्या डोळ्यांवरची धुंदी उतरली. माझ्या आयुष्याची इतिश्री झाली हें माझ्या ध्यानांत आलें. माझ्या अविचाराचें तें स्थान सोडून मी पळ काढला. मध्येच माझ्या पराक्रमाचें कौतुक मी करीं; मध्येच भीतीने मला कंप सुटे. माझ्या दुष्ट वृत्तींचें समाधान झालें होतें, पण त्याचबरोबर त्यांच्या ज्वाला अधिक प्रज्वलितही झाल्या होत्या. जीवितावरील माझें प्रेम पराकोटीला पोचलें होतें. धावत पळत मी परळवरील घर गाठलें आणि पूर्ण निर्धास्त होण्याच्या इच्छेने माझे कागदपत्र जाळून टाकले. तेथून निघून दिव्यांचा लखलखाट असलेल्या रस्त्यांवरून मी भटकूं लागलों. माझ्या मनाची पूर्वीची द्विधावृत्ति अजूनही कायम होती. माझ्या अपराधाचें मला कौतुक वाटत होतें. दुसरीं घोर कृत्यें करण्याच्या बेजबाबदार योजना मी मनांत आणीत होतों आणि त्याच वेळीं मी केलेल्या खुनाचा सूड घेण्याकरितां कोणी येत आहे की काय, त्याच्या पावलांचा आवाज कोठून ऐकूं येत आहे की काय, हें कान टवकारून मी ऐकत होतों. रूपांतर घडवून आणणारें मिश्रण पितांनाही कृष्णराव आपल्याच आनंदांत गर्क होता आणि मेलेल्या व्यक्तीचें

शुभचिंतन करीत होता. रूपांतर घडत असतांना होणारे क्लेश पुरते शमलेही नसतील इतक्यांत डॉ. शरच्चंद्राचे डोळे कृतज्ञतेच्या व उद्वेगाच्या अश्रूंनी भरून आले. दोन्ही हात जोडून त्याने परमेश्वराला साष्टांग नमस्कार घातला. स्वतःच्या वासनांचें कोड पुरविण्याची माझी हौस पुरी फिटली. माझें सर्व जीवन माझ्या डोळ्यांसमोर संपूर्ण खडें उभें राहिलें. बालपणीं वडिलांचा हात धरून चालत होतों, तेव्हाचें माझें जीवन, डॉक्टराचा पेशा पत्करिल्यानंतर त्याग व विरक्ति साधण्याकरितां केलेले परिश्रम आणि आज संध्याकाळचा घोर, भयानक प्रकार ! सारखींच अस्थिर व अस्पष्ट दिसणारीं हीं सर्व चित्रें एकामागून एक पुनः पुनः माझ्या डोळ्यांपुढून जाऊं लागलीं. मोठ्याने गळा काढून रडावें असें मला वाटूं लागलें. माझ्या स्मृतिपटावर गर्दी करून माझ्यासमोर उभ्या राहणाऱ्या भयंकर आकृति माझ्या अश्रूंनी पुसून टाकण्याचा मी प्रयत्न करूं लागलों. मला भीति दाखवणारे हे आवाज प्रार्थनेच्या आक्रोशांत बुडवून टाकावे असें मला वाटूं लागलें; पण इतकें करूनही माझ्या प्रार्थनांना दाद न देतां माझा दुष्टपणा भयंकर रूप धारण करून माझ्याकडे डोळे वटारून पाहूं लागला. पश्चात्तापाचा पहिला आवेग थोडासा ओसरतांच समाधानाची, आनंदाची एक ऊर्मि उभी राहिली. मीं कसें वागावें या प्रश्नाचा आज निर्णय लागला. कृष्णरावाचें स्वरूप धारण करणें यापुढे अशक्य ठरलें. माझी इच्छा असो अथवा नसो, माझ्या जीवनांतील सत्प्रवृत्तींचाच आश्रय यापुढे कायमचा धरणें मला भाग होतें; हा नुसता विचारच मला किती आनंददायक वाटला ! स्वाभाविक जीवनाला असणारीं बंधनें व मर्यादा किती आनंदाने व किती नम्रपणाने मी पुनः स्वीकारल्या ! प्रयोगशाळेच्या ज्या मागल्या दाराने मी इतक्या वेळां गेलों आलों, त्या दाराला कुलूप घालून किल्ली बुटाच्या टाचेने मोडून टाकतांना मला किती मनापासून विरक्ति वाटली !

दुसऱ्याच दिवशीं बातमी समजली की, खुनाचा पत्ता लागला आहे व कृष्णरावाचीं कृष्णकृत्यें जगाला समजलीं आहेत. ज्यांचा खून झाला ते गृहस्थही फार थोर आणि सन्माननीय होते. त्यांचा खून करणें हा गुन्हा भयंकर होता, इतकेंच नव्हे तर तो मूर्खपणाचा एक जीवघेणा खेळ होता.

हें ऐकून, मला वाटतें, मला थोडासा आनंदच झाला. फाशीच्या भीतीचें संरक्षक कुंपण माझ्या सत्प्रवृत्तीभोवती घातलें गेल्याने त्या आता सुरक्षित राहतील याबद्दल मला समाधान वाटलें. शरच्चंद्र हाच आता माझा एकमेव आधार होता. कृष्णरावाने एक क्षणभरच डोकें वर करण्याचा अवकाश की लागलीच सर्व लोक त्याच्यावर तुटून पडतील व त्याला ठार करतील.

यापुढे आजपर्यंत केलेल्या पापांचें प्रायश्चित्त करण्याचा मीं निश्चय केला; आणि मी प्रांजलपणें सांगतों की, माझ्या या निश्चयाचे कांही चांगले परिणामही घडून आले. गेल्या वर्षाच्या अखेरी अखेरीस दुःखी जीवांचें दुःख दूर करण्याकरितां मी कसा मनापासून झटत होतों, दुसऱ्याला सुख देण्याकरितां मी किती प्रयत्न करीत होतों आणि, निदान माझ्यापुरते तरी, माझे दिवस कसे सुखांत व आनंदांत जात होते हें सर्व तुला स्वतःलाही माहीत आहे. या परोपकाररत व निरुपद्रवी जीवनाचा मला कंटाळा आला असेंही मला खरोखर वाटत नाही. उलट मला त्यापासून पूर्ण समाधानच लाभलें असेंच मी म्हणतों. पण माझ्या हेतूंच्या दुटप्पीपणाचा शाप अजून माझ्या मागे लागला होताच. पश्चात्तापाची पहिली तीव्रता कमी होतांच माझ्या मनाची हीनवृत्ति—इतके दिवस मी जिचे कोड पुरविले आणि नुकतीच जिला मी डांबून टाकली ती दुष्टवृत्ति—स्वैरपणें थैमान घालण्याकरितां पुनः गुरगुरूं लागलीच. कृष्णरावाचें स्वरूप पुनः धारण करण्याचें माझ्या स्वप्नींही नव्हतें; त्याची नुसती कल्पनाच मला असह्य होत असे. माझ्या अंतःकरणांतील प्रवृत्तींशीं, सदसद्विवेकबुद्धीशीं, माझ्या स्वतःच्या स्वरूपानेच खेळ खेळण्याचा मला मोह पडला आणि गुप्तपणें पापें करणाऱ्या सामान्य जीवाप्रमाणेंच या मोहाच्या हल्यांपुढे माझा टिकाव लागला नाही.

प्रत्येक गोष्टीचा शेवट होतोच. पापाचा घडा कितीही मोठा असला तरी अखेर तो भरतोच. माझ्या दुष्टवृत्तींना दिलेल्या थोड्याशा सवलतीमुळेच अखेर माझ्या जीवनांतील स्थिरता ढासळली. पण अजूनही मी गडबडलों नव्हतों. माझें हें पतन स्वाभाविक आहे, शरीराचें रूपांतर घडवून आणणाऱ्या औषधाचा मला शोध लागण्यापूर्वीचीच स्थिति परत

झाली आहे, असेंच मला वाटलें. तेव्हा जानेवारी महिना सुरू होता. आकाश निरभ्र होतें. राणीच्या बागेंतील एका बाकावर ऊन खात मी बसलों होतों. पायाखालच्या सुन्दर मऊ गवतावर पडलेले दवाचे बिंदु सूर्याच्या कोवळया उन्हांत मोत्यांप्रमाणें चमकत होते. फुलांचा मधुर सुगंध हवेंत दरवळून राहिला होता. झाडांवरील पक्ष्यांचा किलबिलाट कानाला सुखवीत होता. माझ्या मनांतील पशुवृत्ति पूर्वी अनुभवलेल्या बेफाम इन्द्रियसुखांच्या स्मृतींचे अवशेष चघळीत होत्या. दैवी वृत्ति थोडयाशा गुंगून पडल्या होत्या. पशुवृत्ति करीत असलेल्या मानसिक पापाचें प्रायश्चित्त पुढे करूं असें आश्वासन त्या देत होत्या, पण अद्याप त्या दिशेने कांहीच करण्यास त्यांनी सुरुवात केली नव्हती. कांहीही असलें तरी मी इतर चार लोकांसारखाच आहें. माझी तुलना मी इतर लोकांशीं करून पाहिली. माझ्या सत्प्रवृत्ति जागृत आहेत, तर सर्वसामान्य लोक किती कठोरपणें त्यांची उपेक्षा करितात, हें जेव्हा मी पाहिलें तेव्हा माझ्या चर्येवर कौतुकाचें स्मित झळकूं लागलें. अशा प्रकारें आढ्यतेने मी स्वतःचें कौतुक करीत असतांना त्याच क्षणीं माझें चित्त अस्वस्थ झालें, पोटांत तीव्र मळमळ सुरू झाली आणि शरीराला भयंकर कंप सुटला. कांही वेळाने हे क्लेश कमी झाले व मी बेसावध पडून राहिलों. क्रमाने मी सावध झालों, तसतसा हळूहळू माझ्या स्वभावांत बदल होत असल्याचा मला भास होऊं लागला. माझा धीटपणा वाढला, संकटाची पर्वा वाटेनाशी झाली, कर्तव्याचीं, जबाबदारीचीं बंधनें हवेंत विरून गेलीं. मीं माझ्या शरीराकडे पाहिलें, माझे हातपाय व सर्व अवयव खचल्यासारखे, आकुंचित झाल्यासारखे वाटूं लागले. माझे कपडे सैल होऊन इकडे तिकडे लोंबूं लागले. गुडघ्यावर ठेवलेला माझा हात केसाळ झाला, त्याच्यावरील शिरा फुगलेल्या दिसूं लागल्या. मी पुनः कृष्णराव गुप्ते बनलों. एका क्षणापूर्वी मी एक सन्माननीय, श्रीमंत सद्‌गृहस्थ होतों. सर्व लोक मला चाहत होते, मला सन्मान देत होते; घरीं सुग्रास अन्न माझी वाट पाहत तयार होतें. आणि आता—आता मी एक रस्त्यावरचा सामान्य मनुष्य बनलों. ना घर ना दार, खुनी म्हणून लोक माझा पाठलाग करतील; हातीं लागल्यास फासावर चढवितील !

माझी विचारशक्ति कुंठित झाली. पण ती मला कांही अजीबात सोडून गेली नाही. कृष्णरावाच्या स्वरूपांत मी असतांना माझ्या सर्व मानसिक शक्ति अतिशय तीव्र होत. माझ्या जोमाला, उत्साहाला जणूं काय पूर येई. हा अनुभव यापूर्वीही मला अनेक वेळां आलेला आहे. त्यामुळे असें घडे की, ज्या परिस्थितींत शरच्चंद्र घाबरून गेला असता, काय करावें हें त्याला सुचलें नसतें, त्याच परिस्थितीवर कृष्णराव बरोबर नेमकी तोड शोधून काढीत असे. माझीं औषधें माझ्या प्रयोगशाळेंतील आलमारींत होतीं. तेथे जावयाचें कसें ? हातांनी डोकें खाजवून मी हा प्रश्न सोडवूं लागलों. प्रयोगशाळेच्या मागील दाराला मी कुलूप घालून टाकलें होतें; पुढील दाराने माझ्या घरांतून मी आंत जाण्याचा प्रयत्न केला तर माझेच नोकर मला पोलिसच्या स्वाधीन करतील. दुसऱ्या कोणाची मदत घेतली पाहिजे हें उघड होतें. मला एकदम कमलाकांताची आठवण झाली. पण त्याला तरी गाठावयाचा कसा ? त्याची समजूत घालावयाची कशी ? एक वेळ समजा की, रस्त्यांत मी पकडला गेलों नाही ; तरी त्याच्यापर्यंत जावयाचें कसें ? माझ्यासारख्या अनोळखी, अप्रिय अशा आगंतुकाने कमलाकांतासारख्या प्रसिद्ध डॉक्टराचें, त्याचाच सहकारी डॉ. शरच्चंद्र याच्या खासगी प्रयोगशाळेच्या कपाटांतील सामानाची ढवळाढवळ करण्याविषयीं मन वळवावयाचें कसें ? इतक्यांत मला आठवण झाली की, माझ्या पूर्वीच्या स्वरूपाची एक शक्ति माझ्याजवळ शिल्लक होती. माझें हस्ताक्षर पूर्वीचेंच कायम होतें. हा एक प्रकाशाचा किरण दिसतांच माझा पुढचा मार्ग ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत मला स्वच्छ दिसूं लागला.

शक्य तितके मी माझे कपडे ठाकठीक केले, जवळून जाणारी एक व्हिक्टोरिया बोलाविली आणि ज्या हॉटेलाचें नांव मला त्या वेळीं आठवलें त्या हॉटेलांत घेऊन जाण्यास सांगितलें. माझ्या या विचित्र वेषाच्या मागे केवढी तरी दुःखमय कहाणी लपलेली होती ! तरी माझा विदूषकी थाट प्रेक्षकांना हसावयाला अवश्य लावी. माझा हा विचित्र अवतार पाहतांच व्हिटोरियावाल्यालाही आपलें हसें आवरेना. हें पाहतांच मी दात ओठ खाऊन एखाद्या राक्षसासारखा त्याच्या अंगावर धावलों. भाग्य त्या व्हिक्टोरियावाल्याचें—आणि त्याहून अधिक भाग्य माझें—की त्याचें हसें

ताबडतोब मावळलें, नाही तर दुसऱ्याच क्षणीं मी त्याला व्हिक्टोरियावरून खाली खेचून काढला असता. हॉटेलांत पोचतांच मीं चोहोकडे अशा दुष्ट नजरेने पाहिलें की, तेथील नोकरचाकर तर भीतीने कापावयासच लागले. माझ्यासमोर त्यांनी एकमेकांना नुसत्या नजरेने सुद्धा खुणविलें नाही. अगदी नम्रपणाने माझे हुकूम त्यांनी ऐकून घेतले, एका खासगी खोलींत ते मला घेऊन गेले आणि लेखनसाहित्य माझ्यापुढे हजर केलें. आपल्या प्राणावर बेतलें असतांना कृष्णराव कसा वागतो हा अनुभव मला नवीनच होता. बेसुमार क्रोधामुळे तो धुसफुसत होता, दुसऱ्यास दुःख देण्यास त्याचें रक्त सळसळत होतें, खून पाडण्यासही त्याने कमी केलें नसतें. पण तरीही तो प्राणी मोठा धूर्त होता. आपला राग मोठ्या प्रयासाने त्याने आवरला. कमलाकांताला एक आणि विठोजीला दुसरें अशीं दोन महत्त्वाचीं पत्रें त्याने लिहिलीं आणि तीं खरोखरीच पोस्टांत पडलीं कीं नाही याची खात्री करून घेण्याकरितां तीं रजिस्टर करण्यास सांगितलें.

त्यानंतर सबंध दिवसभर दातओठ चावीत तो आपल्या त्या खासगी खोलींत बसून राहिला. भीतीमुळे तो खोलीच्या बाहेरसुद्धा पडला नाही. आपलें जेवणाचें ताटही त्याने तेथेंच मागविलें. बिचारा वाढपी तर त्याच्या दृष्टिक्षेपानेच गर्भगळीत होऊन गेला होता. रात्र पडली तसा तो तेथून निघाला, एक व्हिक्टोरिया बोलाविली आणि त्यांत एका कोपऱ्यांत बसून रस्तोरस्तीं भटकूं लागला. 'तो' असें मी म्हणतों,– 'मी' असें म्हणण्याची मला छाती होत नाही. त्या नरपिशाच्चाच्या अंगीं माणुसकीचा लवलेशही नव्हता; भीति आणि द्वेष यांशिवाय दुसरी भावनाच नव्हती. अखेर त्या गाडीवाल्याला आपल्याविषयीं संशय येऊं लागला आहे असें वाटून त्याने गाडी सोडून दिली आणि पायींच भटकण्यास सुरवात केली. त्याच्या त्या अजागळ पोशाखामुळे रात्रीच्या वेळीं रस्त्यावरून जाणाऱ्या सर्व व्यक्तींत तो निराळा उठून दिसे. कोणाचेंही लक्ष त्याच्याकडे सहज वेधलें जाई. चालतांनाही ह्या दोन क्षुद्र मनोविकारांनी त्याच्या मनांत भयंकर तुफान माजविलें होतें. झपाझप पावलें टाकीत तो चालला होता, जणूं काय त्याची भीति त्याचा पाठलागच करीत

ह्योती ! तोंडाने बडबडत, मध्यरात्रीची वाट पाहत, तास, मिनिटें, सेकंदें यांचा हिशेब करीत, व कमी रहदारीच्या रस्त्यांवरून लोकांची नजर चुकवीत तो भटकत होता. एकदा एका म्हाताऱ्या भिकारणीने त्याला हटकलें. मला वाटतें, तिने भिक्षा मागितली. ह्याने तिच्या तोंडांत अशी चपराक ठेवून दिली की ती जीव घेऊन पळाली !

कमलाकांताच्या घरीं मी पुन: शरच्चंद्र झालों. तें पाहून माझ्या त्या जुन्या दोस्ताला जो धक्का बसला त्याचा थोडासा परिणाम माझ्या मनावर झाला. पण मला नक्की सांगतां येणार नाही. कृष्णरावाच्या स्वरूपाने जे कांही तास मी घालविले त्यासंबंधीं मला स्वत:ला इतका तिटकारा वाटत होता की, त्याच्यापुढे कमलाकांताला बसलेला धक्का म्हणजे दरिया में खसखस ! माझी वृत्ति आता पुरी बदलून गेली. मी इतका हादरून गेलों होतों तो मी पुन: कृष्णराव होईन की काय या भीतीने; फाशीच्या भीतीने नव्हे ! कमलाकांताने माझी कानउघाडणी केली, ती मी मुकाट्याने ऐकून घेतली. मी घरीं आलों आणि पलंगावर पडलों. हें सर्व जणूं काय स्वप्नांतच घडून आलें. सर्व दिवसभराच्या दगदगीमुळे मला लागलीच झोप लागली. दिवसाच्या सर्व प्रसंगांचीं भुतें झोपेंतही मला भेडसावीत होतीं पण थकव्यामुळे आलेली गाढ झोप त्यानेही चळली नाही. सकाळीं मी उठलों, माझें सर्व शरीर खिळखिळें झालें होतें, अशक्त झालें होतें, पण थोडी हुशारीही वाटूं लागली होती. माझ्या अंत:करणांत लपून बसलेल्या पशूची मला अजूनही भीति वाटत होती. त्याचा द्वेषही वाटे. कालच्या भयंकर प्रसंगाची मला अर्थातच विस्मृति पडली नव्हती. पण आज मी आपल्या घरीं होतों, माझीं औषधें माझ्याजवळ होतीं. माझी आशा जशी उज्ज्वल होती, तितकीच, सुरक्षित सुटल्याबद्दल माझ्या अंत:करणांत वाटणारी कृतज्ञताही उत्कट होती.

चहा झाल्यावर सकाळचें कोवळें ऊन खात स्वस्थ चित्ताने मी बागेंत फिरत होतों. इतक्यांत, स्वरूप बदलूं लागल्याची पूर्वसूचना देणाऱ्या त्या अपूर्व संवेदना पुन: होऊं लागल्या. धडपड करीत माझी प्रयोगशाळा गाठण्यापुरताच वेळ मला कसाबसा मिळाला. इतक्यांत कृष्णरावाच्या

भावना व विकार माझ्या अंतरंगांत धुसफुसूं लागले. या खेपेस पुनः शरच्चंद्राचें रूप धारण करण्याकरितां औषधाचें प्रमाण मला दुप्पट करावें लागलें; आणि दुर्दैव माझें की, सहा तासाच्या आंतच, टेबलाजवळ शांतपणें बसलों असतांना, वेदना पुनः होऊं लागल्या आणि पुनः औषधाचा डोझ घ्यावा लागला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्या दिवसापासून शरच्चंद्राचें रूप राखण्याकरितां माझी सर्व शक्ति एकवटून महाप्रयत्न करावे लागत आणि तें रूपही औषधाचा अंमल आहे तोंपर्यंतच टिकून राही. दिवस असो की रात्र असो, माझें स्वरूप बदलूं लागल्याची पूर्व-सूचना केव्हा येईल याचा नेम नसे. विशेषतः मला झोप लागली, किंवा खुर्चीवर बसल्या बसल्या नुसती डुकली जरी आली, तरी जागा झालों की मी कृष्णराव बनलेलोंच ! या भीतीने झोप घेण्याचेंही मी सोडून दिलें. ह्या निद्रानाशामुळे व टांगलेल्या तरवारीप्रमाणें एकसारखें भेडसावणाऱ्या या प्राणांतिक संकटाच्या काळजीमुळे एखाद्या दुखणेकऱ्यासारखें माझें शरीर खंगत चाललें. ज्या क्लेशांची मला कधी कल्पनाही आली नाही, इतके क्लेश सहन करावे लागल्यामुळे माझें शरीर व मन थकून कमकुवत झालें. कृष्णरावाची, माझ्या दुसऱ्या अवताराची भीति, या एका विचाराशिवाय दुसरा विचारही माझ्या मनांत येईनासा झाला. केव्हाही मला गुंगी आली, अथवा औषधाचा अंमल संपला की लागलीच, जवळ जवळ पूर्वसूचनेशिवायही (कारण रूपांतर होतांना होणाऱ्या वेदना दिवसानुदिवस कमी कमी होत चालल्या होत्या) मी कृष्णराव बनून जाईं ! माझ्या कल्पनाचक्षूंपुढे संकटाचीं, भीतीचीं चित्रें मूर्तिमंत उभीं राहत. निष्कारण द्वेषाने हृदयांत खळबळ उडून जाई. या तीव्र मनोविकारांच्या आवेगाचा थर सहन करण्याचेंही सामर्थ्यं शरीरांत नाही असा भास होई. शरच्चंद्राची उदासीनता, कमकुवतपणा ज्या मानाने वाढूं लागला, त्या मानाने कृष्णरावाचें सामर्थ्यंही वाढूं लागलें, आणि या दोघांना परस्परांबद्दल वाटणारा द्वेषही आता अधिक तीव्र होऊं लागला. शरच्चंद्राला हा प्रश्न जगण्यामरण्याचा प्रश्न वाटे. आपल्या मानसिक जीवनाचा कांही अंशांनी आपल्या बरोबरीने उपभोग घेणाऱ्या आणि जिवांत जीव आहे तोंपर्यंत आपली पाठ न सोडणाऱ्या या प्राण्याचें

खरें स्वरूप, त्याचा खरा हिडिसपणा आता शरच्चंद्राला पटला होता. कृष्णराव आपला सहजीवी आहे, त्याचें व आपलें जीवन कांही अंशीं एकत्र निगडित झालें आहे, येवढ्याच कारणाने शरच्चंद्राला मर्मांतिक वेदना होत होत्या असें नाही, तर, कृष्णरावाच्या अंगीं कितीही जोम, उत्साह असला, तरी तो त्याला सैतानी, अमानुष, अमूर्त प्राणी वाटे. पापाच्या खाईंत तळच्या चिखलांत रुतलेल्या या किड्यानें ओरडून गर्जना कराव्या, नामरूपहीन अशा या क्षुद्र जीवाने, पापें करण्याच्या चेष्टा कराव्या, निर्जीव, निराकार, अशा या प्राण्याने आपल्या जीवनाचे हक्क हिरावून घ्यावे, याचाच शरच्चंद्राच्या मर्मावर तीव्र आघात होई. विशेष हें की, हा भेवडावणारा बंडखोर, त्याच्या जिवाचा कलिजा होऊन राहिला होता, त्याच्या पत्नीपेक्षाही त्याला अधिक निकटचा झाला होता, त्याच्या या पार्थिव शरीरांत अडकून पडल्याने गुरगुरत होता आणि त्याची ही बाहेर पडण्याकरितां चाललेली धडपड शरच्चंद्राला जाणवत होती. मनाच्या क्षणिक दुर्बलतेचा प्रसंग साधून, अथवा झोपेच्या संधीचा फायदा घेऊन तो डोकें वर काढीत असे आणि शरच्चंद्राची जीवनाच्या क्षेत्रांतून हकाल-पट्टी करीत असे. कृष्णरावालाही शरच्चंद्राचा द्वेष वाटे, पण तो निराळ्या प्रकारचा. फाशीची भीति मूर्तिमंत समोर उभी असल्याने त्याला तात्पुरता आत्मलोप करून घेणें भाग पडे आणि संपूर्ण जीवनाचा स्वतंत्रपणें उप-भोग घेण्याऐवजी दुय्यम स्वरूपाने जीवनाचा कांही भाग व्यापूनच समा-धान मानून घ्यावें लागे; पण असें करण्याचें आपल्याला भाग पडावें, हें त्याला सहन होत नव्हतें. शरच्चंद्राने इतकें उद्विग्न होऊन पडून राहावें व आपला इतका तिरस्कार करावा याचा त्याला अतिशय राग येई. म्हणूनच तो माकडासारख्या माझ्या चेष्टा करी, माझ्या पुस्तकांच्या पानां-वर अभद्र अपशब्द माझ्याच हस्ताक्षरांनी लिहून ठेवी, माझ्या वडिलांचीं पत्रें जाळून टाकी, त्याचा फोटो फोडून टाकी. खरोखर त्याला मृत्यूची इतकी भीति जर वाटत नसती, तर माझा सत्यानाश करण्याकरितां त्याने स्वतःचाही नाश करून घेतला असता. पण आपल्या जिवावरची त्याची आसक्ति मोठी विलक्षण होती. ह्यापुढेही जाऊन मी तर म्हणतों की, जरी त्याचा मला इतका तिरस्कार वाटतो, त्याचा नुसता विचार

आला तरी उद्वेग उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाही, तरीही त्याची आपल्या जिवावरची आसक्ति व त्यांतील क्षुद्रपणा यांची मला आठवण झाली, आत्महत्या करून त्याचा नाश करण्याची माझ्या अंगीं शक्ति आहे याची त्याला कशी भीति वाटते हें लक्षांत आलें, म्हणजे मला सुद्धा त्याची मनापासून कीव करावीशी वाटते.

हें वर्णन अधिक लांबविण्यापासून कांही फायदाही नाही आणि तितका मला वेळही नाही. मी इतकेंच सांगतों की माझ्याइतक्या तीव्र मानसिक वेदना आजपर्यंत कोणालाही सहन कराव्या लागल्या नसतील. तरीही सवयीमुळे, ह्या वेदना सहन करण्याच्या बाबतींत अंतःकरण निर्ढावून गेलें—त्या कमी झाल्या असें मुळीच नाही—पण त्या नाहीशा करण्याची आशा नसल्यामुळे मुकाट्याने सहन करण्यास मी शिकलो. माझी ही शिक्षा वर्षानुवर्षे अशीच चालू राहिली असती, पण आता जें शेवटचें संकट माझ्यावर कोसळलें आहे त्याने माझी आणि माझ्या मूळच्या स्वरूपाची व स्वभावाची कायमची ताटातूट केली आहे. पहिल्या प्रयोगाच्या वेळीं आणलेल्या औषधांचा साठाच आजपर्यंत मला पुरत होता. त्यांतील एक द्रव्य आता संपत आलें होतें. मी तें नवीन विकत आणलें आणि मिश्रण तयार केलें; नेहमीसारखा फेस आला आणि एकदा रंग बदलला, पण रंगांत दुसऱ्यांदा होणारा बदल घडून आला नाही. मी तें मिश्रण पिऊन टाकलें. पण त्याचा कांही उपयोग झाला नाही. त्या औषधाकरितां सारी मुम्बई मी कशी पालथी घातली हें विठोजी तुला सांगेल. पण व्यर्थ. मला आता असें वाटूं लागलें आहे की मूळचें जें औषध मी आणलें होतें तेंच थोडें अशुद्ध असावें; त्यांत कोणत्या तरी अज्ञात द्रव्याची भेसळ असावी आणि त्या अज्ञात अगर अशुद्ध द्रव्यामुळेच माझे आजपर्यंतचे प्रयोग यशस्वी होत आले असावेत.

सुमारें एक आठवडा होऊन गेला आहे. पूर्वीच्या शिलकी औषधाचा शेवटचा डोस मी घेतला आहे आणि त्याचा अंमल शिल्लक आहे तेवढ्यांतच माझें हें आत्मनिवेदन मी पुरें करून टाकीत आहें. परमेश्वराने एखादा चमत्कारच घडवून आणला तर गोष्ट निराळी, नाही तर डॉ. शरच्चंद्राची पूर्वीची मनोवृत्ति यापुढे केव्हाही परत येणार नाही; त्याची

पूर्वीची चर्या–आणि ती आता किती बदलून गेली आहे–त्याला आरशांत पुनः केव्हाही दिसणार नाही! माझें लिखाण संपविण्यांत सुद्धा मला फार विलंब करून उपयोगी नाही. कारण आजपर्यंत हें कृष्णरावाच्या तावडींतून सुरक्षित राहिलें याचें मुख्य कारण माझी सावधगिरी आणि त्याच्या जोडीला माझें सुदैव. मी हें लिहीत असतांना जर माझ्या शरीराचें रूपांतर घडूं लागलें तर कृष्णराव त्याचे तुकडे तुकडे करून टाकील, पण तो येण्याच्या पूर्वी कांही काल हें लिहून एकीकडे ठेवून दिलेलें असलें तर सुडाकरितां हपापलेल्या त्याच्या मर्कटवृत्तीच्या तावडींतून हें लिखाण सुरक्षित राहण्याचा पुष्कळ संभव आहे. कारण त्याचा स्वार्थीपणा इतका कमालीचा विलक्षण आहे, डोळ्यासमोर दिसेल तिकडेच लक्ष देण्याची त्याची वृत्ति इतकी कोती आहे! आमच्या दोघांच्याही मानेवर काळाची पकड बसूं लागली आहे. त्याच्या मनावरही त्याचा परिणाम होऊं लागला आहे. आणि त्याचा नक्षाही पुष्कळ उतरला आहे अवघ्या अर्ध्या तासानंतरच त्या दुष्टाचें स्वरूप मी कायमचें धारण करीन आणि त्यानंतर भीतीने कापत, दुःखाने आक्रोश करीत या खुर्चीवर मला कायमचें बसून राहावें लागेल; अथवा माझ्या या खोलीत, पृथ्वीवरील माझ्या या अखेरच्या निवासस्थानांत, भीतीने कान टवकारून व्याकुळ चित्तवृत्तीने प्रत्येक लहानसान आवाजांनाही धोक्याच्या सूचना मानून त्यांच्याकडे लक्ष देत, फेऱ्या घालीत, हिंडावें लागेल! कृष्णराव अखेर फाशी जाणार का? का अगदी शेवटच्या घटकेला आत्महत्या करण्याइतकें धैर्य त्याला होईल? देव जाणे काय होईल तें! मला त्याची पर्वा नाही. माझा स्वतःचा खरा मृत्यु आताच होत आहे. यापुढे जें घडेल त्याच्याशीं माझा संबंध नाही, दुसऱ्या कोणाचा तरी आहे. इतकें लिहून लेखणी खाली ठेवून माझें आत्मनिवेदन मी पूर्ण करीत आहें आणि त्याचबरोबर त्या दुर्दैवी डॉक्टर शरच्चंद्राच्या जीवनाचा अंत करीत आहें.

समाप्त

# मन्थन

## लेखक, नरहर लक्ष्मण आठवले

मनुष्याच्या मनांत वास करणाऱ्या दोन प्रकारच्या मनोवृत्तींना अनुलक्षून छांदोग्य उपनिषदांत एक सुन्दर रूपक दिलें आहे. " देव आणि असुर दोघेही संग्राम करिते झाले. त्या प्रसंगीं असुरांस आम्ही पराभूत करूं अशा अभिमानाने देव उद्गीथाची उपासना करते झाले. देवांनी नासिकेंतील घ्राण संज्ञक प्राणाच्या रूपाने उद्गीथाची उपासना केली. त्या घ्राणाख्य प्राणाला असुरांनी पापाने वेध केला. म्हणून घ्राणाख्य प्राण सुगंधि व दुर्गंधि दोन्हीचा वास घेतो. नंतर (क्रमाने) वाक्, चक्षु, श्रोत्र व मन यांच्या रूपाने देवांनी उद्गीथाची उपासना केली; पण त्या सर्वांना असुरांनी पापाने वेध केला, म्हणून त्या त्या इंद्रियांनी चांगलीं व वाईट अशीं दोन्ही प्रकारचीं कर्मे लोक करतात. नंतर मुख्य जो प्राण त्याच्या रूपाने देवांनी उद्गीथाची उपासना केली. त्या प्राणाच्या समीप जाऊन असुर नाश पावले. फोडतां न येणाऱ्या कठीण पाषाणाप्रत प्राप्त होऊन मातीचें ढेकूळ विनाश पावतें त्याप्रमाणे असुर नाश पावले."

मनुष्याच्या मनांतील सत्प्रवृत्ति आणि असत्प्रवृत्ति यांच्या अखंड चालू असलेल्या कलहाला अनुलक्षूनच देव व असुर यांचा युद्धप्रसंग वर वर्णिलेला आहे असें त्या संग्रामाचें स्पष्टीकरण भाष्यकारांनी केलें आहे. गीतेंत दैवी व आसुरी संपत्तीचें वर्णनही या दोन प्रकारच्या मनोवृत्तींनाच अनुलक्षून आहे. हिंदुधर्माप्रमाणें इतर धर्मांच्या ग्रंथांतूनही या सनातन संग्रामाचा उल्लेख प्रामुख्याने आढळतो. सन्मार्गापासून साधकाला च्युत करूं पाहणाऱ्या सैतानाचें वर्णन ख्रिस्ती ग्रंथांत आहे. बुद्ध ग्रंथांत मारावर विजय मिळविण्याचा प्रयत्न प्रत्येकाने करावा म्हणून सांगितलें आहे; अहुर्मज्द व अहरिमन यांच्या झगड्याचा उल्लेखही याच द्विधा प्रवृत्तीला अनुसरून पारशी धर्मग्रंथांतून आढळतो. ललित वाङ्मयांत सुद्धा एकाच व्यक्तीच्या मनांतील या भिन्न वृत्तींच्या संग्रामाच्या आधारावरच किती तरी नाटक–कादंबऱ्यांची उभारणी झालेली असते.

स्टीव्हन्सनची " डॉक्टर जेकील अँड मि. हाईड " ही कादंबरीही अशाच रीतीने एकाच शरीरांत वास करणाऱ्या दोन भिन्न वृत्तींच्या झगडयावर उभारलेली आहे. या वृत्तींच्या संग्रामाला प्राधान्य देऊन, कादंबरीचीं सर्व तंत्रें संभाळून जर ह्या गोष्टींतील कथानकाची मांडणी करण्यांत आली असती तर ती एक उत्कृष्ट कादंबरी झाली असती हें खरें; इतकेंच नव्हे तर स्टीव्हन्सनने प्रथम ही गोष्ट लिहिली तेव्हा सुद्धा त्याच्या कसलेल्या लेखणीने तिला मनोवेधक कादंबरीचींच वस्त्रें चढविलीं होतीं. पण कादंबरी करण्याच्या मोहामुळे तिचें रूपकात्मक स्वरूप नाहीसें झालें होतें ही गोष्ट त्याच्या पत्नीने त्याच्या लक्षांत आणून देतांच ती त्याला पटली व तत्काळ स्वहस्ताने त्याने आपलें हस्तलिखित जाळून टाकलें. अर्थात कादंबरी करावयाची नाही अशा निर्धाराने त्यानंतर पुन: लिहिलेल्या या गोष्टीचें स्वरूप मुख्यत: रूपकात्मकच राहिलें असल्यास नवल नाही.

कादंबरींत तत्त्वचर्चा असावी की नाही याची चर्चा चालून त्यावर मराठी साहित्यिकांत रणें पडत आहेत. सत्याचें प्रतिपादन करणें व जीवनांतील रहस्यावर प्रकाश पाडणें हा कादंबरीचा प्रधान हेतु असल्याने त्यांत तत्त्वाचें प्रतिपादन अवश्य असलें पाहिजे, असें एक पक्ष म्हणतो; तर केवळ मनोरंजन हेंच ललित वाङमयाचें मुख्य उद्दिष्ट असल्याने त्यांत तत्त्वचर्चेला प्राधान्य नाही असें विरुद्ध पक्षाचें म्हणणें आहे. कादंबऱ्यांतून तत्त्वचर्चा असली तर अर्थात् त्यास ह्या दुसऱ्या पक्षाची हरकत नाही पण तिने आपली पायरी संभाळूनच वागावें, कलेला विसंगतता आणूं नये व मनोरंजकतेला बाध येऊं देऊं नये असा त्यांचा आग्रह असतो. एखाद्या मनोहर चित्रांतील मुख्य वस्तु किंवा आकृति खुलून दिसण्याकरितां त्याला अनुरूप अशी पार्श्वभूमि चित्रित करून एखादा कुशल चित्रकार त्या चित्राच्या सौंदर्यांत भरच घालतो; त्याप्रमाणें कादंबरींतील मुख्य घटनेच्या कलात्मक सौंदर्याला अधिक खुलवून दाखविण्यापुरताच तत्त्वचर्चेचा उपयोग कादंबरींत असावा असा निर्बंध ते घालूं इच्छितात.

या दृष्टीने प्रस्तुतच्या कादंबरीकडे पाहिलें तर एक मनोरंजक कादंबरी म्हणून तिचा अनुक्रम फारसा वर लागणार नाही. कारण वर उल्लेखिलेलें चित्रकाराचेंच उदाहरण द्यावयाचें तर असें म्हणतां येईल

की ह्या कादंबरींत मुख्य घटना व पात्रें हीं सर्व पार्श्वभूमींत बसवून टाकून मुख्य तत्त्वाचें दिग्दर्शन हेंच अधिक उठावदार रीतीने लेखकाने चित्रित केलें आहे. ती तत्त्वचर्चा खुलून दिसावी, वाचकांना पटावी व त्यांच्या हृदयावर तिचें कायमचें प्रतिबिंब उठावें या हेतूने तिला एका कथासूत्रांत गोविली आहे इतकेंच. पण असें जरी असलें तरी कलेच्या दृष्टीने या कादंबरीचें स्थान कोणत्याही प्रकारें कमी ठरणार नाही. कादंबरीला आवश्यक असणारी सर्व सामग्री तयार असतांना तिचा उपयोग फक्त तत्त्वाचें दिग्दर्शन अधिक परिणामकारक करण्याकडेच करावयाचा अशा निर्धाराने लिहिणारा लेखक कसा सिद्धहस्त (Expert) कलाकार असला पाहिजे, याची कल्पना त्यांतील मर्म जाणणाऱ्यांनाच यावयाची.

पहिल्याच प्रकरणांत कृष्णरावाने तुर्डविलेल्या मुलाची हकीकत वाचतांना वाचकांची जिज्ञासा जागृत होते. आणि या घटनेचा पुढे विकास कसा होतो ह्याची तो अपेक्षा करीत राहतो. कृष्णरावाचा छडा लावण्याचें मनोहरपंत मनावर घेतात. त्यांच्या निष्फळ प्रयत्नांचें वर्णन दोन प्रकरणांत केल्यावर सरदार खंडेराव यांचा खून घडून येतो. ही नवीन घटना पाहून आता या घटनांची गुंफण घडवून एक मनोरंजक कथानक आपणांस वाचावयास मिळेल अशी अपेक्षा साहजिकच उत्पन्न होते. पण कृष्णराव कोण आहे इतकेंच लेखकास सांगावयाचें असतें. त्याच्या कृष्णकृत्यांच्या वर्णनाकडे, किंवा त्यापासून घडून येणाऱ्या विलक्षण घटनांकडे, त्यांचा ओझरता व अस्पष्ट उल्लेख करण्यापलीकडे, तो वाचकांचें लक्ष वेधीत नाही. कृष्णरावाच्या रहस्यमय स्वरूपासंबंधीं थोड्या थोड्या सूचना देत जाऊन वाचकांच्या जिज्ञासेची तार अधिक ताणली जाते व अखेर कमलाकांताच्या निवेदनाने सर्व खुलासा होतो. त्यानंतर ह्या सर्व विचित्र घटनेचें रहस्य उलगडणें, तिचे हेतु व उद्देश स्पष्ट करणें व पूर्वीच्या सर्व कथानकावर नवा प्रकाश पाडणें हीं कामें शरच्चंद्राच्या आत्मनिवेदनाने घडून येतात. आपल्या उद्दिष्ट तत्त्वाचें प्रतिपादन करण्यास जरूर नसलेल्या परिस्थितीचा किंवा घटनांचा उल्लेख करण्याचें सुद्धा लेखकाने काळजीपूर्वक टाळलें आहे. मग त्या घटनांची कार्यकारणसंगति जुळवून मनोरंजक कादंबरी करण्याचें तर लांबच राहिलें.

मनुष्य पाप करण्यास का प्रवृत्त होतो हा प्रश्न कांही आजकालचा नाही. पांच हजार वर्षांपूर्वीच अर्जुनाने विचारलें की, ' अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः । ' आजकालच्या मानसशास्त्रज्ञांपुढे या प्रश्नाचें भूत उभें आहे व त्यांच्या सर्व मति कुंठित करून टाकून तें उन्मत्ततेने वावरत आहे. आणि ह्या दोन टोकांच्या मधील दीर्घकालांत उत्पन्न झालेल्या सर्व तत्त्वज्ञांनी आपापल्या मताप्रमाणे त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. मनुष्य सर्वस्वीं परतंत्र आहे, त्याच्या सर्व इच्छा, आकांक्षा आणि क्रिया दैवाधीन आहेत असें म्हणून या प्रश्नाचें निराकरण करण्याचा प्रयत्न कांही लोक करतात. त्यांच्या मतें मनुष्य कांहीच करीत नाही, वृथा अहंकाराने ह्या सर्व क्रियांच्या कर्तृत्वाचा भार तो आपल्या डोक्यावर ओढून घेतो. दुसरा पक्ष प्रारब्ध आणि संचित कर्माला महत्त्व देतो. पूर्वजन्मार्जित कर्माचीं फळें भोगावीं लागतातच आणि त्यास अनुसरूनच क्रिया करण्याच्या वृत्ति आपल्या मनांत उत्पन्न होतात असें या पक्षाचें म्हणणें आहे.

मनुष्य हा पशुकोटींतून क्रमाने उत्क्रांत होत जाऊन आजच्या स्थितीस आला आहे; अर्थात त्या त्या अवस्थांतील वृत्ति अद्याप बीजरूपाने त्याच्या मनांत वावरत असतात व त्या तृप्त करण्याकरिता तो ज्या क्रिया करतो त्यांनाच आपण पाप म्हणतों. त्या त्या योनींत किंवा अवस्थेंत प्राण असतांना त्या वृत्ति त्याला उपकारक झाल्या होत्या म्हणून त्या त्याच्या मनांत इतक्या खोलवर रुजल्या आहेत की त्या अद्यापही तो सोडूं शकत नाही. मनुष्याच्या स्वभावसिद्ध सहजप्रवृत्तीवर भर देणारा हा पक्ष म्हणतो की 'खाना, पीना, सुखसे सोना' ही प्रवृत्ति प्राणिमात्रांत दिसून येते आणि त्यास अनुसरूनच मनुष्य वागत असतो.

परिस्थितीलाही महत्त्व अगदी नाही असें नाही. ह्या मूळच्या मनुष्याच्या मनोवृत्तींना शिक्षण देऊन, किंवा योग्य वळण लावून आजच्या समाजांत त्याने व्यवस्थित वागावें अशी त्याची मनोवृत्ति बनविली जाते. पण योग्य शिक्षणाच्या अभावीं, त्याच्या पूर्वीच्या मनोवृत्ति वर डोकें काढतात आणि त्याला वाममार्गाला ओढून नेतात.

मनुष्य हा सर्वस्वीं स्वतंत्र आहे असें म्हणणारा एक पक्ष आहे. तो जें जें कांही पाप पुण्य करतो तें सर्व स्वतःच्या इच्छेने करतो, अर्थात्

तो त्याबद्दल स्वतःच जबाबदार आहे, असें या पक्षाचें म्हणणें.

ह्या अनेक पक्षोपपक्षांमध्ये सत्य कोणाच्या वाट्यास जाईल हें सांगणें कांही सोपें नाही. कदाचित सर्वच मतांत थोडेंबहुत सत्य असावें आणि मनुष्याच्या मनोवृत्तीवर ह्या सर्वच गोष्टींचा थोडाबहुत परिणाम घडून येऊन त्याची सध्यांची मनोवृत्ति बनली असावी. मनुष्याच्या मनांतील सर्व वृत्ति, इच्छा, आकांक्षा, विकार, भावना, इत्यादींचे स्थूलमानाने दैवी व आसुरी असे दोन वर्ग पाडले तर मनुष्याच्या मनावर केव्हा एका प्रकारच्या वृत्तींचा तर केव्हा दुसऱ्या प्रकारच्या वृत्तींचा पगडा बसलेला आढळून येईल. एका क्षणीं त्याग, सत्य, प्रेम, शांति या भावना उचंबळून येतील, सर्व जगाकडे शांतचित्ताने, आनंदी वृत्तीने मनुष्य पाहूं लागेल, तर दुसऱ्या एखाद्या वेळीं दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, इत्यादि विकारांच्या तो आधीन होऊन त्या विकारांबरोबर तो वाहवत जाईल. पुण्य व पाप यांचें आदिकारण कोणतें या प्रश्नाचा पुरा उलगडा या उपपत्तीने कदाचित् होत नसेल; पण वस्तुस्थिति काय आहे, एकाच मनुष्याचें वर्तन निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळें कसें असतें, एखाद्या अट्टल दरोडेखोराच्या अंतःकरणांतही कोमल भावनांचा मधुर झरा सूक्ष्मपणें कसा वाहत असतो व दुसरा एखादा सभ्यगृहस्थही विकारांच्या तावडींत सापडून प्रसंगीं कसा घसरतो याचें स्पष्टीकरण मात्र अगदी स्पष्ट होतें.

अर्जुनाने विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देतांनाही भगवंतांनी हेंच कारण सांगितलें आहे. रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या कामक्रोधादि विकारांमुळेच मनुष्य पाप करण्यास प्रवृत्त होतो. हे विकार बळावले म्हणजे मनुष्याचें ज्ञान झाकून जातें, तो त्या विकारांच्या आधीन होतो व पाप करतो, हा भगवंतांच्या उत्तराचा सारांश आहे. दुसऱ्यावर स्वामित्व गाजविण्याची इच्छा आणि भोगाची वासना ह्या दोन वृत्तीच मनुष्याच्या सर्व प्रकारच्या क्रियांना आधारभूत असतात असें आधुनिक मानसशास्त्रज्ञही मानतात. दुसऱ्यावर स्वामित्व प्रस्थापित करण्याची इच्छाच क्रोधाच्या मुळाशीं असते तर भोगाच्या वृत्तीलाच काम हें नांव दिलें जातें. रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या या दोन वृत्तीच आसुरी संपत्तींत प्राधान्येंकरून असतात आणि यांच्या बळानेच मनुष्य पाप करतो.

दैवी आणि आसुरी अशा दोन्ही वृत्ति मनुष्याच्या मनांत असतात हें खरें. पण म्हणून एकाच मनाच्या या दोन वृत्ति मानावयाच्या की हे दोन स्वतंत्र जीवात्मे एकाच शरीरांत वास करतात असें म्हणावयाचें? कांही अपवादभूत थोड्या उदाहरणांत ह्या दोन जीवांमधील अंतर इतक्या थराला गेलेलें असतें की, त्यांना स्वतंत्र जीवात्मे मानणें भाग पडतें. पण सामान्यतः सर्व मनुष्यांत ह्या दोनही वृत्ति दिसतात, त्या वेळीं कोणत्याही एका वृत्तीचा सर्वस्वी विसर पडलेला नसतो. कोणत्याही वृत्तीच्या अंमला खाली असतांना केलेलीं कृत्यें आपणच केलीं आहेत याची पूर्ण जाणीवही आपणांस असते. विकाराचा भर ओसरल्यावर पश्चात्तापाचा भर येतो आणि अशा वेळीं दुष्ट वृत्तीच्या तारेंत केलेल्या चुकांचें शक्य तितकें परिमार्जन करण्याचाही आपण पुष्कळ वेळां प्रयत्न करतों.

सामान्य मनुष्याचा ओढा आसुरी वृत्तीचें नियमन करून दैवी वृत्ति वाढविण्याकडे असतो व त्या हेतूने विचार करून किंवा समाजाच्या नियमांचें व लोकमताचें दडपण पाडून मनुष्य आपल्या आसुरी वृत्तींना पुष्कळ वेळां आवरूं शकतो. पण खरी गोष्ट अशी असते की त्या वृत्ति सूक्ष्मपणें अंतःकरणांत वास करीत असतात आणि प्रसंग पाहून निराळ्या वेषाने उत्पन्न होऊन मनुष्याची फसवणूक करूं पाहतात. त्या वृत्तीविषयीं-ची थोडीशीही आवड सूक्ष्मपणें शिल्लक आहे तोंपर्यंत त्या आसुरी वृत्ति नाहीशा झाल्या असें म्हणतां येणार नाही. आणि त्याचा प्रत्यक्ष पुरावा मनुष्याच्या स्वप्नांत दिसून येतो. जागृतावस्थेंत स्वतःचे विचार किंवा लोकमत प्रभावी असल्याने ज्या वृत्ति दडपलेल्या असतात, त्या वृत्ति स्वप्नांत उन्मत्ततेने वावरतांना आढळतात, कारण त्या वेळीं विचारशक्ति सुप्त स्थितींत असते आणि लोकमताचा प्रभाव भासूं शकत नाही. जागृता-वस्थेंत ज्या दैवी वृत्तींचा प्रभाव मनुष्याच्या वागण्यांत दिसतो त्याच वृत्ति प्रधान व प्रभावी असल्याचा जोंपर्यंत स्वप्नांत अनुभव येत नाही, तुकाराममहाराज म्हणतात त्याप्रमाणें 'जागृताचा नाही, अनुभव स्वप्नीं' तोंपर्यंत आसुरी वृत्तींचा बीमोड झाल्याची खात्री बाळगतां येणार नाही.

मनुष्याच्या मनांतील दैवी व आसुरी वृत्तींचें परिवर्तन दाखविणें व त्यांचा जोर वाढला असतांना मनुष्याचें वर्तन कसें बदलतें हें स्पष्ट

दाखवून देऊन शक्य तर धोक्याची सूचना देऊन पतन पावत असलेल्या, फसत चाललेल्या मनुष्याला सावध करणें, हाच या कादंबरीचा मुख्य उद्देश आहे. मनुष्य स्वेच्छेने आपल्या वृत्ति बदलूं शकतो, हें दाखविण्याकरितां औषधाचा आध्यात्मिक क्षेत्रांत उपयोग करून वृत्तींतील हा बदल घडलेला दाखविण्याचा लेखकाचा प्रयत्न म्हणजे कल्पनेची फार उंच भरारी आहे हें खरें, पण शास्त्रीय प्रगति वाढत जाऊन नवीन शोध लागत ज।तील व कदाचित् ही कल्पना सत्यसृष्टींत उतरूंही शकेल. अंत:स्रावक ग्रंथींवर आज जे शास्त्रज्ञ परिश्रम करीत आहेत त्यांना ह्या ग्रंथींचे अर्क पोटांत घेऊन किंवा त्यांवर शस्त्रक्रिया करून मनुष्याचा स्वभाव बदलतां येईल ही गोष्ट अगदीच आकाशपुष्पासारखी अशक्य वाटत नाही, हें तर आहेच. पण सुरुवातीस मनुष्य पापी वासनांना थारा देतो तो पुष्कळसा स्वत:च्या इच्छेने, हें दाखविण्याचाच लेखकाचा मुख्य हेतु असावा.

एकदा ही रूपांतराची कल्पना स्वीकारल्यानंतर तें रूपक पूर्णपणें यथातथ्य रेखाटणें यांत दिसून येणारें लेखकाचें कौशल्य वाखाणण्यासारखें आहे. 'ध्यायतो विषयान्' येथून सुरुवात करून 'प्रणश्यति' पर्यंतच्या सर्व पायऱ्या, मध्यंतरींचा जीवाचा सर्व प्रवास, त्यांतील सूक्ष्म खाचखळग्यांसह कसा होत जातो, याचें तें एक रमणीय पण भयानक शब्दचित्र आहे. वरून सज्जनतेचा आव आणून अंतरांत बाळगून ठेवलेल्या पापी वृत्ति, त्यांना फारसा वाव न मिळाल्या कारणाने विशेषशा पोसलेल्या नसतात. कृष्णराव गुप्तेही सुरुवातीस किती ठेंगणा आणि तरुण दिसत होता. पण सवड सापडतांच त्याचा विकास होऊं लागला. आणि वाढत जाऊन क्रमाक्रमाने त्याने शरच्चंद्राचें सर्व क्षेत्र व्यापलें. दुष्ट वृत्तीच्या प्रभावाची, त्यांच्या मगरमिठीची कल्पना नसलेला शरच्चंद्र सुरुवातीस मनोहरपंतांना किती ऐटीने आश्वासन देतो की "मी वाटेल त्या वेळीं कृष्णरावाला धुडकावून लावीन." पण अखेर तो शरच्चंद्र किती दीन होतो, "अरे देवा" म्हणून कसा व्याकूळ होऊन प्राण सोडतो याचें करुणचित्र दगडाच्या हृदयालाही पाझर फोडील. सुरुवातीस स्वत:च्या इच्छेने, केवळ हौस किंवा गंमत म्हणून धारण केलेल्या या पापी वृत्ति हळूहळू हात पाय पसरूं लागतात आणि आपला मार्ग चुकत तर नाही ना, याची खात्री करून

घेण्याची इच्छा जीवाला होते. एक दिवस अनिच्छेने कृष्णरावाचें आगमन झालेलें पाहतांच शरच्चंद्र घाबरतो. पापी वृत्तींचा पगडा अधिकाधिक बसत चालल्याची त्याला जाणीव होते. त्याच्या पुढे दोन रस्ते दिसूं लागतात. जीवनाच्या मार्गावरून प्रवास करीत असतांना आपल्या रस्त्याला दोन फाटे फुटलेले त्याला दिसतात. पाप की पुण्य, देव की असुर, कोणाचा स्वीकार करावयाचा? शरच्चंद्र की कृष्णराव, हा प्रश्न त्याच्यापुढे उभा राहतो आणि त्याचें ठराविक उत्तर तो देतो. तो पुण्याचा, दैवी संपत्तीचा मार्ग स्वीकारतो, पण त्या मार्गावर टिकून राहण्याचें सामर्थ्य संपादन करण्याची मात्र कांहीही योजना तो करीत नाही.

पापाची एकदा लागलेली चटक म्हणजे यंत्रांत सापडलेलें बोट. दिवसामागून दिवस जाऊं लागतात, आणि संयमाची तीव्रता कमी होऊं लागते. नाना प्रकारचीं प्रलोभनें पुढे येतात. आसुरी वृत्ति निरनिराळीं वेषांतरें करून मनाला मोह पाडतात आणि त्या सर्वांच्या मार्‍यापुढे जीवाचा पाय घसरून तो त्यांना बळी पडतो. शरच्चंद्र पुनः एकदा, फक्त एकदाच, औषध पोटांत घेतो आणि कृष्णरावाला आपलें भयंकर स्वरूप प्रकट करण्याची व आपल्या पापी वासना दुप्पट अवसानाने तृप्त करण्याची संधि प्राप्त होते. याचा तो कसा पुरेपूर फायदा घेतो, मांत्रिकाच्या तावडींतून सुटलेल्या भुताप्रमाणें कसा धिंगाणा घालतो, याचें नमुन्यादाखल फक्त एकच उदाहरण लेखकाने दिलेलें आहे. पण तें इतकें भयंकर आहे की तें वाचतांच अंगावर शहारे येतात.

आणि या पापी वृत्तीचा पगडा केव्हा कसा बसेल याचा नेम कधीच सांगतां येत नाही. सर्व वातावरण शांत व आनंदी होतें व शरच्चंद्र एका झाडाखाली बागेंत सुखांत बसला होता, इतक्यांत कृष्णराव उत्पन्न झाला. मनुष्याच्या मनांत ध्यानीं मनीं स्वप्नींही नसतांना पापविचार येऊन कसे उभे राहतात आणि मग त्या पापविचारांना लपवितांना व त्या पापांच्या परिणामांना चुकवितांना जीव कसा बेजार होतो, याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजेच शरच्चंद्राचे त्या दोन दिवसांतले मानसिक क्लेश व कमलाकांताला लिहिलेल्या पत्रांत स्वच्छ उठून दिसणारें त्या क्लेशांचें मूर्तिमंत प्रतिबिंब.

पापी वृत्ति बळावत चालल्या की त्याच प्रमाणांत सद्‌वृत्तींचा लोप

झालाच. "कृष्णरावाला मी वाटेल तेव्हा घालवून देईन" ही घमेंड तर केव्हाच जिरते. आता शरच्चंद्राची सर्व शक्ति त्याच्याशीं झगडण्यांत खर्च होते आणि इतकेंही करून तो आपलें डोकें वर काढूं शकत नाही. ज्या औषधाच्या जोरावर तो प्रथम इतक्या उडया मारीत होता व आतासुद्धा ज्याच्या बळावर तो सद्वृत्तीचें थोडेंसें सोंग शिल्लक राखूं शकत होता तें औषधच त्याला अखेर दगा देतें आणि त्याचा स्वतःचा कायमचा अंत होतो. पापी वृत्तींच्या जोराखाली सद्वृत्ति नाहीशा होतात इतकेंच नव्हे तर त्यापुढे पापी वृत्ति हेंच जीवाचें कायमचें स्वरूप होऊन जातें, सद्वृत्तीचा अंशही शिल्लक राहत नाही, राखणें शक्यही होत नाही. पापी वृत्तीच्या मनुष्य इतका आधीन होतो की पुढे त्याचें सारें आयुष्य आपल्या कर्माचीं कटु फळें भोगण्यांत जातें. आपल्या स्वतःच्या सामर्थ्यावर अंधविश्वास ठेवून मनुष्य म्हणतो, की मी माझीं दुर्व्यसनें, माझे पापी विचार वाटेल त्या वेळी सोडूं शकेन; पण त्याचें हें सामर्थ्यच अखेर त्याला दगा देतें. कारण मनांत पापविचार बाळगून ह्या सामर्थ्याच्या मुळावरच त्याने घाव घातलेला असतो. झाडाच्या फांदीवर बसून त्याच फांदीवर घाव घालणारा मनुष्य म्हणतो की माझें स्थान स्थिर आहे. पण आपल्याच कृत्याने तें तो नाशवंत करीत असतो. डॉक्टर शरच्चंद्राचें औषध सुरुवातीस गुणकारी वाटलें तरी अखेर निरुपयोगीच ठरतें आणि तो कायमचा कृष्णराव बनतो.

मानसिक विचारांची सृष्टि निराळी आणि बाह्य आचारांची निराळी असें मानून पुष्कळसे जीव या दोन सृष्टींत एकाच वेळीं वावरण्याचा प्रयत्न करतात. अशा दुहेरी जीवनाचे परिणाम कोणते होतील हें या रूपकाने फार मार्मिकपणें दाखवून दिलें आहे. अलीकडे मनोविज्ञानशास्त्राची पुष्कळच वाढ होत चालली आहे; त्याचा व्यासंग करणारे शास्त्रज्ञ सांगतात, की Amnesia नांवाचा स्मृतींत खंड पाडणारा, स्मृतिभ्रंशाचा जो मानसिक रोग अलीकडे पाश्चात्य सुसंस्कृत समाजांत वाढत चालला आहे, त्याचें मुख्य कारण हें दुहेरी जीवन आहे. एका प्रसिद्ध बँकेंतील विश्वासू अधिकारी संध्याकाळीं तीसचाळीस हजारांच्या नोटा शांतपणें खिशांत घालून परागंदा होतात आणि दुसऱ्या गावांत नांवगाव बदलून निराळ्या वेषाने निराळा उद्योग करूं लागतात. अशा स्थितींत किती तरी दिवस

जातात. एके दिवशीं त्यांच्या मनाला जोराचा धक्का देणारी, पूर्वस्मृति जागृत करणारी एखादी गोष्ट घडते. ते भानावर येतात व आपलें नांव, गाव, धंदा वगैरेची त्यांना आठवण होते. एखादा सच्छील धर्माधिकारी दुसरीकडे दुकान घालतो तर एखादा शेतकरी सैन्यांत दाखल होऊन आपल्या अतृप्त वासना पुरवून घेतो. पूर्वस्मृति जागृत करणारा मोठा धक्का बसला की हे स्मृतिभ्रष्ट रोगी भानावर येतात आणि जणू काय मध्यंतरींचें जीवन कांही नव्हतेंच अशा भावनेने आपल्या पूर्वीच्या जीवनाचा धागा जेथे सोडला असेल तेथून पुनः हातीं धरतात. मनांतील दाबून ठेवलेल्या व गुप्तपणें जोपासना केलेल्या वासना ह्याच अशा स्मृतिभ्रंशाचें मुख्य कारण आहे असें मानतात.

डॉक्टर शरच्चंद्राला कांही स्मृतिभ्रंशाचा रोग झाला नव्हता. आपल्या अतृप्त वासनांना तृप्त करण्याकरितां गुप्तपणें दुसरें जीवन गाळण्याकरितां स्वतःच्या राजीखुशीने व अक्कलहुशारीने त्याने हें औषध शोधून काढलें होतें व त्याच्या योगें आपल्या दुसऱ्या जीवनाचा स्वतःच्या इच्छेप्रमाणे तो उपभोग घेत होता. महाभारतांतील तपःश्रेष्ठ किंदिम ऋषीला सुद्धा आपली अनावर वासना मनुष्यशरीराने तृप्त करण्याची लाज वाटली म्हणून ती तृप्त करण्याकरितां योगसामर्थ्याने मृगाचें रूप धारण करून तो मृगींमध्ये फिरत असे. ऋषीच्या रूपाने उच्च आध्यात्मिक जीवनाचा अनुभव घेणें आणि मृगाच्या शरीराने मनाच्या इतर वासना तृप्त करणें हें दुहेरी जीवन त्याला प्रथमतः सोयीचें वाटलें असेल. पण अखेर आपल्या या दुटप्पी वृत्तीच्या पायीं त्याला पंडूच्या बाणाला बळी पडावें लागलें. आणि या ऋषीचें उदाहरण प्रत्यक्ष डोळ्यासमोर घडलें असतांही पंडु आपल्या वासना कोठे निर्मूल करूं शकला ? परिणामीं तो सुद्धा आपल्या विकारांनाच बळी पडला ही गोष्ट व्यासांनी ऋषिशापाच्या निमित्ताने मोठ्या खुबीने दाखविली आहे. आपल्या क्षुद्र वृत्तीचें उच्चाटन करून, मोठ्या हिम्यानें, एका घावाने त्यांना तोडून टाकून उच्च मनोवृत्तींची जोपासना करावयाची हाच अशा ठिकाणीं खरा राजमार्ग असतो.

पण उच्च संस्कारी जीवनाचा मोह सुटत नाही व क्षुद्र पशुवृत्ति आवरत नाहीत अशा द्विधा आपत्तींतून सुटण्याकरितां शरच्चंद्राच्या मताने

दुहेरी जीवन घालविणें हाच त्याला राजमार्ग सापडला होता. त्या मार्गा-वरून सावध करणाऱ्या सूचना त्याला मिळाल्या. पण दारू पिऊन बेहोष झालेला एंजिनड्रायव्हर सर्व तांबड्या कंदिलांना न जुमानतां गाडी दामटतो आणि प्राणास मुकतो, त्याचप्रमाणें वासनांच्या मदानें धुंद झालेला शर-च्चंद्रही ह्या सूचनांचा अर्थ समजून सुद्धा तिकडे दुर्लक्ष करतो आणि आपल्या दुहेरी जीवनाचे परिणाम भोगतो. आत एक व बाहेर दुसरें, हा आत्म्याचा स्वभाव नाही; असत्य ढोंगी जीवन आध्यात्मिक नाशच घडवून आणील हें ह्या कादंबरींत जितकें स्पष्ट व परिणामकारक रीतीने दाख-विलें आहे, तितकें इतरत्र क्वचितच पाहावयास मिळेल.

मनुष्याच्या दुहेरी जीवनाचें हें चित्र अगदी बारीक सारीक तप-शिलांत सुद्धा पूर्णपणें रेखाटलें आहे. कृष्णराव किती बेगुमानपणें पापें करतो आणि धृतराष्ट्रासारख्या कमकुवत बापाप्रमाणें आपल्या या लाडक्या दुर्योधनाने केलेलीं पापें शरच्चंद्र कशीं निस्तरीत बसतो हें वर्णन वाचलें म्हणजे पापें करतांना आपण कसे निष्काळजी राहतों व मागाहून पश्चा-त्ताप करीत त्याची कशी भरपाई करतों याची ओळख पटते. आपली पापी वृत्ति छपविण्याकरितां वरून सज्जनतेचा दुप्पट आव माणसें कसा घालतात व मनांतील पाप डाचत असल्याने अधिक धर्मनिष्ठ दिसण्याचा प्रयत्न कसा करतात, याचें पूर्ण वर्णन कृष्णराव गुप्ते गुप्त झाल्यानंतरच्या शरच्चंद्राच्या जीवनांत हुबेहूब रेखाटलें आहे. पापीवृत्ति कशा अदूरदर्शी असतात, आजचें साधलें, उद्याचें उद्या या वृत्तीनेच ते लोक कसे वागतात, हें कृष्णरावाच्या चरित्रांत उघड दिसून येतें. इतकें की स्वतःचा वारसा-हक्क काढून घेणारें मृत्युपत्र स्वतःच्या ताब्यांत असूनही तें दृष्टीसमोर नाही येवढ्याच कारणाकरितां तें तो सुरक्षित ठेवतो, नाहीसें करीत नाही. शरच्चंद्राच्या नित्य पाठांतील धार्मिक ग्रंथांवर अभद्र शब्द लिहून ठेवण्याचा उद्योग कृष्णरावाला सुचावा यांत तर कांहीच नवल नाही. सज्जनांची आडून निंदा करणें, आपल्या निंदेनें त्यांचा केस सुद्धा वाकडा होऊं शकणार नाही हें पुरें माहीत असूनही केवळ त्यांची निंदा आपण केली या कृत्यांतच समाधान मानणें हा जगांतील सर्व हीन वृत्तींच्या लोकांचा सामान्य स्वभाव आहे.

मनुष्याच्या मनोवृत्तींत दैवी व आसुरी अशा दोन्ही वृत्तींचें मिश्रण झालेलें असतें हें खरें, तरी त्याचा सामान्य ओढा दैवी संपत्तीकडेच असतो. आसुरी वृत्तीचा त्याला पूर्ण तिटकारा वाटतो; इतका की आसुरी वृत्तीचा मूर्तिमंत अवतार जो कृष्णराव त्याला कोणी जवळ उभें राहूं देत नसे. पहिल्या प्रकरणांतील भावनाशून्य वैद्याला व शांत अंतःकरणाच्या श्यामला-ही कृष्णरावाला पाहतांच शिसारी आली. त्याच्या क्षणभराच्या सहवासा-नेही मनोहरपंतासारख्या थोर व सुशील गृहस्थाच्या मनावर आलेली उद्विग्नतेची छाप किती तरी वेळ गेली नाही. गिरगावांतील त्या मोलकरणी-पासून मनोहर वकिलांपर्यंत जो जो मनुष्य त्याच्या प्रसंगांत येई त्या प्रत्ये-काच्या मनावर कृष्णरावाच्या हिडिसपणाची छाप कायमची पडून राही.

दुष्ट माणसें कांही जगांत थोडीं नसतात. आपल्यापैकी पुष्कळांना त्यांचा सहवास कितीतरी वेळां घडलेला असेल. असें असतांना कृष्णरा-वाच्या भोवताली असें कोणतें जादूचें वलय फिरत होतें की त्याचा इतका भयंकर परिणाम प्रत्येकाच्या अंतःकरणावर व्हावा? ह्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न या कादंबरींतील प्रत्येक पात्राने केला आहे. पण कोणत्याही व्यंगाचा, विद्रूपतेचा किंवा दोषाचा, स्पष्ट उल्लेख एकालाही करतां आला नाही. मनोहरपंतांची बुद्धीच तीव्र, तेव्हा त्यांनी त्याचें वर्णन यथातथ्य करावें हें योग्यच होतें. त्याच्यांत माणुसकीच—मनुष्यत्वच—नाही, या एकाच वाक्यांत त्यांनी कृष्णरावाच्या भोवतालच्या दूषित वायुमंडलाचें यथायोग्य वर्णन केलें आहे. केवळ दुष्ट बुद्धीची, एकजिनसी पापी विचा-रांची, मूर्ति मनुष्याला सहन होत नाही. ज्यांत थोडासाही चांगुलपणा नाही, दैवी वृत्तीचा यत्किंचितही अंश नाही असा मनुष्य आपल्याला कल्पितांच येणार नाही. आणि पापी विचारांचा अर्क काढून त्याची एखादी व्यक्ति तयार केली तर तिला मनुष्य म्हणतां येणार नाही.

केवळ पापाची मूर्तीच अशा एखाद्या व्यक्तीची गाठ पडली तर आपल्याला तिचा कसा तिटकारा येतो याचें शास्त्रीय शब्दांत वर्णन करावयाला कमलाकांतासारखा डॉक्टरच योग्य आहे. एखाद्या रोगाचीं पूर्ण लक्षणें जितक्या काळजीपूर्वक त्याने सांगितलीं असतीं, त्याच वैद्य-कीय पद्धतीने त्याने आपल्या शरीरांत, अशा व्यक्तीची गाठ पडल्या-

नंतर दिसून येणारीं लक्षणें मार्मिकतेने सांगितलीं आहेत. शरीर गार पडून अंगावर काटा कसा येतो, नाडीचे ठोके मंद कसे पडतात याचें वर्णन करूनच तो थांबला नाही; या लक्षणांचें निदानही त्याने केलें आहे. मानवी मनाच्या मुळाशीं असलेल्या अधिक उदात्त मनोवृत्तीशीं त्याने यांचा संबंध लावलेला आहे. मानवी मनाची स्वाभाविक प्रवृत्ति सत्या-कडे—दैवी प्रवृत्तीकडे—असल्याने शुद्ध आसुरी वृत्ति त्याला सहन होत नाहीत असा त्याचा भाव आहे.

जीवनाचा अंतिम आदर्श कोणता याविषयीं अनेकांचीं अनेक मतें असूं शकतील; पण शारीरिक जीवनाचा अंत मृत्यूने होतो हें त्रिकालाबाधित सत्य आहे. ह्या मृत्यूच्या प्रसंगाचें मनुष्य कोणत्या वृत्तीने स्वागत करतो हेंच त्याच्या जीविताची यशस्विता मापण्याचें खरें साधन आहे. त्या दृष्टीने पाहतां शरच्चंद्र आणि कमलाकांत हीं दोन पात्रें मोठ्या खुबीने रंगविलीं आहेत. दोघेही नामांकित व हुशार डॉक्टर आहेत, दोघांचेही संस्कार उच्च दर्जाचे, दोघांच्याही महत्त्वाकांक्षा तेजस्वी व दोघांचेही स्वभाव धीरगंभीर व प्रेमळ आहेत. पण कमलाकांत मनाचा सरळ, अंतःकरणाचा प्रामाणिक, पापभीरु व आस्तिक वृत्तींचा आहे. आपलें जीवन शांत मनाने व सरळपणाने घालवावें; त्यांत मिळणारा सात्त्विक आनंद उपभो-गावा, कोणत्याही प्रकारच्या डावपेचांच्या हातचलाखी करून मृगज-ळाच्या मागे लागूं नये असा त्याचा स्वभाव; तर शरच्चंद्राचें सरळ व सात्त्विक सुखाने समाधान होईना. सात्त्विक आनंदाचें मधुर पक्वान्न तर त्याला हवेंच होतें. पण त्याच्या जोडीला 'तीक्ष्ण, रुक्ष, विदाही' अशा अनेक रसांचा आस्वाद घेण्यासही तो पाहत होता. आध्यात्मिक क्षेत्रांत औषधांचा उपयोग करून त्यांच्या जोरावर शरीरांत व मनोवृत्तींत रूपां-तर घडवून आणावें आणि अशा हातचलाखीने सत्त्वगुणी व रजोगुणी अशा दोन्ही सुखांचा आस्वाद घेतां आल्यास पाहावा हा त्याचा प्रयत्न. आपली ही हातचलाखीची कल्पना त्याने कमलाकांताला सांगितली तेव्हा त्या दोघांचें केवढें कडाक्याचें भांडण झालें ! आणि या भांडणाची सूचना प्रत्यक्ष वर्णन न करतांही लेखकाने किती कौशल्याने वाचकांना दिली आहे !

कमलाकांताच्या शुद्ध, उदात्त जीवनाशीं तुलना करतां शरच्चंद्राची

विषयलोलुपता व त्याच्या पूर्ततेकरितां त्याने चालविलेली धडपड अधिकच उठावाने दिसून येते. आणि त्याच्या जीवनांतील हा विरोध त्या दोघांच्याही मृत्यूचे प्रसंग साधून लेखकाने अधिकच परिणामकारक घडवून आणला आहे. शरच्चंद्र व कृष्णराव एकच आहेत हें प्रत्यक्ष पुराव्याने पाहतांच कमलाकांताला जो भयंकर धक्का बसतो त्यांतच त्याचा अंत होतो. पण त्या मृत्युप्रसंगींही तो खचून जात नाही. आयुष्यांत मिळवावयाचें तें मी मिळविलें आहे, भोगावयाचें तें सुख भोगलें आहे, अशा शांत वृत्तीने तो मरणास तयार होतो; आपल्या मृत्यूची चर्चा अगदी शांतपणाने व स्थिर चित्ताने मनोहरपंतांशीं करतो; मृत्यु हें संकट नाही तर तो एक आपला उपकारकर्ताच आहे या भावनेने त्याचें स्वागत करतो. आगगाडींत प्रवास करतांना बरोबरच्या प्रवासी सोबत्यांशीं खेळीमेळीने वागून आनंदांत प्रवास करणारा एखादा प्रवासी आपलें उतरण्याचें स्टेशन येतांच आनंदाने सर्वांची रजा घेऊन जसा उतरून जातो, त्याच वृत्तीने कमलाकांतही बिलकुल शोक न करतां या जगाचा त्याग करून आपल्या पुढील प्रवासास लागतो. पण तेंच शरच्चद्राच्या मृत्यूकडे पहा. शारीरिक व मानसिक क्लेश सहन करीत महिनेच्या महिने त्याला घालवावे लागतात. मिळालें होतें तितक्या सर्व आयुष्याचा खेळखंडोबा केल्याने मृत्यु त्याला किती भयंकर वाटतो, आणखी थोडे दिवस जरी जगावयास मिळालें तर बरें अशा आतुरतेने तो कशी धडपड करतो, हें सर्व वर्णन हृदयाला पीळ पाडणारें आहे. मृत्यूचें धैर्यानें स्वागत करणारी कमलाकांताची स्थिरचित्तता कोणीकडे, आणि जगण्याकरितां धडपड करीत केवळ नाइलाज झाला म्हणून मृत्यु पत्करणारा, “मला येवढी भिक्षा घाल” म्हणून मनोहरपंताची व पर्यायाने सर्व जगाची काकुळती करणारा आणि निरुपाय म्हणून विषाचा पेला ओठाशीं लावणारा शरच्चन्द्र व त्याची लोलुपता कोणीकडे! मृत्यु हेंच जीवनाचें खरें रहस्य असेल, मृत्युसमयींच्या मनोवृत्तीवरूनच जीवनाची यशस्विता ठरावयाची असेल, मृत्यूच्या कसोटीवरच जीवनाच्या उदात्ततेची, उज्वलतेची परीक्षा व्हावयाची असेल, तर शरच्चन्द्राच्या दुटप्पी जीवनाचें भयंकर स्वरूप याहून अधिक स्पष्टपणें वाचकांच्या मनावर ठसविणें शक्यच नाही.

देव आणि असुर, सुष्ट आणि दुष्ट वृत्ति यांचा हा संग्राम सनातन आहे, मनुष्य प्राण्याच्या उत्पत्तीपासून चालू आहे; त्याचा शेवट जगाच्या दृष्टीने केव्हा आणि कसा होईल हें कोणी सांगावें! पण प्रत्येक व्यक्तीला आपल्यापुरता ह्या संग्रामाचा शेवट समाधानकारक रीतीने लावतां येणें शक्य आहे. मनुष्याच्या सर्व इंद्रियांना असुरांनी स्पर्श केला असल्यामुळे तीं सर्व सुष्ट आणि दुष्ट दोन्ही प्रकारचीं कर्में करतात. पण मुख्यप्राणाच्या समीप जाऊन असुर नाश पावले. फोडतां न येणाऱ्या पाषाणावर आपटलेलें ढेकूळ विनाश पावतें त्याप्रमाणें ज्याचा मुख्य प्राण स्थिर आहे त्याच्या पुढे या आसुरी वृत्ति लय पावतात. शरच्चंद्राने दैवी वृत्तीचा स्वीकार केला, पण निर्धाराने व चिकाटीने त्या मार्गाला तो चिकटून राहिला नाही. मोहाचा प्रसंग उद्भवतांच त्याचें मन लटपटलें आणि त्याच्या अधोगतीस सुरुवात झाली. पिंजऱ्यांत अडकून राहिलेला कृष्णराव सुटका करून घेण्याकरितां धडपड करीत होता आणि त्याच्या मोहाला व धडपडीला, शरच्चंद्र बळी पडला हें खरें. पण त्याने कृष्णरा-वाला नुसता पिंजऱ्यांतच अडकवून ठेवला होता. कायमचा गाडून टाकला नव्हता. परळवरील कृष्णरावाचें घर अजून शिल्लक होतें, त्याचे कपडेही त्याने जवळ बाळगिले होते. परत जाण्यास उपयोगी पडणारे दोरे कापून टाकण्याचें सूर्याजीचें शहाणपण, प्रसंगावधान व दूरदर्शित्व, शरच्चं-द्राच्या ठिकाणीं आढळून आलें नाही, आणि म्हणूनच त्याची अधोगति टळली नाही. मुख्य प्राणशक्तीचा आश्रय घेऊन त्याने दगडावर पाय रोविले असते, पहिल्याच मोहाचा निर्धाराने प्रतिकार केला असता तर कृष्णरावाचें बळ वाढलें असतें व अर्थात पुढील सर्व अनर्थपरंपरा टळली असती. 'उठलों तेथून उजाडलें' असें समजून झालें तें होऊन गेलें, त्याचा पश्चात्ताप सोडून देऊन, अजून उशीर झाला नाही तोंच आपले पाय वाकड्या रस्त्याला कितपत लागले आहेत हें मनुष्य पाहूं लागेल, जोराचा निश्चय करील व निर्धाराने तो निश्चय टिकवील तर आपल्या मनांतील या पशुवृत्तींना जिंकणें हें काम वाटतें तितकें बिकट नाही असा प्रत्येकाला अनुभव येईल.

---